श्री.

# मराठी साहित्य संमेलन, बडोदें.

## अधिवेशन १९ वें

---

सन १९३४

---

अध्यक्ष: रा. सा. नारायण गोविंद चापेकर
बी. ए. एल्. एल्. बी.

---

## इतिवृत्त

---

[प्रका]शक: प्रो. सदाशिव विनायक देशपांडे एम्. ए.
चिटणीस.

मराठी साहित्य समेलन, अधिवेशन १९ वे, बडोदे



अध्यक्ष-श्री ना. गो चापेकर



स्वागताध्यक्ष-जनरल नानासाहेब शिंदे.

श्री.

# मराठी साहित्य संमेलन, बडोदें.

## अधिवेशन १९ वें

---

सन १९३४

---

अध्यक्ष : रा. सा. नारायण गोविंद चापेकर
बी. ए. एल्. एल्. बी.

---

इतिवृत्त

---

प्रकाशक : प्रो. सदाशिव विनायक देशपांडे एम्. ए.
चिटणीस

---

# -: अनुक्रमणिका :-

# संमेलनाची पूर्वतयारी.



**संमेलनास आमंत्रण**

१ सन १९३२ सालची गोष्ट श्रीमत सरकार महाराजासाहेब गायकवाड याचे अध्यक्षतेखाली मराठीचे मायघरी श्रीकरवीरक्षेत्री मराठी साहित्यभक्ताचा मेळावा जमला होता मराठी साहित्याचे ते सतरावे संमेलन होतें अठरावे संमेलन आपापल्या गावी बोलावण्याचा अनेकाचा विचार होता संमेलनाचें अठरावे अधिवेशन बडोद्यास व्हावे अशी बडोदकराची फार इच्छा होती बडोद्यास पूर्वी सन १९२१ साली अधिवेशन भरलें होते, त्यानतर बरोबर एका तपाच्या कालानंतर पुनश्च तो वाङ्मयसोहळा साजरा व्हावा असेंच बडोद्यास सर्वाना वाटत होतें. कोल्हापूरला संमेलनाच्या खुल्या अधिवेशनात बडोद्यातर्फे आमंत्रण सहविचारिणी सभेकडून देण्यात आले पण त्याचवेळी समेलनापुढे नागपूरकराचेहि निमंत्रण होतें नागपूरकराच्या विशेष आग्रहावरून त्याचे आमंत्रण स्वीकारण्यात आले पण तेव्हाच बडोद्याच्या पुढील आमत्रणाला मनोमय आश्वासन मिळाले

**आमंत्रणाचा स्वीकार**

२ सन १९३३ साली दे भ काकासाहेब खाडिलकर याच्या अध्यक्षते खाली नागपूरचे संमेलन पार पडले. विसर्जनाचे समयी बडोद्याचे आमंत्रण पुन देण्यात आले सर्वानी मोठ्या आनंदाने त स्वीकारले त्या स्वीकाराची वार्ता सहविचारिणी सभेला समजताच सर्वाना मोठा आनंद झाला त्या आनदात संमेलन कार्याच्या जबाबदारीची जाणीवहि थोडी फार होतीच

**कार्यकारी मंडळ**

३ सन १९३४ चें मराठी साहित्य संमेलनाचें १९ वे अधिवेशन बडोद्यास भरण्याचे तर ठरलेच. पण त्या कार्याच्या वाढता पसारा सहविचारिणी सभेच्या नीट ध्यानी होता व तो नीट आवरण्याची तिला चिंताहि होती. मराठी साहित्याचा संसार दिवसे-दिवस वाढत आहे. त्याची नीट माडणी होऊन तो इतराना डौलदार दिसावा एवढ्याकरिता समेलनासारख्या प्रसगी थोर थोर साहित्यसेवक एकत्रित होतात व त्याच्या मदतीनें व विचारानें या संसाराला तेज चढतें. येवढ्याकरिता अशा साहित्यसेवकाना पूर्ण अवसर मिळावा, संमेलनाचे काम सुव्यवस्थित होऊन

यशाचे कडेला पोहोचावें, संमेलनाची सर्व प्रकारची जबाबदारी अंगावर घेऊन ती अखेर पावेतो पार पाडावी म्हणून सभेने संमेलनाकरिता एक कार्यकारी मंडळ नेमले

**अध्यक्ष.** श्रीमंत संपतराव गायकवाड.

**उपाध्यक्ष** रा. ब. ग. ब. आंबेगावकर

**चिटणीस**
प्रो स. वि देशपांडे
श्री. पा. वै गुप्ते
,, चि. गो. जोशी

**सभासद**
जनरल नानासाहेब शिंदे.
रा. रा गो. कृ दाडेकर.
,, ,, रा. शा. पाटील ( माने )
,, ,, वा. रा तळवलकर.
,, ,, स. अ सुधाळकर
,, ,, दा. ना आपटे
,, ,, भा चि लेले.
,, ,, गं मा तांबे.
,, ,, प्रो. माणिकराव
,, , वा वि. जोशी.
,, ,, चि वि जोशी

**खजिनदार:—**,, शंकर त्र्यंबक गोडगस्ते

सभेनें आगामी संमेलनाची सर्वतोपरी जबाबदारी वरील मंडळाच्या शिरावर टाकली व मंडळाच्या कार्यक्षमतेची खात्री पटून समाधानाचा निश्वास टाकला.

४ श्रीमंत संपतराव गायकवाड याना प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळे मंडळाच्या कामांत प्रत्यक्ष भाग घेता येत नसे परंतु मंडळाचे झालेले काम ते वारंवार ऐकत व वेळोवेळी सूचनाहि करित. त्यांचे जागी उपाध्यक्ष रा ब आंबेगावकर हेच सभा चालवीत व कामें वाटीत.

**विशेष योजना**

कार्यकारी मंडळानें यंदाच्या संमेलनप्रसंगा करितां एक विशेष योजना आखली होती. संमेलनाचा सारा भर निबंध-वाचन व चर्चा यावर असावा असा सभेचा कटाक्ष होता अनेक साहित्यसेवकांनी आस्थेने निबंध लिहावेत, ते संमेलनात

वाचले जावेत, त्यातून चर्चार्ह प्रश्न निघावेत, त्यावर यथोचित चर्चा व्हावी जमल्यास कांही निर्णय हि काढता यावा असा उद्देश होता तो साध्य होण्या करिता संमेलनाचे समग्र अधिवेशन व विभाग अधिवेशनें असे भेद पाडण्यात आले तदनंतर विभागाच्या संख्येचा स्वतंत्र विषयाच्या दृष्टीने विचार होऊन पुढील विभाग कायम करण्यात आले —(१) शास्त्रीय (२) कथा (३) ऐतिहासिक (४)भाषा (५) काव्य (६) संगीत (७) नाट्य (८) प्रकाशन (९) तत्त्वज्ञान व समाजशास्त्र समेलनाध्यक्ष व विभागाध्यक्ष अशीं अनेक तज्ञ माणसे संमेलनाला एकाच वेळेला लाभतील व प्रत्येकाच्या ज्ञानाचा व विचाराचा लाभ एकसमयावच्छेदे करून सर्वत्राना घेता येईल ही कल्पना सर्वांनाच सुखद वाटली

**पोटसमित्यांची निवडणूक**

६ सहविचारिणी तर्फे भरणाऱ्या या १९ व्या समेलनाला शास्त्रोक्त अधिकार प्राप्त होण्याकरितां सहविचारणी सभा साहित्य परिषदेशीं संमेलनासाठी एक वर्षाकरता 'सहकारी सस्था' म्हणून जोडून घेण्याचे ठरले ह्या बाह्य व्यवस्थेनंतर कार्यकारी मंडळानें साहजिकच अतर्व्यवस्थेकडे लक्ष्य देणेस आरंभ केला मागील समेलनाचा अनुभव व अलीकडील समेलनाचा पसारा ही दोन्ही ध्यानी घेऊन श्रमविभागाचे तत्त्वावर कामाची वाटणी करण्याचे व जबाबदारी विभागण्याचे ठरविले तेवढ्या करिता निरनिराळ्या पोटसमित्या व त्याचे सभासद निवडले. प्रत्येक समितीनें आपापल्या कामाचा अङ्गीकार करावा म्हणून विनंति केली आरंभी निवडलेल्या सर्वच सभासदानी काम करण्याचे कबूल केले नाहीं त्याचे जागी वेळोवेळी अनेक माणसें निवडून घ्यावी लागली पण समित्या कायम झाल्या व कामाला सुरवात झाली एवढे खास

**विभाग चिटणीस**

७ संमेलनातील विभागाची जबाबदारी एकेक स्थानिक चिटणीस निवडून त्याजवर टाकण्यांत आली यातहि कांहीं मंडळींनी कारणपरत्वें पुढे नकार दिला, तेव्हां त्यांचे जागीं अन्य माणसाना तें काम सागण्यांत आलें.

**ख्रिस्ती सा संमेलन.**

८ कार्यकारी मंडळानें जरी ख्रिस्ती साहित्य समेलन भरण्याचें ठरविलें होतें तरी पुढे श्री. रा. सा. र लु. जोशी याचे सूचनेवरून बडोद्यास ख्रिस्ती साहित्य समेलन भरविण्यास पुरेसा अवसर नाही म्हणून तो विचार रद्द करण्यांत आला

**कार्यकारी मंडळाचें कार्य.**

तदनतर काहीं दिवसानी रा. सा ना. गो. चापेकर हे परिषदेच्या कामा करिता परिषदेच्या चिटणीसासह येथें आले होते. त्याचवेळी कार्यकारी मंडळाची बैठक होती मंडळाने त्यानाहि प हुणे म्हणून सभेला बोलाविलें. परिषदेच्या सभासदाना संमेलन प्रतिनिधित्वाचे मूल्य नियमाप्रमाणे रु १ असावे, रा वि सभा परिषदेशी सलग्न करून घ्यावी, संमेलनाच्या कार्यक्रमात परिषदेच्या वार्षिक बैठकी करिता दिवस ठेवावा वगैरे सामान्य गोष्टी त्यानीं खाजगी रीत्या सूचविल्या व सभेने त्या मान्य केल्या त्याचवेळी संमेलनाला बृहन्महाराष्ट्रसंस्था व विद्यापीठे याना आपापले प्रतिनिधि पाठविणेची विनति करणेचे ठरविले

**प्रसिद्धिपत्रकें.**

१० संमेलनासबंधी अशा प्रकारची व्यवस्था जारीने खुद्द बडोद्यात चालू असता बडोद्याबाहेर ही हालचाल जाहीर व्हावी म्हणून प्रसिद्धिपत्रके काढण्यात आलीं. पहिल्या प्रसिद्धिपत्रकात संमेलनाच्या योजनेचा आराखडा देऊन समेलन यशस्वी करणेविषयी महाराष्ट्रीयाना विनंति करण्यात आली होती संमेलनाची ही व्यापक व नवीन योजना बडोद्याबाहेरहि सर्वाना मोठी गमतीची वाटली व त्याचे कुतूहल जागृत झाले अनेक प्रकारच्या सूचना व पृच्छा बाहेरून येऊं लागल्या ह्याच गमकावरून समेलनाची आपली योजना योग्यच आहे असा भरंवसा कार्यकारी मंडळाला आला

११ दुसऱ्या प्रसिद्धिपत्रकात विभागानुरूप निबधाना विषय सूचविले होते निबंधाचें स्वरूप ठेवता येईल तेवढे विस्तृत ठेवले होते शिवाय विभागात न बसणारे पण सामान्य स्वरूपाचेहि विषय सूचविले होते. समेलनाच्या ह्या सूचना होत्या. त्या व्यतिरिक्त आपापल्या इष्ट व अभ्यासाच्या विषयावर निबध लिहिण्यास साहित्यसेवकाना मोकळीक होतीच. फक्त साहित्यसेवकानी निबध अवश्य लिहावेत व ते ता ३१ आक्टोबर १९३४ चे आत पाठवावेत अशी कळकळीची विनति होती परंतु पुढे निबंधांची मुदत वेळोवेळी वाढवावी लागली, त्यामुळे मूळचा निबंधाचे साराश छापणेंचा बेत रद्द करावा लागला।

१२ अशारीतीनें संमेलनाच्या प्राथमिक योजना सर्वांना जाहीर करण्यांत आल्या, कार्यकारी मंडळानें नंतर आपलें लक्ष्य अध्यक्षाच्या निवडणुकीकडे दिलें

१३ अध्यक्षपदाकरिता नावें सुचविण्याविषयीं विनंतिपत्रें बहुतेक साहित्य-संस्थाना पाठविण्यांत आली. तसेंच वर्तमान

**अध्यक्षाची निवडणूक**

पत्रद्वारांहि ही घोषणा करण्यात आली परंतु खेदाची गोष्ट एवढीच की, फारच थोड्या सस्थानीं किवा साहित्यिकानी आपले मत कळविले. असो आलेल्या त्या सूचनाचा विचार करून आपले असें एकादें नाव कायम करून ते साहित्य परिषदेला कळविणेंकरता संमेलनाच्या कार्यकारीमंडळाचीं सभा भरविण्यात आली अध्यक्ष पदाकरिता नावें सूचवावयाची तीं शेवटी परिषदेने व त्यातून निवड करावयाची ही संमेलनसमितीने हा क्रम सर्वश्रुतच आहे तेवढ्याकरिता भरलेल्या समितीनें सर्व सूचनांचा विचार केला. त्यांत श्रीयुत नरसिंह चितामण केळकर यासच पुन येथे अध्यक्ष करावे असा सभेचा मानस ठरला व तसे साहित्यपरिषदेल कळविण्यांतहि आले. शिवाय जी इतर नावे सूचविण्यात आली होतीं तीहि कळविण्यात आली.

१४. साहित्य परिषदेनें आपली सभा भरवून या प्रश्नाचा खल करून संमेलनाच्या अध्यक्षपदाकरिता यथानुक्रम पुढील पाच नावे सूचविलीं.

( १ ) रा. सा. नारायण गोविंद चापेकर ( २ ) रा दत्तात्रेय विष्णु आपटे ( ३ ) रा. सा गोविंद सखाराम सरदेसाई ( ४ ) प्रो नारायण केशव बेहरे ( ५ ) प्रो दत्तो वामन पोतदार.

श्री केळकराचे नाव विनानुक्रम सूचविण्यात आलें होते श्री केळकराची निवडणूक अध्यक्षपदी झाल्यास त्यास परिषदेचा विरोध होता असे नव्हे. परंतु त्याला परिषदेचा पुरस्कार नव्हता एवढें खास. असो.

१५ परिषदेकडून संमेलन समितीकडे अधिकृत सूचना आल्यानंतर अंतिम निर्णय करणेंकरता कार्यकारीमंडळाची पुनश्च सभा भरली. दि. ब आंबेगावकर अध्यक्ष होते अध्यक्षाच्या निवडणुकीचाच प्रश्न असल्यानें सभेला चांगलाच रग चढला. विशेषत. श्री. केळकरांना अध्यक्ष करण्याची कांहींची हौस तर परिषदेने मुळी त्या योजनेला पाठिंबाच दिलेला नाही तेव्हां प्रश्न जरा गमतीचा झाला. सभेच्या आरंभी श्री. चापेकर याचे नाव अध्यक्षपदाकरितां सूचविण्यात आलें त्याला विरोध म्हणून श्री केळकर यांची अध्यक्षपदीं निवडणूक करावी अशी उप-सूचना आली. उपसूचनेवर मतें घेतां ती सारखीं पडल्यानें मूळसूचना मताला टाकता तिला बहुमत मिळाले. यावरून निर्णय एवढाच झाला की मूळसूचना आता ठराव

स्थानें मांडण्यास योग्य होय तेव्हा श्री चापेकर अध्यक्ष असावेत असा ठराव मताला टाकला व तो बहुमतानें मंजूर झाला. काहींनी मुळीच मत दिलें नाही अशा रीतीने श्री रा सा नारायण गोविंद चापेकर हे अध्यक्ष म्हणून निवडून आले व एक महत्वाचा प्रश्न निकालात निघाला पुढे रा सा चापेकरानीहि आपली मान्यता दिली व ती जबाबदारी स्वीकारिली

**विभाग अध्यक्ष**

१६ मुख्य अध्यक्षाची निवडणूक झाल्यावर इतर विभाग अध्यक्षाच्याहि निवडणुकी झाल्या. तेथे वादाचा किंवा मताचा प्रश्नच नव्हता. सर्वांच्या निवडणुकी अगदी एकमुखी झाल्या फक्त काव्यविभागाचे प्रथमचे नियुक्त अध्यक्ष प्रो बेहरे यानी नकार दिल्यामुळे त्याचे जागी प्रो. माधव त्र्यंबक पटवर्धन याची नतर सर्वानुमतें निवडणूक झाली इतराचा होकार आल्यानें संमेलनसमितीची मोठीच विवंचना मिटली

**सहकार्य**

१७ बृहन्महाराष्ट्र व महाराष्ट्र यातील सर्व साहित्यसस्थाचे एकीकरण व्हावे, वाङ्मयातील आधुनिक प्रश्न व प्रवाह यावर विवेचन होऊन त्याची इष्टानिष्टता ठरवावी, सर्व साहित्यसस्थाच्या झालेल्या व होणाऱ्या कार्याचा नोंद होऊन त्याची एकमेकास ओळख व्हावी इतकेच नव्हे तर बगाली, गुजराथी, हिंदी या एकमूलक भाषातील वाङ्मयाशीहि विचार विनिमय व्हावा म्हणून तशाप्रकारची सविस्तर माहिती मिळविण्याकरिता प्रश्नपत्रिका अनेक सस्थाकडे पाठविण्यात आल्या. प्रश्न-जिव्हाळ्याचा असूनहि फारच थोड्यानी त्याची उत्तरे दिलीं ! आणि शवटी तर केवळ याच कार्याकरिता नेमलेल्या सहकार समितीला काही प्रत्यक्ष कामच नसल्यानें आपले आपणच विसर्जन करावे लागले ! संमेलनसमितीच्या मदिच्छेला यावी तशीं सुदर फळे आली नाहीत. !

१८ इकडे प्रतिनिधित्वाचे मूल्य ठरविणें, संमेलनस्थल नक्की करणे, समेलनाचे खर्चाचे अदाजपत्रक करणें, वगैरे किरकोळ गोष्टी समिति पार पाडीतच होती इतक्यात एकाएकीं समेलनाकडे काळाची वक्रदृष्टि फिरली. संमेलनाचे स्वागत उपाध्यक्ष रा ब आवेगावकर हे अकस्मात दिवंगत झाले सर्वानाच धक्का बसला त्यातून सावध होतो न होतो तो स्वत स्वागताध्यक्ष श्रीमंत संपतराव कैलासवासी झाले एकामागून एक वरचे दोन मोहरे आकस्मिक पडल्याने सर्वांवरच विषण्णतेची छाया पसरली परंतु मनींचें दुःख पोटी घालून आरंभिलेले हातींचें कार्य पुरें करणे

अवश्य होते. सद्विचारिणी सभेने स्वागताध्यक्षाची सूत्रे जनरल नानासाहेब शिंदे याचे हाती दिलीं उपाध्यक्ष म्हणून राजरत्न गो कृ दांडेकर याची नेमणूक केली. स्वागताध्यक्ष नानासाहेब शिंदे व समेलन अध्यक्ष नानासाहेब चापेकर अशा "दोन नाना"च्या मीलनाचा योग यामुळे घडून आला

**श्रीमंतांस आमंत्रण**

१९ पुढील काम समेलनाच्या तारखा ठरविणे. श्रीमंत सरकार महाराज साहेब यान्च्या अनुकूलते प्रमाणे ता. २५, २६, २७, डिसेम्बर किंवा ता २७, २८, २९ डिसेम्बर दिवस योजावेत असें ठरले पुढें श्रीमंताची प्रकृति अस्वस्थ झाली. श्रीमत युरोपहून परत स्वदेशी येण्याचे रहित झाले श्रीमंताना संमेलन समितीने तार करून येण्याची आग्रहाचा विनंति केली. परतु श्रीमतानी प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळे येता येत नाहीं म्हणून दिलगिरी प्रदर्शित केली. श्रीमंत स्वत आले नाहींत त्यामुळे युवराज प्रतापसिंह राजेहि आले नाहींत श्रीमत महाराजा साहेब याचे शुभ हस्ते संमेलनाचें उद्‌घाटन करता येत नाहीं म्हणून थोडा हिरमोड झालाच.

**वेगवेगळ्या समित्यांचें कार्य**

२० इकडे वेगवेगळ्या समित्यानी आपापले काम जारीने चालविल होतेच विशेषत वर्गणीसमितीचे व पाहुणचार समितीचें काम कठीण व किचकट होते दारोदार हिंडून द्रव्य गोळा करणे मोठे बिकट काम होते परतु आमच्या समितीने धीराने व शातपणे आपले काम चालू ठेवले पाहुणचार समितिहि आपले काम पाहतच होती मंडपाची व्यवस्था कर, सामानसुमान जुळव, पाहुण्याना उतरण्याकरिता जागेची साफसुफी कर वगैरे वगरे अनेक गोष्टी व त्याचा तपशील या सर्वांकडे तिला सारखे लक्ष्य द्यावयाचे होते स्वयसेवकसमितीने स्वयसेवकाची जमवाजमव करून त्याना कामाची ओळख करून देणेस आरभ केला

२१ संमेलनाच्या तारखा ता २५, २६, २७ डिसेम्बर निश्चित झाल्या. आमंत्रणे गेली सर्व प्रतिनिधींनी आपआपलीं नावे नोंधविली असती तर केवढी सुव्यवस्था होऊ शकली असती. पण ते झाले नाही व ऐनवेळी माजावयाचा तो गोंधळ माजलाच असो

समेलनस्थल म्हणून न्यायमंदिर दिवाणखाना निश्चित केला व विभाग बैठकींना न्यू ईरा हायस्कूलची इमारत घेणेचे ठरले स्वागतमंडल सभासद व

प्रतिनिधि या शिवाय समेलन पाहू इच्छिणारा प्रेक्षकाचा मोठा थोरला वर्ग असणारच त्याचे साठी प्रेक्षक म्हणून समेलनात स्वतंत्र विभाग काढण्यात आला

काही स्थानिक अन्यभाषीय व शिष्ट लोकाना आमत्रित पाहुणे म्हणून बोलविण्याचे निश्चित झाले, व त्याप्रमाणे आमंत्रणेहि गेली

२२ अशा रीतीने समेलनाची पूर्ण तयारी पूर्ण होत आली. न्यायमदिरचा दिवाणखाना बैठकीनी सज्ज करण्यात येऊं लागला. म चि हायस्कूलमध्ये निवासाची सर्व व्यवस्था पूर्ण होत आली. संमेलनाचे कार्यक्रम छापून प्रसिद्ध झाले स्थानिक प्रतिनिधीना समेलनसंबधी सर्व माहिती घरपोच मिळाली सर्वांनाच संमेलनाची आतुर उत्सकता वाटूं लागली. ता. २३ डिसेम्बरच्या सायकाळपासूनच प्रतिनिधि येऊं लागले ता. २४ ला तर प्रतिनिधींची गर्दी होऊ लागली सायकाळीं तर स्वत अध्यक्ष आले स्टेशनवर स्वागताध्यक्ष, चिटणीस, सत्कार समिति, समेलनाचे इतर कार्यवाह या सर्वांनी आदराने त्याना उतरवून घेतले हार कलगी अर्पण केली. त्याचे बरोबर काहीं विभाग अध्यक्ष, अनेक प्रतिष्ठित साहित्यसेवक अशी अनेक मडळी आली होती. सर्वांचा यथोचित सत्कार करून त्याना निवासस्थली पोहोचविले अध्यक्षाकरिता ४ दिवस खुद्द सरकारातून वाहनाची व्यवस्था होती स्वागताध्यक्षानीं त्याना निवास स्थल आणले वाटेवर स्वयंसेवकानी त्याना खडी ताजीम दिली तो देखावा खरोखरच मोठा प्रेक्षणीय होता. प्रतिनिधि निवास प्रतिनिधींच्या गडबडीने गजबजून गेला. येता येना म्हणता समेलन अगदीं उद्यावर येऊन ठेपले.

---

# संमेलन--वृत्त.

**संमेलन प्रारभ.**

१ ता २५ रोजीं दुपारी ३ वाजता समेलनाचे अधिवेशनास प्रारंभ व्हावयाचा ठरला होता अधिवेशना करिता न्यायमंदिरचा भव्य हॉल सुसज्जित करण्यात आला होता प्रतिनिधींची व प्रेक्षकाची तुफान गर्दी होणार हे निश्चित झाल्याने त्या सर्वांची बसण्याची सोय कशी करावी असा मोठा पेच समेलनाच्या सभासमितीला पडला होता. हॉल मध्ये हजार बाराशे माणूस सुखाने बसेल अशी बैठकीची व्यवस्था करण्यात आली होती. मध्यभागी राजपौत्राकरिता उच्चासने माडली होती त्याचे दुतर्फा खुर्च्यांच्या ओळी लाविल्या होत्या समोरच वर्तमान पत्राच्या प्रतिनिधींची व वार्ताहाराची व्यवस्था केली होती एवंच जेवढी सोय करता येणें शक्य होते तेवढी केली होती हॉलचा मूळचा भव्यपणा उठावदार शोभेने अधिकच वाढला होता.

२. दुपारी दोन वाजल्यापासून चौघडा सुरू झाला सरकारी कचेऱ्या, निमसरकारी संस्था दोन वाजता सुटल्याने लोकाची ये जा तेव्हा पासूनच सुरू झाली. प्रेक्षक, प्रतिनिधि, पाहुणे, स्वागतमंडळ सभासद सारेजण धावपळीने आपापली जागा शोधून पाहत आहेत हे दृश्य खरोखरच गमतीचें होते अध्यक्ष, विभाग अध्यक्ष आपापल्या जागी विराजमान झाले. श्री राजस्नुषा शकुंतलाराजे, श्री. राजस्नुषा कमलादेवी याहि आपल्या खास जागी येऊन बसल्या त्याना चौघड्याने सलामी दिली स्वागताध्यक्षानी सर्वांचा यथोचित सत्कार केला. सर्व सभागृह माणसानी नुसते फुलून गेले होते बरोबर तीन वाजता भालदार चोपदाराच्या ललकारण्यात श्रीमंत राजपौत्र उदयसिंगराव व राजपौत्र खंडेराव याच्या स्वाऱ्या आल्या. लष्करी बडनें त्याना सलामी दिली सर्वांनी उत्थापन देऊन त्याचा सन्मान केला उभयतां राजपौत्र आपल्या आसनावर विराजमान झाले समेलनाचे अधिवेशन सुरू झाले.

**स्तवन व स्वागत.**

३ आरंभी संमेलना करिता राजकवि चन्द्रशेखर यांनी तयार केलेले ईशस्तवन मुलींनीं गायले. तदनंतर सौ. अन्नपूर्णाबाई देशपाण्डे याचे स्वागतगीत गावून सर्वांचा काव्यसत्कार केला. या सुंदर कार्यक्रमानतर स्वागता

ध्यक्ष जनरल नानासाहब शिंदे यानी आपलें भाषण खड्या सुरात वाचले व शेवटी संमेलनाचे उदघाटन करणेची विनंति श्रीमंत राजपौत्र उदयसिंगराव याना केली

४ उद्‌घाटन करताना श्रीमंत राजपौत्र म्हणाले, 'आजचा हा समारंभ आपणा सर्वानाच मोठा आनंदाचा आहे. मराठी संस्थानात मराठी साहित्याचे संमेलन वारवार व्हावें हें योग्यच होय. आजचे हे संमेलन येथे तिसरें आहे हे आपण जाणताच मागील दोन्ही

**श्रीमंत राजपौत्रांचें भाषण**

वेळी श्रीमंत सरकार महाराजासाहेब याचे शुभहस्तें संमेलन उघडलें गेले आजहि तसेंच झाल असते, परंतु प्रकृति बरी नसल्यानें श्रीमंताना येथे आज हजर राहता आलें नाहीं. याचा आपणाप्रमाणे स्वत श्रीमंतानाहि खेद वाटत असेल, जरी श्रीमंत शरीरानें येथे नसले तरी मनानें ते येथेच आहेत असे समजावे कारण श्रीमंताचे मराठी भाषेवरचे प्रेमच तसें आहे. आपण सर्व थोर सभाजन मराठी भाषेवरच्या प्रेमानें एकत्रित झाला आहा तेव्हा त्या भाषेची उचित ती सेवा होईलच आपल्या सारख्याच्या प्रयत्नाने मराठी भाषेची थोरवी खात्रीने वाढेल, असा आम्हास भरंवसा आहे आपल्या या पवित्र कार्यांत आपणास आमचाहि पूर्ण पाठिंबा आहे आपलें हें संमेलन यशस्वीरीतीनें पार पडो असे आम्ही चिंतितो."

५ श्रीमंत राजप्रौत्राच्या भाषणानंतर अध्यक्षाची निवडणूक झालीं नागपूरचे प्रो पेंडसे, पुण्याचे प्रो वामनराव जोशी, मुंबईचे प्रो काणे, बडोद्याचे मे स अ सुखाळकर यानी रा. सा नारायण गोविंद चापेकर याच्या गुणवर्णनपर यथोचित भाषणे करून अध्यक्षपदीं त्याची निवडणूक किती योग्य आहे हे दर्शविले व त्याना अध्यक्षस्थान स्वीकारणेची विनंति केली

**अध्यक्षांची निवडणूक.**

६ सर्वांची सूचक व अनुमोदनपर भाषणे झाल्यावर टाळ्याच्या प्रचंड गजरात संमेलनाचे नियोजित अध्यक्ष रा. सा चापेकर हें आपल्या स्थानीं विराजले तदनंतर स्वागताध्यक्ष जनरल शिंदे यानी अध्यक्षास व उभयताराजप्रौत्रास पुष्पहार अर्पण केले, अहमदाबादच्या बृहन्महाराष्ट्रपरिषदेतर्फेहि श्री रा. ब साठवले यानी अध्यक्षास पुष्पहार अर्पण केला

७ या समयों उभयता राजप्रौत्राना निकडीचे काम असल्याने उभयताच्या स्वाऱ्या चोपदाराच्या ललकारण्यात निघून गेल्या व नंतर संमेलनाचें काम पुढे चालू झालें

८ आरंभी संमेलनाचे चिटणीस प्रो. स वि देशपांडे यांनी समेलनाला आलेल्या शुभसंदेशाचा व तारांचा निर्देश केला.

**शुभसंदेश वाचन.**

आलेल्या संदेशात श्रीमंत पंत प्रतिनिधि स, औंध, कलकत्ता युनिव्हर्सिटी, दादासाहेब करंदीकर, सरदार आंग्रे, गोमन्तक साहित्यसेवक मण्डळ, महाराष्ट्रमित्रमण्डळ क्वेटा, इत्यादिकांचे संदेश उल्लेखनीय होते यंदाचे वर्षी हैद्राबादच्या उस्मानिया युनिव्हर्सिटी तर्फे प्रो. चिंतामण नीलकंठ जोशी यास समेलनास प्रतिनिधि म्हणून पाठविण्यात आले होते ही गोष्ट नमूद करण्यासारखी आहे कलकत्त्याच्या बंगाली सभेतर्फे डॅा भट्टाचार्य यास प्रतिनिधि म्हणून पाठविले होतें.

९ शुभसंदेश वाचनानंतर ' करभार ' व उपासनी महाराजाचे चरित्र ' ही पुस्तकें अध्यक्षास अर्पण करण्यात आली.

**अध्यक्षांचे भाषण**

नंतर अध्यक्ष रा सा. चापेकर यांनी आपल्या भाषणास प्रारंभ केला आरंभीचा बराच भाग त्यांनी अस्खलितपणे व ठसकेदार रीतीनें मारांशरूपानें सांगितला त्यांचे भाषण एकंदर तासदीडतास चालले श्रोत्यांनीहि ते शांतपणे ऐकून घेतलें सुमारे ५॥ वाजता अध्यक्षाचे भाषण संपलें शेवटी विषय नियामक मंडळाची निवडणूक होऊन सभेचाहि कार्यक्रम समाप्त झाला. झालेल्या कार्यक्रमा विषयी बरीवाईट टीका करित मंडळीहि घरोघर गेली

१० रात्रौ काव्यगायनाचा कार्यक्रम झाला अनेक प्रथितयश व होतकरू कवींनी त्यात भाग घेतला या कार्यक्रमाला प्रो.

**काव्य गायन.**

पटवर्धन यांचे अध्यक्षतेखाली बरेच व्यवस्थित स्वरूप आले होते. कु संजीवनी मराठे यांना काव्यगाननैपुण्याबद्दल श्रीमंत शकुंतलाराजे यांनीं खास पारितोषक दिले. संमेलना तर्फे प्रो मायदेव व श्री. बोरकर यास पारितोषकें देण्यात आली मूळ संमेलना पासून हा कार्यक्रम तोडून केवळ करमणुकीचा ठेवल्यानें तो आटोपलाहि व्यवस्थित.

११ तिकडे प्रतिनिधींच्या निवासस्थली विषयनियामक मंडळाची बैठक भरली. साहित्यप्रेमी व कळकळीची अशी निवडकच मंडळी खल करण्याकरता जमली होती मांडावयाचे ठराव संमेलनाकडे वेळेवारीं पाठविणेची दक्षता फारच थोड्यांनी बाळगली होती. आलेले ठराव व्यवस्थित व शुद्ध, सुबोध भाषेत लिहिलेले नव्हते त्यामुळे समग्र अधिवेशनात मांडावयाचे ठरावावर बरीच कात्री

कटी झाली. कांहीं ठराव चर्चेस घेतले, माजावयाचा तो वाद माजला, काही समग्र अधिवेशनात माडण्याकरिता मंजूर झाले. श्री पावश्याचा अनुस्वाराचा ठराव पहिल्या बैठकींतच गळाला रात्र फार झाल्याने सभेचे काम दुसऱ्या दिवसावर टाकण्यात आले. अधिवेशनाचा पहिला दिवस संपला

---

## दिवस दुसरा.

**फोटो.**

११. संमेलनाच्या दुसऱ्या दिवसाचा कार्यक्रम प्रतिनिधींच्या ग्रप फोटोपासून झाला. पुरुष प्रतिनिधींचे व स्त्रीप्रतिनिधींचे स्वतंत्र फोटो घेण्यात आले त्याचवेळी सर्व विभाग अध्यक्षाचाहि एक स्वतंत्र फोटो घेण्यात आला.

श्री वासुदेवराव जोशी व प्रो चिंतामणराव जोशी या प्रसिद्ध जोशीद्वयाने सर्व प्रतिनिधींना एक छोटीशी चहापार्टी दिली तिचा आनदाने स्वीकार करून ताजीतवानी झालेली सर्व मडळी विषय नियामक मडळाच्या बैठकीला बसली आदल्या रात्री अपूर्ण राहिलेल्या कामाला सुरवात झाली. प्रो. जोशी याचा सदभिरुचिविघातक वाङ्मय निषेधाचा ठराव व मुबईच्या श्री पुरोहिताचा कामगार वाङ्मयावरील बंदी उठविण्याचा ठराव हे दोन वादाचे ठराव पुढे येणारे असल्याने सभेला चागलाच रग भरणार असा सर्वांना अदाज वाटू लागला

**ठराव चर्चा.**

१२. प्रथम प्रो. जोशी यानी ठराव माडला. तो असा, "सदभिरुचीस विघातक असें कोणतेहि वाङ्मय असलें तरी त्याचा हे संमेलन निषेध करित आहे."

सदर ठराव माडताना तें म्हणाले की, केवळ लैङ्गिक वाङ्मय अश्लील असते असें नव्हे तर साहित्यपत्रिकेच्या एका अंकात सुद्धा बरीच अश्लीलता दाखविता येईल नवमतवाद्याप्रमाणेंच जीर्णमतवादीहि अश्लील लिहितात. अध्यक्षाच्या भाषणातील काही मजकूर सदभिरुचीस रुचणारा नाहीं कवि यशवंत याच्या द्वितीय विवाहा सबंधीं एक पत्रक प्रसिद्ध झालें आहे तेंहि अश्लीलतेंत जमा होण्यासारखे आहें इ. या ठरावाचा कटाक्ष तरुणावरच नसून जुन्या नव्या सर्वच मताच्या लोकावर आहे. सबब तो मंजूर करावा"

१३ सदर ठरावाला श्री. वा वि जोशी यानी अनुमोदन दिले अनुमोदनात त्यानीं पुराणातील अश्लीलताहि उल्लेखिली ठरावाला प्रो वा म जोशी यानी विरोध केला. ठरावातील भाषा व तत्त्व आपणास मान्य आहे, पण असले ठराव आणू नयेत असे आपलें मत असल्याचे त्यानी सागितले. अध्यक्षीय भाषणामबधीची श्री चितामणरावाची टीका किंवा यशवंताच्या विवाहाचा उल्लेख हा तरी कोठे सद-भिरुचीस धरून आहे असाच उलट त्यानी सवाल केला तेव्हा तपशीलात शिरणें म्हणजे वादाला तोडपाडणें आहे म्हणून ठरावच न माडणें बरें इत्यादि ते म्हणाले.

अहमदाबादच्या आठवल्यानीहि प्रो वामनराव जोशाचा पाठपुरावा केला सदभिरुचि म्हणजे काय हें ठरविणें म्हणजे ब्रह्म काय हें ठरविण्याइतकेंच दुर्घट आहे, तेव्हा हा ब्रह्मघोटाळा नको असें ते म्हणाले

बेळगावचे श्री. जोग ठरावाला अनुकूल बोलले

१४. विरोधाल उत्तर देताना प्रो चितामणराव जोशानीं अनुचित उल्लेखाबद्दल किंचित दिलगिरी प्रदर्शित केली. प्रहाराची भाषा किंचित कठोर असते असें ते म्हणाले. नतर ठरावावर मते घेण्यात आलीं. ती ६१ वि ६१ अशी पडलीं. नंतर पोल मागण्यात आला मतनोंदणीच्या वेळी दोन तुकड्या विभागल्या व मोठी गमत झाली येरवी अगदीं जीवाभावाचे मित्रहि यावेळी एकमेका विरुद्ध गटात दिसले असतील ७३ वि. ७९ अशीं मते पडून सदर ठराव नामंजूर झाला. एवच विषयनियामक मडळातच तो गळाला इतर किरकोळ ठरावहि संमेलनात माडण्या करिता मंजूर झाले. नंतर श्री के रा पुरोहित यानी आपला कामगार वाङ्मय-विषयक ठराव माडण्या करिता आणिला परतु सभेचा वेळ फार झाल्यानें व दुपारी १२ वाजता विभाग अध्यक्षाच्या बैठकी सुरू व्हावयाच्या असल्यानें अध्यक्षानी सभा तहकूब केली व विषय नियामक मंडळाची बैठक सायकालीं प्रतिनिधि निवासात भरण्याचें ठरलें

**विभाग बैठकी.**

१५. दुपारी १२ वाजता न्यूईरा हायस्कूलच्या इमारतीत विभाग बैठकीन सुरवात झाली. निरनिराळ्या विभाग अध्यक्षाची भाषणे निरनिराळ्या वेळी सुरू व्हावीत व सर्व विभाग बैठकी एकाच वेळी सुरू होऊन प्रत्येक ठिकाणी निबंध वाचले जावेत, चर्चा व्हावी, सर्वांना यथारुचि अनेक विभागात डोकावून चर्चेचा लाभ घेता यावा अशी मूळची योजना होती त्या प्रमाणें प्रारभ तर झाला. शास्त्रीय विभाग, भाषा विभाग, इतिहास विभाग सुरू तर झाले. परंतु

पुढे योजलेली सर्वच व्यवस्था नासली. प्रत्येक विभाग अध्यक्षाचे भाषण ऐकण्याचा हट्ट प्रेक्षकानी धरला त्यामुळे काही विभाग अध्यक्षांचीं भाषणे शाळेच्या चौकात एकामागून एक करावी लागली. पुढे तर श्रोतृसमाज एवढा वाढला व भाषण ऐकू येण्याची एवढी दुर्मिळता झाली की सभेच्या कार्यक्रमापेक्षां गोंगाटच अधिक झाला. तेव्हा लोकाच्या आग्रहाला मान देऊन पुढील विभाग अध्यक्षाचीं भाषणे न्यायमंदिर हॉलमध्ये करावी लागली. तेथे मात्र सर्व श्रोतृसमाजाला सुखेनैव बसण्याची सबड असल्याने पुढचा कार्यक्रम सुरळित आटोपला काव्य विभागाचे अध्यक्ष प्रो पटवर्धन, कथा विभागाचे अध्यक्ष श्री. खाडेकर व सगीत विभागाचे अध्यक्ष प्रो. विनायकबुवा याची भाषणे झाली. प्रो पटवर्धनाच्या भाषणाची छाप श्रोतृसमाजावर चागलीच पडली. उर्वरित नाट्यविभागाच्या अध्यक्षाचें भाषण वेळेच्या अभावी दुसऱ्या दिवशी ठेवावें लागले

**चर्चा.**

१६. जाणत्या व जिज्ञासू लोकात विभाग बैठकीत चर्चाहि बरी झाली. विशेषत शास्त्रीय विभाग, इतिहास विभाग, प्रकाशन विभाग याठिकाणी चर्चा चागलीच झाली व चर्चेतून निषन्न होणारे विचार ठरावरूपाने समग्र अधिवेशनात माडण्याकरिता तयार झाले व त्याप्रमाणे ते माडलेहि गेले.

दुपारी १२ वाजता पासून सायकाळी ६ वाजेपावेतो हा कार्यक्रम चालू होता. सबंध्या वेळात वाङ्मयाच्या अनेक शाखाच्या तज्ञाचीं व अभ्यासकाचीं भाषणे व व विचार श्रोत्याना ऐकावयाला मिळाले, चर्चाहि पाहायला सापडली, एकंदरीत हा कार्यक्रम सर्वांना फारच आवडला. आनद व ज्ञान या दोहींची जोड त्यात होती चालकाची मूळचीच योजना कायम राहती तर याहून अधिक वाङ्मयिक लाभ झाला असता. परंतु लोकाचा आग्रह वेगळाच पडला चालकानाहि लोकेच्छेला मान द्यावा लागला. लोकाच्या संमेलनात सामुदायिक इच्छेला विरोध करणे व्यर्थ होते हें जाणून व त्यातहि थोडी सोय आहे हे लक्ष्यात घेऊन मूळची योजना बदलली. अनुभवाचा हा शहाणपणा पुढील संमेलनाला मार्गदर्शक होईल

**वि नि. मंडळाची बैठक.**

१७. सायंकाळी प्रतिनिधि निवासात विषय नियामक मंडळाची बैठक भरली वेळ थोडा व चर्चेला ठराव फार अशी परिस्थिति असल्यानें कोणते ठराव प्रथम घ्यावयाचे, कोणते मागाहून घ्यावयाचे हे अध्यक्ष आपल्या अधि-

कारात ठरवीत श्री पुरोहित याचा ठराव थोडा फार बदलून अधिवेशनात माडण्याचे ठरले सदभिरुचि विघातक वाङ्मयाच्या निषेध प्रदर्शक ठराव समेलनात माडावा असा नागपूरच्या प्रो पेडश्याचा आग्रह पडला त्याला दुजोराहि मिळाला त्या ठरावाची भाषा मुद्दाम विचारपूर्वक चागल्या प्रथितयश साहित्यसेवकानी तयार केली व तो समेलनात माडण्याचे ठरले सूचक अनुमोदक, विरोधक याची नावे ठरली आपल्या वक्तृत्वाने सभागृह दणाणून साडणारे प्रो पेडसे हे ठराव माडणार व त्याला किर्लोस्कर मासिकाचे सपादक श्री. श. वा किर्लोस्कर विरोध करणार ! या रथीमहारथ्याची वाङ्मयिक झुज पाहण्याचा रोमहर्षण प्रसग कोण नको म्हणणार ? शेवटी सदभिरुचीच्या ठरावाला वाट मिळाली म्हणून वाङ्मयीन अश्लीलतला विरोध करण्याचा आजवर चग बाधलेल्या श्री मराठ्यानाहि हायसे वाटले व उत्तम वक्ता पुरस्काराला मिळाला म्हणून आनदहि झाला इतरे जनाना तर ते ' मिष्टान्न" च होते या शिवाय किरकोळ ठराव विचारात घेण्यात आले वेळ फार झाल्याने व चिटणासानी अस्वास्थ्याचो तकार केल्याने बैठक तह-कूब राहिली व मंडळी भोजनास उठली

१८ रात्रो न्यायमदिर हॉलमध्ये गायनाचा कार्यक्रम झाला आरभी बालगवई हरि गोविद करंजगावकर याने श्रोत्याची चागली करमणूक केली नतर बडोद्याची प्रसिद्ध दरबारी गायिका बाई लक्ष्मीबाईचे सुश्राव्य गायन झाले

**गायन**

बाईच्या गाण्याचा ढब व गोडी याचा श्रोत्यावर चागलाच परिणाम झाला त्या नतर सगीत विभागाचे अध्यक्ष प्रो विनायकबुवा पटवर्धन याच्या खास मराठी सगीताचा कार्यक्रम झाला मराठी सगीताचा पुरस्कार हेच त्याचे कार्य असल्याने त्याचे गायन म्हणजे मराठी संगीताचा प्रत्यक्ष प्रयोगच होता हिदुस्थानी ख्याल पद्धतीवर मराठी ख्यालाचे विरचन व गायन कसे शक्य आहे हे त्यानी प्रत्यक्ष दर्शविले श्रोत्याना तो प्रकार अगदी अभिनव असल्याने मोठा श्रवणमनोहर वाटला व मराठी सगीताच्या शक्यतेची खात्रीहि पटली.

रात्री बारा वाजता हा करमणुकीचा कार्यक्रम आटोपला व संमेलनाचा दुसरा दिवसहि सपला

## दिवस तिसरा.

१९. संमेलनाचा तिसरा दिवस उजाडला त्या दिवशी सकाळ प्रतिनिधि करिता बडोदे सैन्याची खास कवाईत ठेविली होती. कवाईतीचे स्थळ प्रतिनिधि निवासापासून बरेच दूर होतें तथापि बहुतेक प्रतिनिधि उपस्थित होते प्रातःकालीन सूर्यकिरणांच्या प्रकाशात संगिनी चळपताना पाहून प्रतिनिधींच्या चेहऱ्यावरहि वेगळेच पाणी खेळू लागलें जनरल नानासाहेब शिंदे आपल्या नेहमीच्या धीर गंभीर वृत्तीने उभे राहून सर्व सैन्याची पाहणी करित होते सर्व सैन्याने 'रॉयल सॅल्यूट' दिल्यानंतर घोडदळाची दौड झाली. पायदळाचे निरनिराळे व्यूह झाले साराच सामारंभ रोमहर्षण होता. संस्थानी स्वराज्यातील सैन्याची ती शिस्त व ती कवाईत पाहून प्रेक्षकांच्या मनांत कितीतरी विचार त्या क्षणीं उद्भवले असतील, गतकालीन इतिहासाची एकादी शिरशिरीहि सर्वांगभर चमकून गेली असेल व तदनंतर क्षणिक खिन्नताहि उत्पन्न झाली असेल खालसा मुलुखात क्वचितच दिसणारें ते दृश्य काहींना कायमचे संस्मरणीय झालें असेल समारंभाचे शेवटी जनरल शिंद्यांनी सर्व प्रतिनिधींची गाठ घेतली सैन्यात सर्व सुशिक्षित देशी अमलदार आहेत याचा मोठ्या अभिमानाने उल्लेख केला, हिंदुस्थानाला तूर्त लष्करी साहित्याची गरज आहे तेव्हा तरुणानीं असलें लष्करी साहित्य निर्माण करण्यास झटावे असे कळकळीचे उद्गार काढले व ते सर्वांच्या अंतःकरणाला जाऊन भिडले अनेक विचाराचे काहूर मनात बाळगून प्रतिनिधि समेलनाच्या अधिवेशनाला परतले

**बडोदे सैन्याची कवाईत.**

२० प्रारंभी नाट्य विभागाचे अध्यक्ष श्री यशवन्त नारायण टिपणीस यांचे भाषण झालें 'केलें आणि करविलें' असा उभयविध अधिकार नाट्य प्रांतात त्यांचा असल्याने त्यांचें भाषण अर्थातच मोठें कळकळीचे, उद्बोधक व सूचक झाले

**नाट्य विभाग अध्यक्षांचें भाषण.**

२१. तदनंतर अहमदाबादचे प्रख्यात महाराष्ट्रीय वकील दादा साहेब मावळंकर यानीं अहमदाबादेस भरणाऱ्या बृहन्महाराष्ट्र परिषेदेचें आमंत्रण सर्व लोकाना दिले व सर्वांनीं तें मोठ्या आनंदानें स्वीकारलें

**बृ म परिषदेचें आमंत्रण.**

२२ खुलें अधिवेशन सुरू होऊन ठराव चर्चेस प्रारंभ झाला प्रथमत.

**ठराव चर्चा.**

साहित्य सेवकाच्या निधनानिमित्त दुखवट्याचा ठराव अध्यक्षानी माडला व सर्वानीं उत्थापन देऊन तो मंजूर केला त्यानतर श्री चि ग कर्वे, पुणे यानी पोष्टाचे वाढते दर कमी करणे विषयी सरकाराम विनति करणेचा ठराव माडला सदर दरामुळे वाड्मय प्रसारला केवढा धक्का बसत आहे हे त्यानी विशद केले. सदर ठरावाला श्री दा मा यदे शेटजींनी अनुमोदन दिले प्रकाशक या नात्याने शेटजीचा अनुभव जिवन्तच आहे. तेव्हा त्याचे बोल सर्वांना चटकन पटा-वेत हे उचितच होते. सदर ठराव सर्वानुमते मजुर झाला

तदनतर खुद्द अध्यक्षानीच बरेच ठराव माडले व ते अविरोधे मंजूर झाले

श्री वा वि जोशी यानी भारतीय भाषाशी सहकार्य करून सर्व भारतीय भाषासाठी एक लिपी नक्की करण्याचा ठराव माडला आपल्या भाषणात त्यानी देवनागरी लिपीचा आग्रह धरू नये असे सागितले या गोष्टीच्या शक्यतेचा विचार करावा असे त्यानी सूचविले.

श्री यादवराव काळे यानी ठरावाला अनुमोदन दिले प्रो वा म जोशी यानी भारतीय भाषाचे एवजी सस्कृतोत्पन्न भाषा अशी उपसूचना माडली तिला श्री. विठ्ठल रामजी शिंदे यानी अनुमोदन दिले. शिवाय एक लिपीचे जागी देव-नागरी लिपि असे सूचविले. श्री. शिंद्याच्या उपसूचनेला पुनश्च प्रो वा म जोश्यानी अनुमोदन दिले यास्थली श्रीमत सौ. कमलाबाई किब्यानी दोन्ही उपसूचनेला विरोध केला व मूळ ठरावाला पाठिंबा दिला परतु दोन्ही उपसूचना मताचे वेळी बहुमताने मजूर झाल्या वेळ फार झाल्याने सभेचे काम येथे बद ठेवण्यात आले.

दुपारी प्रतिनिधि निवासात येथील मूक-अध-शिक्षण संस्थेतर्फे श्री. नवाथे यानी मूक-अध-शिक्षणाचे प्रयोग करून दाखविले असलेल्या अपगाविषयीच्या स्वाभाविक सहानुभूतीमुळ सदर प्रयोग प्रेक्षकाना फारच आवडला

२३ मध्यंतरी दुपारी विषयनियामक मंडळाची बैठक भरली प्रकृतीच्या अस्वा-

**वि नि मंडळाची बैठक.**

स्थ्यामुळे अध्यक्षाना हजर राहता आले नाही. त्याचे जागी त्याचेच इच्छेवरून गोवा समलेनाचे अध्यक्ष प्रो वामनराव जोशी यानी काम केले. बरेच ठराव अद्याप नियामक मंडळातच चर्चावयाचे होते वेळेच्या मवडीप्रमाणे शक्य त्या ठरावाची चर्चा झाली व त्याची भाषा व त्याचे वक्ते ठरवून

ते अधिवेशनात मांडावयाचे ठरले इतक्यात मध्यंतरीचा रिकामा वेळहि संपला व खुल्या अधिवेशनाचा समय येऊन ठेपला अध्यक्ष, स्वागताध्यक्ष वगैरे मंडळी येऊन दाखल झाली प्रतिनिधींचीहि दाटी झाली. खुल्या अधिवेशनाला पुनश्च सुरवात झाली

२८ मुंबई विश्वविद्यालयाच्या परीक्षेच्या इंग्रेजी शिवाय सर्व विषयाचें शिक्षण व परीक्षा मातृभाषेतून घेणेस शिफारस करणेचा ठराव श्री य रा दाते यांनी मांडला, मातभाषेतून शिक्षण न मिळण्याचे दुर्दैव एकट्या

**ठराव चर्चा**

आपल्याच देशाचे हे त्याचे शब्द श्रोत्यांच्या अंतःकरणाला चांगलेच लागले. हैद्राबाद, नागपूर या ठिकाणी मातृभाषेतून शिक्षण मिळण्याची सोय झाली आहे त्याप्रमाणेच ती इकडेहि व्हावी इ ते म्हणाले मा आनंदीबाई शिर्के यांनी ठरावास दुजोरा दिला पर भाषेतून शिक्षण घेण्यानें मुलांच्या मेंदूवर निष्कारण ताण पडतो हे त्यांनीं दर्शविले ठराव नंतर सर्वानुमते मंजूर झाला

शास्त्रीय वाङ्मयाच्या पुरस्काराचा ठराव श्री भालेराव यांनी मांडला शास्त्रीय वाङ्मयाची आजची दुर्दशा, त्याच्या पुरस्काराची आवश्यकता तज्ञाकडून शास्त्रीय ग्रंथ लिहवून घेण्याची उपयुक्तता इत्यादि गोष्टी त्यानी आपल्या भाषणात सांगितल्या ललितवाङ्मयापेक्षाहि शास्त्रीय वाङ्मय अधिक अगत्याचे आहे असे त्यानीं, श्रोत्यांना बजावले श्री मुळे यानी ठरावाला जोराचा पाठिंबा दिला ठराव सर्वानुमतें मंजूर झाला

नंतर अध्यक्षानी स्वत काही ठराव मांडले व ते सर्वानुमते मंजूर झाले

वृत्तपत्रीयांनी शास्त्रीय वाङ्मयाला प्राधान्य द्यावे अशा अर्थाचा ठराव श्री. मुळे यानी मांडला दंतमंजन, साबण, टिंक्चर आयोडीन असल्या नित्योपयोगी वस्तु तयार करण्याच्या कृतीचें ज्ञान खेडोपाडी सर्वांना सुलभ व्हावे अशी सदिच्छा त्यानीं आपल्या भाषणात प्रकट केली श्री. भालेराव यानी ठरावाला अनुमोदन दिले व तो मंजूर झाला. नंतर राजकीय व कामगार वाङ्मयावरील जप्ती उठविण्याची सरकारला विनंति करण्याचा ठराव श्री. के. रा. पुरोहित यानी मांडला त्यावेळीं त्यानी मोठ्या कळकळीचें भाषण केलें. वाङ्मय जप्त करतांना सरकारनें निदान कारणे तरी सांगावीत असे उद्गार कळवळून त्यांनी काढले ठरावाला प्रो वा म जोशी यांनी अनुमोदन दिलें. सरकारी दडपणामुळें वाङ्मयाचा विकास खुंटतो, क्वचित तें विकृतहि होते, शिवाय तोंडावाटे न निघालेल्या गोष्टी अन्य

द्वारा उसळी मारून बाहेर येतात असा मानसशास्त्राचा नियम आहे, बदललेल्या काळापूर्वीचेच निर्बंध चालू ठेवणे इष्ट नाही, इ गोष्टी लक्षात घेऊन सरकारनें आक्षिप्त वाङ्मयावरील आपले निबंध दूर करावेत, परिषदेनेंहि या दिशेने प्रयत्न करावा असें ते म्हणाले

याचवेळी श्री पुरोहिताच्या ठरावाला एक उपसूचना श्री अप्पा पेंडसे यानी सूचविली त्या सूचनेचा निर्णय अध्यक्षानी असा दिला की ' श्री पेंडसे याच्या उपसूचनेत अमानुष दडपशाही असले शब्द वापरले आहेत. तशी भाषा साहित्य संमेलनाच्या व्यासपीठावर वापरली जाऊ नये म्हणून ही उपसूचना माडण्याला मी परवानगी देत नाहीं "

अध्यक्षाच्या या निर्णयाने श्री पेंडसे याचें समाधान होण्यासारखे नव्हते ते बरेच रागावलेहि. तथापि अध्यक्षाचा निर्णय मान्य करणे भागच होतें.

नतर या कामाच्या चवकशी करिता श्री वि रा शिंदे याचे सुचनेवरून एक वजनदार समिति नेमण्यात आली. ठराव मताला टाकता बडोद्यातील सरकारी अमलदारानी त्याला विरोध केला उरलेल्या लोकानीं त्याला अनुमति दिल्याने तो बहुमताने मजूर झाला

नतर ज्या ठरावाकडे व विशेषतः ज्या वरील चर्चेकडे सर्वांचे लक्ष लागले होतें तो चर्चेस निघाला तो ठराव नागपूरचे प्रो पेंडसे यानी माडला, ठराव असा —

' निर्मल आनद व उदात्त भावना याची जागृति हे ललितवाङ्मयाचे ध्येय आहे हे विसरून कित्येक लेखक क्षुद्र विकाराना चेतविणारें लिखाण कळत न कळत लिहीत असतात अशा अनिष्ट लिखाणाचा हें समेलन निषेध करित आहे."

प्रो. पेंडश्यानीं आपल्या भाषणाला प्रारंभच मोठ्या आवेशानें केला. ते म्हणाले, ' या ठरावाचा क्रमाक १४ वा आहे म्हणून कोणी त्याला चौदावें रत्न म्हणत आहेत हा ठराव गेलीं काहीं वर्षे संमेलनात येत आहे पण श्लील काय व अश्लील काय यासबधीच प्रामाणिक मतभेद आहेत खरें सौंदर्य अश्लील नसतेच मुळी ' सत्य आणि शिव हेंच शाश्वत राहते त्याने जो आनंद होतो तो वैयक्तिक स्वार्थी विचारानी होत नाहीं याच बडोद्यास वाङ्मयाचे ध्येय ' सविकल्प समाधि ' असे श्री. केळकर यानी मागे प्रतिपादिलें अशी समाधि क्षुद्र विकारानी कधी लाभले काय ? हीन दर्जाचा शृगार आजच्या स्थितीत राष्ट्राला सोसणार नाहीं. उपभागानीं वासना कध च तृप्त होत नाहींत वाङ्मय शुद्ध, स्फूर्तिदायक, पराक्रमाला

उत्तेजन देणारें असेंच पाहिजे. जनरल शिंदे यानी उपदेशिल्या प्रमाणे पराक्रमी वाङ्मयनिर्माण करा प्रो माणिकराव याच्या बटोद्यात हा ठराव मंजूर होईल असा मला भरवसा आहे " इत्यादि आशयाचे त्याचे भाषण झाले. त्यानी आपल्या भाषणाने सभागृह दणाणून सोडलें, विशेषत. जनरल शिंद्याच्या उद्गाराचा व प्रो. माणिकराव याच्या आचाराचा उल्लेख विशेष परिणामकारक झाला

सौ. अनसूयाबाई काळे यानी ठरावाला अनुमति दिली अश्लील वाङ्मयाचा लहान मुलावर व स्त्रियावर अत्यंत अनिष्ट परीणाम होतो, त्यामुळे आपली भावी पिढी पराक्रमी निपजणार नाहीं इ त्यानी कळकळीने विशद केले.

या स्थली श्री. ठाकूर यानी ' कळत न कळत ' याचे जागी जाणून बुजून असे शब्द सूचविले प्रो. जोश्यानी त्याला अनुमति दिली परंतु ती उपसूचना नामंजूर झाली.

नंतर श्री शकरराव किर्लोस्कर ठरावाला विरोध करावयास उभे राहिले. हा एकाकी साहित्यिक आता या ठरावाला विरोध कसा करतो इकडे सर्वांचे लक्ष्य वेधले. कोणत्याहि तऱ्हेने विकारवश न होता अत्यत शाततेने, धीमेपणे त्यानी आपल्या भाषणास आरभ केला. त म्हणाले, क्षुद्र विकाराना चेतविणारे वाङ्मय कोणालाच नको. फक्त स्वाभाविक विकाराचें प्रतिबिम्ब वाङ्मयात पडले तर त्यात बिघडले कोठे ? स्त्री पुरुषाच्या एकमेकावरील प्रेमातूनच स्वार्थत्याग व पराक्रम जन्म पावतात. अशा स्वरूपाच्या ठरावाने आपल्या महाराष्ट्रीय समाजाची नाचक्की होत आहे. हा ठरावच मुळी क्षुद्र आहे. असा फाजील सोवळेपणा उपयोगी नाही अशा आशयाचे त्याचे भाषण झाले. त्याचा भाषणाचा व विशेषत त्याच्या शात वक्तृत्वाचा परिणाम श्रोतृसमाजावर, त्यातहि तरुण श्रोत्यावर फारच झाला. त्यानी आपली पसंति व्यक्तहि केली. या प्रतिपक्ष्याने ठरावाला उलट बाजूने चागलेच आदोलन दिले त्याच्या मदतीला तसाच एखादा बलवान विरोधक मिळता तर ? तर मूळ ठरावाचे काय झाले असते कोण जाणे ?

परंतु श्री शिखरे, प्रो. पटवर्धन, सौ उमाबाई सहस्रबुद्धे, स्वता ठरावाचे जनक श्री कृष्णराव मराठे या सर्वांना मोठ्या आवेशाने ठरावाची बाजू उचलून धरली विकारीवृत्ति निर्माण करणाऱ्या वाङ्मयाचा तीव्र निषेध केला आक्षेपाना उत्तरादाखल प्रो. पेंडसे याचें वक्तृत्व पुन गरजले तेव्हा साहजिकच विरोध दुर्बळ झाला व ठराव प्रचंड बहुमतानें मंजूर झाला संमतिदर्शक असा टाळ्याचा प्रचंड कडकडाट सभागृहात निनादला.

समेलन अधिवेशन विषयी श्रोत्य चें कौतुक आता ओसरू लागले. हळहळ मटळी जाऊंहि लागली

पुण्याच्या प्रो पोतदारानी परिषद-समेलन-समितीनं केलेलें कार्य व घटना समेलनाला सादर केली त्या प्रसगी त्यानी मोठे मार्मिक भाषण केलें परिषदेचे चिटणीस प्रो वाडेकर यानीं या प्रसगीं घटनेविषयी अविकृत खुलासा जाहीर केला या स्थलीं श्री शेंडे यास विरोध करावयाचा होता पण अध्यक्षानीं त्याना परवानगी दिली नाही श्री शेंडे यान। आपल्या सूचना कार्यकारी समिति पुढे माडाव्यात असें सूचविले संमेलनानें घटना मान्य केली

**पारितोषिकें**

२५ समेलनात झालेल्या काव्य गायनाबद्दल प्रो मायदेव, श्री. गोपानदेव चौधरी, श्री बोरकर याम पारितोषिके देण्यात आल कु सजीवनी मराठे यास काव्यगायन नैपुण्याबद्दल श्रीमत राजस्नुषा शकुंतलाराजे याचे खास पारितोषिक देण्यात आले.

**पुढाल आमंत्रण**

२६ नतर मुबईचे डॉ भालेराव व इदूरचे सरदार किबे यानी आपापल्या गावी पुढील समेलनास आमत्रण दिले, त्यापैकी इदूरचे आमचण स्वीकारण्यात आलें. याचवेळीं हिदीसाहित्यसमेलनातर्फे भाईसाहेब कोतवाल यानी सर्वास आमंत्रण दिलें

**अध्यक्षांचा समारोप**

२७ अधिवेशन सपत आलें सकाळपासूनच्या अखड कार्यक्रमामुळे व वेळ फार झाल्याने बरेच लोक निघून गेले होते अध्यक्षीय समारोपाचे वेळीं फारच थोडे लोक हजर होते अध्यक्षाचे भाषण मोठ्या कळकळीचे झाले त्यानी सर्वाचे आभार मानले कोणाचे मन न कळत दुखविलें गेले असल्यास क्षमा मागितली संमेलनाचे येरवीचे वैयर्थ्य पण अनुभवाचा शहाणपणा सागितला उदार वृत्तीचा अभाव दिसतो म्हणून खेद प्रदर्शित केला. तरुणाना उदार वृत्ति अगी आणण्याचा उपदेश केला व पुनश्च सर्वांचे आभार मानले

**आभार प्रदर्शन.**

२८ स्वागताध्यक्षानी सर्व प्रतिनिधींचे हार्दिक आभार मानले उभयता राजस्नुषानी समेलनाला हजर राहून विशेष शोभा आणल्याबद्दल कृतज्ञता व्यक्त केली. नंतर प्रतिनिधी पैकींहि अनेकानीं बडोदकराचे, स्वागतसमितीचे

आभार मानले. विशेषत स्वयमेवकाची निरलस कार्यतत्परता त्याचा आज्ञाधारकपणा इत्यादि गोष्टीचा जो ठसा प्रतिनिधींच्या अंत:करणावर उमटला होता त्याचा उद्गार अनेकांच्या तोंडून बाहेर पडला सर्वांनाच गहिवरल्यासारखे झाले तीन दिवसाचा हा वाङ्मय सोहाळा एकमेकाच्या गोड सहवासात सर्वांच्या सहकार्याने यथासांग पार पडला. तो संपल्याची एक गोड हुरहुर सर्वांना वाटू लागली संमेलन संपले असे अध्यक्षांनी जाहीर करताच ते निर्वेध संपल्याचा आनंद व संपले म्हणूनच खेद असा ऊनपाऊसाचा खेळ एकाच वेळ अनुभवावयास मिळाला

**मेजवानी**

२९ रात्री प्रतिनिधि निवासात जंगी मेजवानी झाली. पंगतीचा थाट मोठा प्रेक्षणीय होता वाजंत्र्याच्या मंजूळ आलापात, स्नेहीमंडळीशी गप्पागोष्टी करित प्रतिनिधींचे भोजन मोठ्या मौजेत आटोपले तो लगेच अनेक लोकांची जाण्याचाहि घाई सुरू झाली संमेलन संपले याला आणखी पुरावा तो कोणता हवा असणार ! पाहता पाहता प्रतिनिधि निवास रिकामा होऊ लागला. संमेलनाचे १९ वे अधिवेशन संपले

## संमेलनानंतर.

**वर्तमानपत्रीं वादळ.**

( १ ) संमेलना नंतर उठावयाचे ते वादळ नेहमी प्रमाणे वर्तमानपत्रात उठलेच वादावयाचा तो वाद माजलाच वर्तमानपत्रातून गमतीचे अहवाल, परीक्षणें, फलश्रुति, टीका, उत्तरें, शुद्धिपत्रें प्रसिद्ध होऊ लागली व शेवटीं ती सर्व थंडावली

**श्रीमंत सरकार महाराजासाहेबांची देणगी**

( २ ) मध्यतरी श्रीमंत सरकार महाराजा साहेब याचे कानी सर्व संमेलन वृत्तान्त गेलेलाच होता मराठी भाषेवरील श्रीमंताचे प्रेम व त्या भाषेचा अभिमान सर्वश्रुतच आहे आपल्या राजधानीत संमेलन मोठ्या यशस्वी रीतीने पार पडले याचा श्रीमंताना मोठा संतोष झाला. त्यांनी आपल्या नेहमीच्या उदारतेने संमेलनाला रुपये तीन हजारांची देणगी देऊन उपकृत केलें

**कार्यकारी मंडळाची बैठक**

३ ता ३-२-३५ सर्व कार्यकर्त्यांचे एकत्र श्रमभोजन झाले. व ग्रूपफोटो झाला ता. २४-२-३५ रोजीं संमेलनानन्तरची प्रथमची कार्यकारी मंडळाची बैठक झाली त्याप्रसंगी पुढील कामकाज झाले.

१. हिशेबनीस यानी समितीला सादर केलेले हिशेब मंजूर करण्यात आले

२ सभेनें आपलें कृतज्ञतेचें ऋण पुढीलप्रमाणे व्यक्त केलें —

" श्रीमंत सरकार महाराजा साहेब यानीं समेलनाला उदार देणगी देऊन संमेलनाला थोर सहाय केलें या बद्दल समेलनाची ही समिति आपली कृतज्ञता व्यक्त करित आहे. "

" बडोदे सरकारानीं संमेलनाला अनेक प्रकारचे सहाय करून समेलनाचें कार्य सुकर केले या बद्दल संमेलनाची ही समिति त्याचे मन पूर्वक आभार मानित आहे. "

" संमेलनाच्या कार्याला प्रत्यक्ष, अप्रत्यक्ष, शारीरिक, वा वाङ्मयिक वगैरे जी अनेक प्रकारची मदत करून संमेलनाचें कार्य यशस्वी करणेंस मदत केली त्याबद्दल समिति पुढील सद्गृहस्थाचे व सस्थाचे आभार मानित आहे

मे रा रा. सरन्यायाधीश साहेब
महाराणी चिमणाबाई हायस्कूल
न्यूईरा हायस्कूल.
श्री जुम्मादादा व्यायममदिर.
राजकवि चंद्रशेखर.
सौ. अपर्णाबाई देशपाडे.
श्री आपटे ( गायनशिक्षक )
कु इन्दुमती गुप्ते व बालिका
प्रो विनायकबुवा पटवर्धन.
बाई लक्ष्मीबाई जाधव.
अध-मूक विद्यालय.
हरि गोविद करंजगावकर.

३ संमेलनाच्या ठरावाची अमल बजावणी करणे करता सहाय म्हणून म. सा. परिषदेला रुपये दोनशे देणगी देणेचे मंजुर झाले.

४ संमेलनाची सर्व शिल्लक स्वागताध्यक्षाचे नावें बँकेंत ठेवणेंचे ठरले

५. अहवालाचा संपूर्ण खर्च झाल्यावर उरलेली शिल्लक सहविचारणी सभेला सोंपावी व तिचा विनियोग सभेच्या इमारत फंडाकडे करावा असें सूचवावें, असें ठरलें.

वरील कामकाज झाल्यावर मंडळाचे विसर्जन झाले फक्त स्वागताध्यक्ष व एक चिटणीस हे दोघे अहवाल लेखन व प्रसिद्धि एवढ्याकरिता ठेवण्यात आले

म सा परिषदेला रुपये दोनशे पाठविण्यात आले.

**" पुनरागमनाय "**

४ सर्वानी सहकार्य करून समेलन यशस्वी करणेस जीवाभावाने सहाय केल्याबद्दल स्वागताध्यक्षानी सर्वांचे व्यक्तिश आभार मानले स्वयसेवकाच्या उत्कृष्ट कामगिरी बद्दल त्याचाहि गौरव करण्यात येऊन त्याना प्रशस्तिपत्रे देण्यात आली. एवच अग मोडून स्वत. काम करणाऱ्या व इतराच्या कामाची व श्रमाची योग्य जाणीव असणाऱ्या व त्याचे चीज करणाऱ्या उदारमनस्क स्वागताध्यक्षाच्या नेतृत्वाखाली सर्वाच्या बिनमोल सहायाने व सहकार्याने आरभिलेले कार्य पार पडले व विसर्जनाचे वेळी " पुनरागमनायच " असा सर्वानी मत्र जपला.

---

# मराठी साहित्य संमेलन बडोदें.

## अधिवेशन १९ वें.

## ईशस्तवन

शारदे ! तव पदाब्ज नमुनि ॥
अभिनव मधुसुमनांजलि हे तुजसि वाहूं ॥
तव सन्मुख निज हृदयें रिचवुनि ॥
प्रसन्न तव मुख पाहूं ॥ धृ० ॥

कृपा करुनि निज सहाय्य करि तू ॥
अमुचे वाङ्मय करुनी संभृत ॥
प्रेमे पुरवि निजात्मज हेतू ॥ १ ॥

—राजकवि चंद्रशेखर.

---

## स्वागत-गीत

देत आनंद अजि विबुध जनवृंद हा ।
स्वागता सिद्ध मति होत मुदिना अहा ॥ धृ० ॥

अर्घ्य, माला, कुसुम । चंदन न पूजना ।
मान्यवर स्वीकरा । हृदयिच्या वंदना ॥ १ ॥

शारदोपासनीं । रमवुनी निजमना ।
सकल भावूं अंतां । सुयश संमेलना ॥ २ ॥

—सौ. अपर्णा देशपांडे.
जी. ए.

---

# मराठी साहित्य संमेलन बडोदें.

## अधिवेशन १९ वें

---

### संमेलनांत मंजूर झालेले ठराव

१ नागपूर येथें भरलेल्या संमेलनानंतर आजतागायत पुढे निर्दिष्ट केलेले व इतर जे साहित्यसेवक व साहित्याभिमानी निधन पावले त्यांच्या निधनानें मराठी भाषेची मोठी हानी झालेली आहे, याबद्दल या संमेलनास अतिशय दुःख वाटतें -

( १ ) श्री. संपतराव गायकवाड, ( २ ) श्री श्रीपाद कृष्ण कोल्हटकर, ( ३ ) श्री. बापूजी मार्तंड आंबेकर, ( ४ ) श्री. खंडेराव चिंतामण मेहेंदळे ( ५ ) श्री कृष्णाजी अर्जुन केळूसकर, ( ६ ) श्री श्री रा बोवडे (७) श्री वि रा चौगुले, ( ८ ) श्री नारायणराव भवानराव पावगी, ( ९ ) श्री अनंत नारायण भागवत, ( १० ) श्री त्रिंबकराव गोगटे, ( ११ ) श्री द ग सारोळकर, ( १२ ) श्री गणेश बळवंत आंबेगावकर

२ सरकारने पोस्टाचे दर वाढविल्यामुळे वाङ्मयप्रसाराच्या कार्यास व्यत्यय येत आहे, तेव्हा हे दर पूर्ववत करण्याविषयी हे संमेलन सरकारला आग्रहाची विनंति करीत आहे.

३ महाराष्ट्र विद्यापीठ लवकर स्थापन व्हावे अशी या संमेलनाची तीव्र इच्छा आहे एतदर्थ ‘ महाराष्ट्र युनिव्हर्सिटी असोसिएशन ’ प्रभृति संस्थाकडून व मंडळीकडून जे प्रयत्न चालू आहेत त्यास या संमेलनाचा पाठिंबा आहे. आणि जनतेनें व सरकारनें हें विद्यापीठ लवकर स्थापन करण्याची खटपट करावी अशी या संमेलनाची विनंति आहे

४ इंदूर आणि ग्वाल्हेर दरबाराकडून मराठी वाङ्मयाच्या पुरस्कारासाठीं दरसाल कांही रकमा खर्ची पडून लेखकाना जें चागलें उत्तेजन मिळे ते आता मिळत नसल्याचें पाहून या संमेलनास वाईट वाटत आहे. या दरबारानी आपल्या ग्रंथोत्तेजक कार्यास पुन सत्वर आरंभ करावा अशी त्यास या संमेलनाची विनंति आहे.

५. शुद्धलेखनसमितीच्या नियमांप्रमाणे यापुढे लेखक, संपादक आणि प्रकाशक यानी, तसेंच सरकार व विश्वविद्यालय यांनी आपलीं पुस्तकें छापावीं व नव्या शुद्धलेखनाचा प्रसार करावा अशी त्यांना या संमेलनाची विनंति आहे.

६. मराठींत प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक पुस्तकाच्या ज्या तीन प्रती सरकार प्रकाशकाकडून घेतें त्यांचा संग्रह करून व ग्रंथालय बनवून त्यांचा उपयोग अभ्यासकांस होईल अशी व्यवस्था सरकारनें करावी अशी या संमेलनाची सरकारास विनंति आहे.

७. मराठी भाषाभिवृद्धीचें कार्य 'महाराष्ट्र साहित्य परिषदे'स सतत व व्यवस्थित करितां यावें यासाठीं परिषदेला कचेरी आणि ग्रंथसंग्रह याकरितां कायमची जागा असणें जरूर आहे. तसेंच परिषदेचा कायमनिधीहि बराच मोठा असावयास पाहिजे. तरी धनिकांनीं साहित्यभक्ति ठेवून परिषदेला उदार द्रव्यसाहाय्य करावें अशी त्यांना या संमेलनाची आग्रहाची विनंति आहे.

८ 'महाराष्ट्र साहित्य परिषदेचे' कार्य व्यापक आणि सार्वमहाराष्ट्रीय होणें अत्यावश्य असल्यानें ठिकठिकाणच्या वाङ्मयसंस्थांनी परिषदेशी 'संलग्न' किंवा 'सहकारी' संस्था या नात्यानें संबंध जोडावा अशी या संमेलनाची त्यांना कळकळीची शिफारस आहे.

९. इतर भारतीय भाषांच्या संस्थांशी सहकार्य करून सर्व संस्कृतोत्पन्न भाषांसाठी देवनागरी लिपी नक्की करण्याकरितां एक समिति नेमावी व त्या समितीनें आपला वृत्तांत संमेलनांत सादर करावा.

१०. साहित्य संमेलनाचा एकत्र आणि सुसंगत असा इतिहास परिषदेनें अधिकारी लेखकाकडून लिहून घेऊन पुढील संमेलनापूर्वी प्रसिद्ध करावा.

११ संमेलनाचे साद्यन्त अहवाल महाराष्ट्र साहित्य पत्रिकेच्या अंकांत प्रसिद्ध करण्यांत यावेत व छपाईचा खर्च ज्या त्या संमेलनाच्या स्वागत मंडळाने सोसावा.

१२. महाराष्ट्रापासून दूर असलेल्या परप्रांतांतील खासगी मराठी शाळांस जनतेनें अल्प स्वल्प वार्षिक मदत देऊन त्यांच्या प्रयत्नांची बूज करावी.

१३. पूर्वीं ज्यांची मातृभाषा मराठी होती, परंतु आतां ज्यांनी इतर भाषांचा स्वीकार केला आहे अशा लोकांत मातृभाषेचें पुनरुज्जीवन करण्याकरितां परिषदेनें प्रचारकार्य अंगावर घ्यावें.

१४ महाराष्ट्र साहित्य परिषदेशीं संलग्न असलेल्या बेळगाव येथील 'वाङ्मय-चर्चामंडळ या संस्थेने नाट्याचार्य, नाटककार व नट कै. अण्णासाहेब किर्लोस्कर यांचें त्यांच्या जिल्ह्याच्या ठिकाणी म्हणजे बेळगाव येथे 'किर्लोस्कर मंदिर' बांधून कायमचे स्मारक करण्याचे योजिले आहे महाराष्ट्र साहित्याला अत्यंत उपयुक्त अशा नाट्यवस्तु व नाट्यग्रंथ यांच्या परिपूर्ण संग्रहाची जोड या स्मारक-मंदिरास देण्यात यावयाची आहे या योजनेस या संमेलनाचा पूर्ण पाठिंबा आहे.

१५ मुंबई विश्वविद्यालयाच्या प्रवेश परीक्षेच्या इंग्रजी शिवाय सर्व विषयांचे शिक्षण व परीक्षा मातृभाषेतून घ्याव्या अशी या संमेलनाची शिफारस आहे

१६ या संमेलनाला महाराष्ट्र साहित्यात शास्त्रीय ग्रंथांची अत्यंत उणीव भासत आहे व ही दूर करण्याच्या दिशेने चाललेल्या पुणे येथील महाराष्ट्र शास्त्रीय परिभाषा मंडळाच्या कार्याची माहिती त्यास असून शास्त्रीय ग्रंथांची वृद्धि होण्याकरिता हे संमेलन सर्व शास्त्रज्ञांना अशी विनंति करते की, प्रत्येक शास्त्रा वर माध्यमिक व उच्च शिक्षणक्रमात वापरता येईल, त्याचप्रमाणे ज्याचा स्वतंत्र अभ्यासाकरिता उपयोग करिता येईल असा एक ग्रंथ येत्या वर्षात त्या त्या शास्त्र-ज्ञांनी तयार करून प्रसिद्ध करावा, आणि हे संमेलन 'मुंबई विश्वविद्यालया'ला अशी विनंति करते की, सर्व शास्त्रांवर स्वतंत्र अभ्यासाकरिता मराठी भाषेत ग्रंथनिर्मिति होण्याची योजना मुंबईविश्वविद्यालयाने शक्य तितक्या लवकर करावी

१७ (अ) 'पेशवे दप्तरा' चे पंचेचाळीस खंड प्रसिद्ध केल्याबद्दल हे संमेलन मुंबई सरकारचे आभार मानीत आहे

(आ) पेशवे दप्तराच्या खंडाच्या किंमती या संमेलनाच्या मते फार भारी आहेत सबब हे संमेलन मुंबई सरकारास अशी विनंति करीत आहे की, त्यांनी सदर खंडाच्या किंमती एक रुपयास छापील दोनशे पृष्ठे या प्रमाणात आकारून सवलतीने सर्व लोकांस हे खंड उपलब्ध करून द्यावेत

१८ कीर्तनसंस्था ही एक साहित्यातील महत्त्वाची संस्था आहे आणि त्या संस्थेची जोपासना करण्याचे व तिला योग्य वळण लावण्याचे कार्य संमेलनाने करावे

१९ सन १९३२ च्या खानेसुमारीत खानदेशी अगर अहिराणी व कोंकणी या दोन प्रांतिक भाषा मराठीपासून पृथक् काढून त्या स्वतंत्र भाषा आहेत असें ठरविल्यामुळे मराठी भाषकांचे संख्याबळ घटणार यासाठी या प्रांतिक भाषा मराठीच्याच उपभाषा आहेत की नाहीत हे ठरविण्यासाठी या संमेलनाने तज्ज्ञांची एक समिति नेमून तिजकडून अधिकृत मत पुढील अधिवेशनाकरता मागवावे.

२०. वर्तमानपत्रांचा प्रसार वाढत आहे व लोकशिक्षणाचें साधन या दृष्टीने त्यांचें महत्त्व मोठें आहे. तेव्हां योग्य संपादकांचा पुरवठा व्हावा म्हणून एक वृत्तपत्रविषयक शिक्षणशाखा व पदवी चालवावी अशी मुंबई विश्वविद्यालयास या संमेलनाची शिफारस आहे.

२१. हें साहित्य संमेलन अखिल महाराष्ट्रांतील सर्व वर्तमानपत्रांना आणि नियतकालिकांना अशी सविनय विनंति करतें की, त्यांनी आपल्या वर्तमानपत्रांतून आणि नियतकालिकांतून सुबोध शास्त्रीय आणि औद्योगिक लेखांना प्रमुख स्थान अवश्य द्यावें.

२२. राष्ट्राच्या आकांक्षा व्यक्त करणाऱ्या व तरुण पिढीला मार्गदर्शक होणाऱ्या अशा ज्या राजकीय पुस्तकांवर, त्याचप्रमाणे कामगारांच्या हिताच्या दृष्टीने लिहिल्या गेलेल्या पुस्तकांवर सरकारने जे निर्बंध घातले आहेत त्या निर्बंधां-मुळे लेखन- मुद्रण व प्रकाशन-स्वातंत्र्याची पिछेहाट होत आहे. अशा वाङ्मया-वरील जप्ती उठवून व सदर निर्बंध सरकारने काढून घ्यावे असा प्रयत्न करण्यासाठीं हें संमेलन पुढील उपसमिति नेमीत आहे: (१) श्री वि. रा. शिंदे ( अध्यक्ष ), (२) प्रो धं. रा. गाडगीळ, (३) श्री. पां. वा काणे, (४) श्री. न. चिं. केळकर, (५) डॉ. गो. स घुर्ये, (६) प्रो. ना. के. बेहरे, आणि (७) श्री. य. रा. दाते ( चिटणीस )

२३. निर्मल आनंद व उदात्त भावना यांची जागृति हे सर्व ललित वाङ्मयाचें ध्येय आहे हें विसरून कित्येक लेखक क्षुद्र विकारांना चेतविणारें लिखाण कळत न कळत लिहीत असतात. अशा अनिष्ट लिखाणांचा हे संमेलन निषेध करीत आहे

मराठी साहित्य संमेलन, अधिवेशन १९ वे, बडोदे



श्रीमहाराणी चिमणाबाई हायस्कूल [ प्रतिनिधि–निवास ]

श्री

# मराठी-साहित्य-संमेलन.

## अधिवेशन १९ वें.

सन १९३४.

स्वागताध्यक्ष

राजरत्न जनरल नानासाहेब शिंदे

यांचें

# भाषण

मराठी-साहित्य-संमेलनाच्या या १९ व्या अधिवेशनाच्या सुप्रसंगीं मी आपले सर्वांचे अंत करणपूर्वक व आनंदाने स्वागत करतो आमच्या विनंतीस मान देवून आपण लांबलांबच्या ठिकाणाहून येथे आला, हे आमच्यावर आपले फार उपकार झाले आहेत या अधिवेशनानिमित्त सहविचारिणी सभेने स्वागतमंडळाची निवडणूक केल्यावर स्वागतमंडळाचे उपाध्यक्ष रा. ब. आबेगावकर व त्यानंतर अध्यक्ष श्रीमंत संपतराव गायकवाड हे उभयता कैलासवासी झाले, त्यामुळें स्वागतमंडळावर एक मोठी आपत्ति येऊन पडली या उभयताच्या निधनाची बातमी ऐकून, आजच्या संमेलनाचे नियोजित अध्यक्षही थोडे गडबडले त्यांना एका पत्रात ह्मटले आहे की, उपाध्यक्ष गेले, अध्यक्ष गेले आता मीच तेवढा बाकी राहिलो आहे, परंतु सहविचारिणी सभेने धीर न सोडता योजिलेले कार्य पुरे पाडण्याची तयारी करून, मला स्वागतमंडळाचा अध्यक्ष निवडून दिला ह्मणून मी हे कार्य पार पाडण्यासाठी आपल्यापुढे आज उभा आहे

**बडोद्यांतील पूर्वीची साहित्य-संमेलनें**

२ बडोद्यामध्ये पहिले साहित्य-संमेलन सन १९०९ मध्यें भरविण्यात आले होते. त्यानंतर दुसरें साहित्य-संमेलन सन १९२१ साली भरविले व या साली हे तिसरे साहित्य-संमेलन भरविले जात आहे गुजराथसारख्या महाराष्ट्रापासून दूरच्या मुलखात महाराष्ट्र-साहित्य-संमेलनाची ही तिसरी बैठक होत आहे, यावरून आह्मी आमच्या मायभाषेची सेवा किती आस्थेने व प्रेमाने करीत आहोत याची आपणा सर्वास चागली जाणीव होईल पूर्वीच्या दोन्ही संमेलनाच्या वेळी स्वागताध्यक्ष या नात्याने श्रीमंत संपतराव गायकवाड यांनी आपणा सर्वांचे स्वागत केल्याचे आठवतच असेल व काळाने थोडा धीर धरला असता, तर आजहि त्यांनीच आपले स्वागत केले असते प्रो पोतदारांनी मागील संमेलनाच्या वेळी ह्मटल्या प्रमाणे आज ते ‘ पसंतराव ’ आपले स्वागत करण्यास हयात नाहीत याबद्दल माझ्याप्रमाणे आपणासहि दु ख होईल परंतु असो. ही ईश्वराची मर्जी ! श्रीमंत सरकार महाराज साहेबाच्या बंधूंच्या

ऐवजी त्याचा एकं शिपाई गडी आपले आज स्वागत करीत आहे ते आपण गोड मानून घ्याल अशी मला आशा आहे

**सहविचारिणी सभा**

३ मराठी भाषेची सेवा करण्यासाठी येथे चाळीस वर्षापूर्वी सहविचारिणी सभेची स्थापना करण्यात आली तेव्हापासून ही सभा मराठी भाषेची सेवा करीत आहे दरवर्षी या सभेमार्फत वक्तृत्वसमारंभ केला जातो व बाहेर गावचे नामांकित विद्वान् गृहस्थास खास बोलावून त्याच्याकडून निरनिराळ्या विषयावर व्याख्याने देवविण्याची तजवीज केली जाते 'सहविचार' या नावाचे एक द्वैमासिकही विद्वान् संपादकाच्या देखरेखीखाली प्रसिद्ध करण्यात येते या मासिकात विविध विषयावर भारदस्त व उद्बोधक असे लेख प्रसिद्ध केले जातात या सभेमार्फतच पूर्वीची दोन व हल्लीचे तिसरे संमेलन भरविण्यात आले आहे. येथे 'जागृति' व 'कप्तान' अशी दोन मराठी वर्तमानपत्रे निघतात त्यापैकी 'जागृति' हे वर्तमानपत्र एक मराठे गृहस्थ आज अठरा वर्षे स्वत च्या हिमतीवर चालवीत आहेत हे त्यास भूषणावह आहे

**प्रांतिक-संमेलन**

४ मराठी भाषेची वाढ व्हावी व इतर प्रातातील विद्वानाच्या अनुभवाचा व विद्वत्तेचा लाभ मिळावा ह्मणून चार वर्षापासून येथे प्रातिक संमेलन भरविण्यात येत आहे व हीच प्रथा पुढे चालविण्याची येथील मंडळीची इच्छा आहे आमच्या प्रातिक समेलनाचे अध्यक्षस्थान प्रो वामन मल्हार जोशी, साहित्याचार्य नरसिंह चिंतामण केळकर, वरेरकर मामा व नारायण हरि आपटे अशा नामांकित विद्वान् मंडळींनी शोभविलें होते

**महाराजसाहेबांची दोन लाखाची देणगी**

५ सन १९१२ साली वडोद्यास चवथी गुजराथी साहित्यपरिषद भरली, त्या वेळी श्रीमंत सरकार महाराज साहेबानी अपल्या खानगीतून दोन लाख रुपयाची मोठी रक्कम विद्याखात्याकडे सोपली व तिच्या व्याजातून

(१) आपल्या प्रजेच्या बौद्धिकविकासाकारितां,

(२) हल्लीच्या व भावी प्रजेस वाचण्यालायक उत्तम पुस्तके मिळावी यासाठी,

(३) देशी भाषेच्याद्वारें उपयुक्त पुस्तकें प्रसिद्ध करण्यासाठी प्रकाशकांना प्रोत्साहन मिळावें,

म्हणून ही रक्कम देण्यात आली आहे गुजराथीबरोबर मराठी व हिंदी भाषाचाहि यात समावेश करण्यात आला आहे मोठ्या आनंदाची गोष्ट आहे की सन १९३४ अखेर श्री सयाजी–साहित्यमालेमध्ये २२० व श्री सयाजी–बालज्ञानमालेमध्ये १२७ मिळून ३४७ पुस्तके आजपर्यंत या रकमेच्या व्याजातून प्रसिद्ध करण्यात आली आहेत राज्याच्या विद्याधिकाऱ्याच्या देखरेखीखाली या प्रकाशनासाठी भाषांतर-शाखा स्थापन करण्यात आली आहे याशिवाय भारतवर्षांतील विद्वान पुरुषांना दरसाल बोलावून त्यांची व्याख्याने श्रीमंत सरकार महाराजसाहेब स्वत श्रवण करतात व आपल्या प्रजेसहि त्याचा लाभ देतात अशा विद्वान पुरुषांना पारितोषिके, वर्षासने वगैरेहि देण्यात येतात

**बडोदा सेंट्रल लायब्ररी.**

६. वाङ्मयाच्या दृष्टीने बडोदा सेंट्रल लायब्ररी ही संस्था मोठी महत्त्वाची समजली पाहिजे या पुस्तकालयात एक लक्षावर पुस्तके आहेत व या संस्थेचा सालिना खर्च एक लक्षावर आहे आलेल्या विद्वान् पाहुण्यांनी ही संस्था जरूर पहावी अशी मी खास शिफारस करतो या संस्थेची सर्व व्यवस्था अमेरिकन पुस्तकालयाच्या धर्तीवर, निष्णात अंमलदारामार्फत ठेवण्यात आलेली आपणास आढळून येईल नुकतेच युरोप अमेरिकेमधील पुस्तकालयाचा प्रत्यक्ष अनुभव घेऊन आलेले माझे तरूण व विद्वान् मित्र श्रीयुत वाकनीस हे आपणास पुस्तकालयाबद्दल लागेल ती माहिती या पुस्तकालया बद्दल देतील

**येथील प्राच्यविद्या-मंदीर**

७ बडोदे संस्थानातील दुसरी सांस्कृतिक संस्था म्हणजे प्राच्यविद्यामंदिर (Oriental Institute) ही होय या संस्थेचे उद्घाटन श्रीमंतानी स्वत केले व तिची जोपासनाहि मोठ्या आस्थेने चालविली आहे भारतवर्षाच्या राष्ट्रीय वाङ्मयाचे–संस्कृत भाषेचे–ही संस्था करीत असलेले कार्य महनीय आहे संस्थेतर्फे प्रसिद्ध होणारी सुविख्यात "गायकवाड प्राच्य ग्रथमाला" आज सुधारलेल्या सर्व जगात प्रसृत असून तिने संस्थानाला सर्व जगात अखंड कीर्ति प्राप्त करून दिली आहे अभ्यासयुक्त

सस्करणानतर अनेक पोथ्या, पुस्तके ही संस्था प्रसिद्ध करते प्राचीन हिंदी संस्कृति व इतिहास याना उपकारक अशी महत्त्वाची व अमोलिक साधने या मालेंतून प्रसिद्ध झाली असून, नष्टप्राय समजले गेलेले किती तरी ज्ञान या संस्थेंने विस्मृतींतून प्रकाशात आणिले आहे संस्थेच्या नावें ७० ग्रंथ प्रसिद्ध झाले आहेत या संग्रहात शातरक्षिताचा तत्त्वसंग्रह, अभिनवगुप्ताच्या टीकेसहित नाट्यशास्त्र, जावा आणि बली बेटातून मिळविलेली संस्कृत लिखिते, मीमासे-सारख्या प्रचंड ग्रंथाचे इग्रजी भाषातर, शबरभाष्य, राजशेखराची काव्यमीमासा वगैरेसारखे थोर थोर ग्रंथ असून इतरहि असेच प्रचंड व महत्त्वाचे ग्रंथ आहेत. यापैकी काहीचा समावेश काही हिंदी विश्वविद्यालयातून करण्यात आला आहे, ही आनंदाची गोष्ट आहे संस्कृत भाषा मराठी वाङ्मयाची माता असल्यानें तिचा येथे सहज उल्लेख केला आहे संस्थेच्या या कार्याबद्दल प्रो भट्टाचार्य यासच सर्व श्रेय दिले पाहिजे

९ सन १९२१ पासून या साल अखेरपर्यंत बडोद्यामधील लेखकानी खाली दिलेले ग्रंथ प्रसिद्ध केले आहेत

**बडोद्यांतील लेखकांनी प्रसिद्ध केलेले ग्रंथ**

(१) श्री दाजी नागेश आपटे यांनी " हिंदी सुमेरी संस्कृति " " इंद्रधनुष्य " व " नीतिशास्त्रप्रबोध " हे तीन ग्रंथ प्रसिद्ध केले.

(२) ग। चि वि जोशी यानी " संशयाचे जाळे व इतर गोष्टी, " " एरंडाचे गुऱ्हाळ, " " चिमणरावाचे चऱ्हाट, " " जातकातील निवडक गोष्टी " वगैरे ग्रथ प्रसिद्ध केले

(३) श्री वा वि जोशी याच्या " रोहिणी " " जन्माचा बंदिवास " या दोन कादबऱ्या व " सनत्कुमार " हे नाटक अशी तीन पुस्तके प्रसिद्ध झाली.

(४) जनरल नानासाहेब शिंदे याचे " मराठ्याच्या प्रसिद्ध लढाया " हें युद्धशास्त्रविषयक पुस्तक प्रसिद्ध झाले.

(५) प्रो वि पां दांडेकर यांची " आजच्या कळया, " " कळयांची माल, " ही दोन लघुकथाची पुस्तके, " चारित्र्यसुधा " नामक

कादंबरी, " केळकरांचीं सहा नाटके " हा टीकात्मक प्रबंध, " श्रीमंत सयाजीराव महाराज " व " अर्जुन " ही दोन चरित्रे व "निवृत्तिविनोद" हे भाषांतरित पुस्तक अशीं पुस्तकें प्रसिद्ध झालीं

(६) श्री वि. स वाकसकर याचे " तंजावरचे मराठी राजे " हें इतिहास विषयक पुस्तक प्रसिद्ध झाले

(७) श्रीमती आनंदीबाई जयवंत याचे " बाबूच्या लीला " हे छोटे पुस्तक व " कुलकथा " ही मोठी कादंबरी अशीं दोन पुस्तके प्रसिद्ध झाली

(८) श्रीमंती " कृष्णाबाई " याचा " मानमलहरी " नामक लघुकथा-संग्रह प्रसिद्ध झाला

(९) श्री सौ. इंदिराबाई आबेगावकर याची " हिरा हरपला " ही कादंबरी प्रसिद्ध झाली

(१०) श्रीयुत भाबुरकर याची " गंगालहरी, " " यवनीपरिणय, " " रामदासी, " व " कर्ण " ही पुस्तके प्रसिद्ध झाली

(११) सुप्रसिद्ध राजकवि चंद्रशेखर याचा " चंद्रिका " नामक कविता संग्रह प्रसिद्ध झाला

याच काळात " मुकुलिका, " " कलिका, " " पालवी " व " सुगी " असे अनेक कवींच्या कवितांचे छोटेमोठे संग्रह प्रसिद्ध झाले

(१२) मे माने पाटील यानी ' सीता " हा ग्रामसंघटनाविषयक कादंबरी प्रसिद्ध केली

(१३) श्री गणेश रंगनाथ दंडवते यानी " अर्वाचीन मराठी वाङ्मय, " " मराठी नाट्यकलेचा इतिहास " ही दोन पुस्तके प्रसिद्ध केली शिवाय नुकतेच त्यानी " अभिप्राय संग्राहक " नावाचे त्रैमासिकहि सुरू केले आहे

८ बडोद्यामध्ये खाली दिलेले शारदोपासक प्रसिद्ध आहेत.

**बडोद्यांमधील लेखक**

( १ ) ग्रंथकार —( १ ) रा दाजी नागेश आपटे, ( २ ) जनरल नानासाहेब शिंदे, ( ३ ) रा गणेश रंगनाथ दंडवते, ( ४ ) रा भाबुरकर, ( ५ ) प्रो चि वि जोशी, ( ६ ) रा कृ रा संत, ( ७ ) प्रो माणिकराव, ( ८ ) रा पां रा नंदुरबारकर, ( ९ ) प्रो वि. पा दाडेकर ( १० ) रा मं क नाडकर्णी

( २ ) कवि —( १ ) राजकवि चंद्रशेखर, ( २ ) भाबुरकर, ( ३ ) रा. संत, ( ५ ) रा गाङ्गेय, ( ६ ) रा सुरेश उर्फ पाटील, ( ७ ) सौ देशपांडे, ( ८ ) रा लिमये व ( ९ ) कै. देवासकर

( ३ ) लघुकथालेखक —( १ ) रा नातू, ( २ ) प्रो दाडेकर, ( ३ ) श्री आनंदीबाई जयवंत, ( ४ ) रा वा वि जोशी ( ५ ) प्रो देशपांडे, ( ६ ) रा पट्टणकर व ( ७ ) रा. मराठे

( ४ ) विनोदी लेखक —( १ ) प्रो चि वि जोशी व ( २ ) रा वि म जोशी

( ५ ) नाटककार —( १ ) कै विनायक जनार्दन कीर्तने, ( २ ) कै शंकर मोरो रानडे, ( २ ) रा भाबुरकर व ( ४ ) रा वा वि जोशी.

( ६ ) कादंबरीकार —( १ ) कै श्री सरदार भाऊसाहेब मुजुमदार, ( २ ) श्री आनंदीबाई जयवंत, ( ३ ) रा वा वि जोशी, ( ४ ) प्रो दाडेकर, ( ५ ) सौ इंदिराबाई आबेगावकर व ( ६ ) मे माने पाटील

( ७ ) इतिहासलेखक —( १ ) रा. सा सरदेसाई ( रियासतकार ) ( २ ) रा. वाकसकर, ( ३ ) जनरल शिंदे व ( ४ ) रा. दाजी नागेश आपटे.

( ८ ) स्त्रीलेखक व कवि —( १ ) श्री आनंदीबाई जयवंत ( २ ) सौ. वत्सलाबाई आबेगावकर, ( ३ ) सौ. इंदिराबाई

आबेगावकर, ( ४ ) सौ. वसुमती दिघे, ( ५ ) श्री. आनंदीबाई प्रभुदेसाई, ( ६ ) श्री काशीबाई हेरलेकर, ( ७ ) सौ अपर्णाबाई देशपांडे व ( ८ ) कु. रत्नप्रभा रणदिवे

यावरून आपणास कळून येईल कीं गुजराथमध्यें असलेले बडोदें वाङ्मय सेवेंत पुणे मुंबईच्या काही मागें नाहीं

**फुकट प्राथमिक शिक्षण**

१० प्राथमिक शिक्षण फुकट व सक्तीचे केलें पाहिजे बडोद्यामध्ये हा प्रयोग श्रीमंत सरकार महाराज साहेबांनी यशस्वी करून दाखविला आहे बडोद्याचें उदाहरण खालसा मुलखात व बृहन्महाराष्ट्रात का सुरूं करण्यांत येऊं नये ? रयतेने सरकाराजवळ संघशक्तीने ही मागणी केली पाहिजे कित्येक ठिकाणी असें शिक्षण सुरूं केलें आहे, परंतु ते अपवादादाखलच ह्मटले पाहिजे. सर्व ठिकाणीं असे शिक्षण सुरू केले पाहिजे. बडोद्यामध्यें असे शिक्षण सुरू केले असल्यानें शाळेत जाण्यायोग्य वयाच्या मुलात शिक्षणाचें प्रमाण शेंकडा ८५ आहे.

**विश्वविद्यालयामध्यें मराठीचा प्रवेश**

११ विश्वविद्यालयामध्यें, मराठी भाषेचा प्रवेश अजून जसा व्हावा तसा झाला नाही. म्यॅट्रिक-पर्यंत झाला आहे व नंतर कॉलेजमध्ये एकदम बी ए करता हा विषय घेता येतो. मधल्या वर्गात हा विषय नसल्यानें, ज्याना संस्कृत किंवा इतर मृत भाषा चागल्या अवगत करता येत नाहीत, अशा विद्यार्थ्यांची फार कुचंबणा होते नागपूर विद्यापीठाने या बाबतींत आघाडी मारली आहे याबद्दल त्याचे अभिनंदन करावे मुंबई विश्वविद्यालयानें याचें अनुकरण का करूं नये हे समजत नाही ही अडचण जितकी लवकर दूर होईल तितकी चागली याकरितां आपल्या सारख्या विद्वानानीं जोराचे प्रयत्न केले पाहिजेत.

**शिक्षणासाठी मराठी माध्यम असावें**

१२ कॉलेजमधील शिक्षणसुद्धा मराठींत दिले पाहिजे इंग्रजी भाषेच्या विषयाखेरीज बाकीचे विषय मराठीमधून शिकविले पाहिजेत हिंदुस्थानातच असे शिक्षण इंग्रजी मधून म्हणजे परक्या भाषेतून दिलें जाते इंग्लंडमधील जी मुलें हिंदुस्थानात शिकत असतात त्यास जर हे शिक्षण मराठीमधून देण्याबद्दल कोणी जबरदस्ती केली तर त्यास हे शिक्षण कितीसे आवडेल व कितीसे समजेल याची वानवाच आहे. मग ही जबरदस्ती आमच्यावर का करण्यात यावी हें समजत नाही असे शिक्षण देण्यास मुख्य अडचण अशी पुढें करण्यात येते की या विषयावर मराठीमध्ये पुस्तके तयार नाहींत व शास्त्रीय परिभाषा अद्याप ठरली नाही ही अडचण ह्मणण्यासारखी नडेल असे वाटत नाही असें शिक्षण मराठीमधून देण्याची व्यवस्था करा ह्मणजे त्या त्या विषयावर मराठीमध्ये पुस्तकें आपोआपच तयार होतील. पुण्याच्या महिला विद्यापीठामध्ये ही प्रथा त्यानी पाडली आहे बडोद्यामध्येहि कलाभुवनच्या विद्यार्थ्यांस शास्त्रीय विषय देशी भाषातून शिकविण्याची व्यवस्था कै प्रो गज्जर यानी केली होती विश्वविद्यालयाच्या सिनेट सिंडिकेटमध्ये आमचीच मंडळी असतात त्यानी हें काम केले पाहिजे निदान दुय्यम शिक्षणामध्ये तरी मातृभाषाच माध्यम असावी असा नियम करणे कठीण नाही

**देवनागरी लिपीचा प्रचार करणें**

१३ मराठी, गुजराथी, हिंदी व बंगाली या चार भाषा अगदी जवळजवळच्या आहेत मराठीचा आणि गुजराथी भाषेचा संबंध आजकालचा नाहीं, तर ज्यावेळी गायकवाड गुजराथेत उतरले व त्यांनी सोनगढचा किल्ला बांधून गुजराथ प्रात काबीज केला त्या वेळेपासून मराठीचा संबंध गुजराथी भाषेशी आलेला आहे गुजराथमधील सुशिक्षितवर्ग पूर्वी व्रजभाषा ( हिंदी ) वापरीत असत बंगाली भाषा जरा लांबची आहे या चारी भाषांचे ज्ञान संपादन करण्याची एक सोपी युक्ति ही आहे की, या चारी भाषातील वर्तमानपत्रे, मासिकें व प्रसिद्ध होणारी पुस्तकें देवनागरी ( ह्मणजे बालबोध ) लिपीत छापण्यात यावीत बाळबोध लिपी या चारी भाषासाठी वापरण्यास काहीएक हरकत नाही बडोदेंराज्याची गुजराथी आज्ञापत्रिका बाळबोध लिपीत छापण्यात येते. कित्येक विद्वान गुजराथी ग्रंथकारानी आपले ग्रंथ बाळबोध लिपीत छापून प्रसिद्ध केले आहेत. देवनागरीच्या ऐवजी

हिंदुस्थानात सर्व भाषासाठी रोमन वर्णमाला सुरू करावी ह्मणून मि लतीफ नावाचे गृहस्थ फार जोराची चळवळ करित आहेत. फौजेंतील कवाइतीची पुस्तके हिंदी किंवा उर्दू वर्णमालेमध्ये न छापता अलीकडे रोमन वर्णमालेमध्ये छापण्याचा प्रयत्न सुरू करण्यात आला आहे ही रोमन वर्णमालेची पद्धत कोणास पसंत पडणार नाही, हें सागण्याची काही जरूरी नाही

**पारिभाषिक शब्दांचा कोश**

१४ या चारी भाषाना दुसरी एक मोठी अडचण उत्पन्न होईल ती पारिभाषिक शब्दासंबधीची होय परंतु या चारी भाषातील विद्वान एकत्र होऊन त्यानीं जर पारिभाषिक शब्द नक्की केले तर या चारी भाषाचे ऐक्य होण्यास पुष्कळ साधन होईल हिंदी नागरी प्रचारिणी सभेने या दिशेने प्रयत्न करून असा एक कोश तयार केला आहे बंगालीनेहि असा कोश तयार केला आहे मराठी व गुजराथी भाषामध्ये मात्र असे कोश तयार करण्यात आले नाहींत, त्याकडे विद्वानानी लक्ष द्यावे अशी माझी सूचना आहे श्रीमत सरकार महाराज साहेबानी " श्री सयाजी शासन शब्द कल्पतरु " या नावाचा एक नऊशे पानाचा कोश इग्रजी, गुजराथी, मराठी, संस्कृत, उर्दू, पार्शीयन, हिंदी आणि बंगाली मिळून आठ भाषानमध्ये सर न्यायाधीश न्यायमूर्ति धुरंधर याचे धुरीणत्वाखाली एक समिति नेमून तयार करविण्यात आला आहे, तो विद्वानानी जरूर पहावा दरेक भाषेमधल्या चागल्या पुस्तकाची दर वर्षी एक सूचि तयार करण्यात येऊन ती एकमेकाकडे पाठविण्याची तजवीज करीत जावी ह्मणजे अत्यंत चागल्या पुस्तकाची भाषातरे दुसऱ्या भाषेत करण्यास मदत होइल परस्पराच्या भाषेतील अभिजात ग्रंथाची भाषातरे करणारी एखादी मध्यवर्ती संस्था स्थापन करावी अशीहि एक सूचना ता २३ नोवेबरच्या केसरीत करण्यात आली आहे, तिचाही आपण विचार करावा.

**चारीभाषांची महा-परिषद भरविणें**

१५ दर वर्षी या चारी भाषाच्या परिषदा भरतात या परिषदासाठी वरील भाषाच्या परिषदाच्या चालकास सहकार करण्यासाठी, प्रतिनिधि पाठवून आपल्या अडचणी व सूचना या परिषदापुढे माडण्यासाठी खास आमन्त्रणे करण्यात आली होती त्याप्रमाणे प्रतिनिधि आले आहेत व त्यानी काही सूचनाहि केल्या आहेत, त्याचा विचार योग्य वेळीं

करण्यांत येईल. या चारी भाषाची एक महापरिषद दोनतीन वर्षांनी भरवीत जाऊन विचारविनिमय करण्याबद्दलहि येथील एका विद्वानाने सूचना केली होती, तिचाही आपण विचार कराल अशी आशा आहे

**बडोद्यांत होणारी हिंदी राज्यभाषा**

१६ श्रीमंत सरकार महाराजसाहेबानी हिंदी भाषा ही राज्यातील सर्व व्यवहाराची भाषा सन १९३५ सालापासून करण्याचे ठरविले आहे यामुळे मराठी, गुजराथी व हिंदी या तीन भाषा एकमेकीच्या अगदी निकट संबंधात येतील बडोदे राज्यातील रयतेस तो मराठा असेल तर मराठी व गुजराथी असेल तर गुजराथी ही मातृभाषा शिकल्या शिवाय सुटकाच नाही हिंदी ही राज्यभाषा झाल्याने तीही व्यवहाराकरिता शिकणे भाग पडेल ह्मणजे या तीन्ही भाषाचे संबंध अगदीं निकट होतील.

**कला आणि नीति**

१७ हल्लीच्या वाङ्मयामध्ये कला आणि नीति याच्यामध्ये मोठे झगडे चालले आहेत कलेच्या बुरख्याखाली नीतीची विटंबना करून तिला पायाखाली तुडविण्याचा प्रयत्न कित्येक लेखकाकडून होत आहे कलावंत लेखक ह्मणतात की, आह्माला नीतीचा सासुरवास नको. आह्मास वाटेल ते आह्मी लिहूं आणि नीतीचा सासुरवास झुगारून देऊं कित्येक लेखक विवाह संस्थेच्या विध्वंसाचे, स्वैरगमनाच्या समर्थनाचे उघड उपदेश करीत आहेत नवमतवादी लेखक बंधनाच्या पलीकडे, अटकेपार, सीमोल्लंघन करण्याकडे प्रवृत्त झाले आहेत, त्यांना काही आळा घालण्याचा प्रयत्न सुज्ञानी अवश्य केला पाहिजे राघोभरारी सारखी मुलुखगिरी करून अटकेपार सीमोल्लंघन करण्याची धडाडी जर त्यानी दाखविली तर मी त्याचे खास अभिनंदन करीन हे व्यक्तिस्वातंत्र्य अतिशय बोकाळत चालले आहे त्याला वेळीच पायबंद घातला पाहिजे प्रो वामन मल्हार जोशी यानी ह्मटले आहे की " कलेची तहान भागविण्यासाठी नीतीच्या नरडीचा

घोट घेणे बरोबर नाहीं " हे तत्त्व नवमतवाद्यानीं जरूर लक्षात ठेवून त्याप्रमाणें आपल्या कलेचा विकास करावा अशी माझी त्यांस नम्रपणें सूचना आहे.

**अश्लील वाङ्मय**

१८ आधुनिक मराठी वाङ्मयात समाजातील सभ्य आणि शिष्ट मनोवृत्तीला न रुचणारे असे जे अश्लील, अनीतिकारक आणि अधर्मप्रेरक लिखाण उत्पन्न होत आहे आणि झपाट्याने वाढत जात आहे त्याचा वेळीच निषेध करून त्याला आळा घालण्याकरिता पुणे येथे मागील महिन्यात मराठी वाङ्मय-परिषद भरविण्यात आली होती या परिषदेमध्ये एक ठराव असा करण्यात आला आहे की, " मराठीमधील अनैतिक व अश्लील वाङ्मयाचा सर्वतऱ्हेने प्रतिबंध करणे अवश्य असताना, महाराष्ट्र साहित्य संमेलनासारख्या जबाबदार संस्थेच्या सन १९३२ व ३३ च्या अधिवेशनात, या दृष्टीनें जरूर ते ठराव पास होऊ शकले नाहीत याबद्दल ही परिषद पूर्ण नापसंती व्यक्त करीत आहे आणि सदर संमेलनाच्या येत्या अधिवेशनात अशा प्रकारचा ठराव मंजूर करण्याबद्दल ही परिषद त्या साहित्य संमेलनास शिफारस करीत आहे " हा ठराव आता या साहित्य-संमेलनापुढे येईल या ठरावावर साहित्याचार्य नरसिंह चिंतामण केळकर यांनी दोन्ही बाजूंचा विचार करून केलेले भाषण मननीय आहे असे मला वाटते या भाषणाचा आपण सर्वांनी चांगला विचार करावा व हा ठराव पुढे ठेवून मंजूर करून घ्यावा किंवा श्रीमंत औंधकर यांनी सुचविल्याप्रमाणे अशा लेखकाना आजारून गोजारून शुद्धीवर आणण्याचा प्रयत्न करावा हे ठरवावे

**बडोद्यांतील होऊं घातलेली विद्वत्-परिषद**

१९ बडोदे येथे मराठी व गुजराथी या दोन भाषाकरिता श्रीसयाजी विद्वत् परिषद (Shri Sayaji Academy) स्थापन करण्याची श्रीमंत सरकार महाराजसाहेबांची इच्छा आहे. या विद्वत् परिषदेचे मुख्य उद्देश असे आहेत —

१ पुढीलपैकी कोणत्याहि विषयावरील मागील दोन वर्षातील उत्कृष्ट ग्रथकर्त्याचा सन्मान करणे

( अ ) भाषा व वाङ्मय.

( ब ) प्राचीन इतिहास व वाङ्मय

( क ) धर्म व तत्वज्ञान.

( ड ) राजनीतिशास्त्र व समाजशास्त्र

२ असा सन्मान पुढील गुणावरच होऊं शकेल

( अ ) ग्रथ स्वतत्र ( original ) असावा

( ब ) ग्रंथातर्रा उत्तम नीतितत्त्व प्रतिपादिलेले असावे

( क ) ग्रथाचा पुरस्कार परिषदेकडे कोणा थोर प्रसिद्ध व्यक्तीने केलेला असावा.

३ गतसालातील थोर व अत्यंत महत्त्वाच्या ग्रथावर परीक्षणे व अभिप्राय तयार करणे व ते परिषदेच्या नावे पुस्तकरूपाने प्रसिद्ध करणें

४ उत्कृष्ट ग्रंथापैकी काहीना प्रशस्तिपत्रे देणे व प्रशस्तिपत्रात ग्रथातील विशेषगुणाचा स्पष्ट उल्लेख करणे

५ प्रत्येक भाषेच्या विद्वत्परिषदेंत एकंदर सहा सभासद राहतील, त्यातील किमान दोन स्थानिक ( बडोद्याचे रहिवासी ) असतील या सहा सभासदाना काही वार्षिक सन्मानवेतन ( Honorarium ) मिळेल त्यांचे सभासदत्व यावज्जीव राहील

६ परिषदेच्या कार्याकरिता सभासदाची बैठक वर्षातून दोन वेळ भरेल.

अशी ही योजना करण्याचे बडोद्यामध्ये घाटत आहे यासंबंधी संमेलनासाठी जमलेल्या विद्वान मंडळींनी काही सूचना करणे असल्यास त्या स्वागतमंडळाच्या अध्यक्षाकडे जरूर पाठवाव्यात.

**महाराष्ट्र विद्यापीठाबद्दल बडोद्याची सहानुभूति**

२० महाराष्ट्र विद्यापीठाची स्थापना करण्याकरिता महाराष्ट्रात जे प्रयत्न चालू आहेत त्याबद्दल बडोद्याची पूर्ण सहानुभूति आहे या विद्यापीठामध्ये मराठी बोधभाषा असावी परीक्षाहि मराठी भाषेमधून घेण्यात याव्यात

२१. शेवटी, आपण सर्वजण आता आजच्या नियोजित विद्वान अध्यक्षाचे भाषण ऐकण्यास फार उत्सुक झाला असाल म्हणून मी आपले पुन्हा एकदा स्वागत करून भाषण पुरे करतो

---

श्री.

# मराठी साहित्य संमेलन

## अधिवेशन १९ वें, बडोदें.

---

सन १९३४.

---

अध्यक्ष

## रा. सा. नारायण गोविंद चापेकर

बी. ए एल्एल् बी.

## यांचें भाषण.

---

## स्वागताध्यक्ष, संमेलनाचे प्रतिनिधि व मराठी भाषेचे अभिमानी बंधूभगिनींनो,

### आभारांजलि

आपण आज मला ह्या आसनावर उभे करून बोलावयाला लाविले ह्याबद्दल मी आपला अत्यंत आभारी आहे कल्पनेचीं पिसें लावून खपुष्पाकरता उच्च भराऱ्या मारणाऱ्या प्रतिभावान् कवीन्या मनोराज्यात हि कधी न येणारी गोष्ट आज घडून आली ह्याचे सर्व श्रेय आपणाकडे आहे मराठी भाषेचा पाईक म्हणून म्हणवून घेण्याचा हक्कहि विद्यादेवीच्या मदिरात मला कोणी सागू देणार नाहीत. महाराज, मी नाटक लिहिले नाही, कादंबरीकार बनलो नाही, काव्यस्फूर्ति मला कधी झाली नाही, फार काय पण एखादी चिमुकलीशी लघुकथाहि लिहिण्याचा पराक्रम मला करता आला नाही असे असून आपण मला हा मान दिला ह्याबद्दल मी आपला द्विगुणित आभारी आहे परपरेच्या अवहेलनेच्या ह्या काळात आपण परपरा झिटकारली हे ह्या काळाच्या स्वभावाला अनुरूप असले तरी ह्या प्रसगाला युक्त आहे की नाहीं ह्याबद्दल शका घेणे रास्त होईल. मित्र हो ! आजपर्यंत झालेल्या अध्यक्षाकडे पहा सस्थानिक व सरदार वगळल्यास, नाटककार, कादबरीलेखक अथवा कवि ह्या व्यतिरिक्त दुसऱ्या कोणासहि हे अध्यक्षपद लाभले नाही. गोविदराव कानिटकर, महाजनी, कीर्तिकर, आगाशे हे कवि, हरिभाऊ आपटे, डॉ केतकर, व वामनराव जोशी हे कादंबरीकार आणि श्रीपाद कृष्ण कोल्हाटकर व कृष्णाजी प्रभाकर खाडीलकर हे नाटककार आपणा सर्वांच्या परिचयाचे आहेत ह्या शिवाय श्री नरसिह चितामण केळकर, चितामणराव वैद्य व शिवरामपंत पराजपे हे कोठेहि बसण्यासारखे आहेत हे आपणास सागावयास नको बापूजी अणे ह्यानी गाधीच्या उपोषणाच्या पारण्याच्या दिवशी संस्कृत कविता करून म्हणून दाखविली ह्यावरून त्याच्या अंगी अप्रकट असलेली काव्यशक्ति ग्वाल्हेर येथे जमलेल्या साहित्यभजकास प्रकट झाली होती ह्यात सशय नाही आता दादा-

साहेब करंदीकराना पुढे करून माझ्या सिद्धाताला हरताळ फासण्याचा आपण प्रयत्न कराल पण त्यातहि आपणास यश लाभणार नाही दादासाहेबाचा बहुश्रुतपणा विख्यात आहे पण ते एक चागले कवि आहेत ही गोष्ट माझ्याकडून प्रथम ऐकून कित्येकाना आश्चर्य वाटेल तथापि त्याची रोजनिशी जेव्हा प्रसिद्ध होईल तेव्हा नुसत्या मराठींतच नव्हे तर संस्कृत व इंग्रजी ह्या दोन भाषात सुद्धा ते लीलेनें काव्य करूं शकतात ह्याचा आपणास प्रत्यय येईल. अशा ह्या त्रिविध भाषेत काव्य करणाऱ्या चतुरस्त्र पडिताला महाराष्ट्र साहित्य समेलनाचा पहिला अध्यक्ष होण्याचा मान मिळाला हे योग्यच झाले इ स. १९०७ साली भरलेल्या संमेलनाचे पहिलें अध्यक्ष आज आपणामध्ये आहेत व त्याचा वाङ्मयीन व्यवसायवृक्ष आता पल्लवूं लागला आहे हा सर्व प्रकार आपणा सर्वांस अभिमानास्पद आहे असे मला वाटते असो सागण्याचें तात्पर्य असे की, सामान्य माणसातून अध्यक्ष निवडले गेले ते सर्व नाटककार, कादबरीकार किंवा कवि ह्यापैकी कोणीना कोणी तरी होते तेव्हा अध्यक्षाचे वर्ग पाडले असता श्रीमंत सयाजीराव महाराज, श्रीमंत बाळासाहेब मिरजकर, व सरदार माधवराव किबे ह्याच्या वर्गात आपण मला न कळत का होईना घातले ह्याबद्दल मी आपला शतगुणित आभारी आहे महाराज ! जनता ही काव्यावर नेहमीच फिदा असते एक संस्कृत कवि म्हणतो : मीमासानिपुणं नपुंसकमिति ज्ञात्वा निरस्तादरा। काव्यालंकरण प्रगल्भ जनता नूनं वृणीते स्वयम् ॥

## जलांजलि

उत्पन्न झालेल्याचा लय व्हावयाचाच हा जरी जगाचा न्याय व नियम असला तरी त्यापासून होणारी हानि कमी तीव्र होते असे नाही श्रीपाद कृष्ण कोल्हटकर ह्याच्या मृत्यूने मराठी वाङ्मयावर पडलेली निशेची छाया कोणते रवि केव्हा घालवितील हे आज सागतां येत नाही. काव्य आणि पाडित्य ह्याचे साहचर्य क्वचित् आढळते श्री. कोल्हाटकर हे नुसते शब्दोपासक नव्हते त्यांच्या लिखाणाला विचाराचें अधिष्ठान असे. खऱ्या विद्वानाला शोभणारा सज्जनपणा त्याच्या मध्ये होता. शिवाय हल्ली दुर्मिळ असलेला गुण ह्मणजे गुणग्राहकता हा त्याच्या ठिकाणीं प्रामुख्याने आढळून येई सुसस्कारानी शुद्ध झालेल्या बुद्धीचा हा प्रभाव आहे. “ शुद्धा हि बुद्धिः किल कामधेनुः ” ह्यानंतर आद्य शिवचरित्रकार श्री कृष्णराव केळूसकर हे हि कालवश झाले. सरदार खंडेराव चिंतामण मेहेंदळे हे लेखक म्हणून जरी जनते पुढे फारसे आले नाहींत तरी ते अत्यंत मार्मिक व दक्ष वाचक होते ह्याचा प्रत्यय त्याच्या स्नेह्याना

वारंवार येई लेखकाना त्याचा फार उपयोग होत असे. काव्यशास्त्रविनोदाचा पुरस्कार करणारे बापुराव आबेकर ह्याचाहि वियोग आपणास जाणवल्यावाचून राहणार नाही आपल्या नियमितपणाने ह्या लोकीं ८० वर्षे राहून नुकतेच कालवश झालेले नारायण भवानराव पावगी हे नवीन पिढीला त्याच्या "भारतीय साम्राज्य" ह्या ग्रथावलीनेच कदाचित माहीत असतील मुलकी खात्यात इमाने इतबारे दगदगीची नोकरी करून आर्यांच्या संस्कृतीचे उज्वल स्वरूप व्यक्त करून दाखविण्याचना इच्छेने जवळ जवळ खडीभर पुस्तके लिहिणाराचा देशाभिमान किती दाडगा असला पाहिजे ह्याची कल्पनाच केली पाहिजे. अशा गुणी माणसाच्या ठिकाणीं सरकारला अवगुण दिसून त्याचे पेनशन काटलें जावे हा विचार मनात आला की मन उद्विग्न होते हा संमेलनाच्या बाहेरील प्रदेश यमराजाने लुटला त्याप्रमाणें आपल्या समेलनावरहि हात मारण्यास त्यानें कमी केले नाही श्रीमंत सपतराव गायकवाड ह्याच्या निधनाने एक सात्विक, विद्याभिलाषी व प्रेमळ स्नेही व सल्लागार आपणातून गेला ही महाराष्ट्राची मोठीच हानि झाली दि ब आबेगावकराच्या मृत्यूने नौकानायक नाहीसा झाला त्यामुळे ह्या स्वागतमंडळावर ऐन वेळीं कडेलोटीची आपत्ति कोसळली ह्यात शका नाही परमेश्वर कृपेने योग्य व लायक कर्णधार ताबडतोब मिळाल्यानेच पुढील प्रवासास शीड उभारून नौका सज्ज करता आली. असो "क काल लघितु क्षम" असे मानून स्वस्थ बसणे भाग आहे ह्या सर्वांना मी अत्यत नम्रपणे व नमनपूर्वक जलदान करितो.

**महाराजांची आस्था**

बडोदे शहरात म सा संमेलन तिसऱ्यादा भरत आहे पुणे शहर हे म. सा परिषदेचे माहेर मानले तर बडोदे हे तिचे मावस घर समजले पाहिजे. श्रीमंत सयाजीराव महाराज ह्याच्या आस्थेमुळे माय मरो पण मावशी जगो ह्या म्हणीतील सत्याश साहित्यभक्ताना पटू लागला आहे. महाराजाच्या विषयी त्याना आपलेपणा वाटतो महाराजाचे गुणवर्णन माझ्या सारख्या नीरस माणसाकडून होणे अशक्य आहे. पंचवीस वर्षापूर्वी डॉ. कीर्तिकरासारख्या कवीने केलेल्या वर्णनापुढे माझे कोणतेहि शब्द सपकच ठरतील ह्मणून त्या भानगडीत न पडता मी एवढेच म्हणतो की, डॉ. कीर्तिकराचे गुणवर्णन गुणिले पंचवीस मिळून जो गुणाकार येईल तेच माझे गुणवर्णन. श्रीमंत महाराजानी अशी दिशा व्यापली आहे की "उत्तमवागर्थ" आम्हास बडोद्याचा आश्रय करणे भाग आहे बडोदें हें मुंबई पुण्याच्या उत्तरेस आहे. कौषीतकी ब्राम्हणात ( १-७-६ )

प्रज्ञानंतर वाणीकरता उत्तर दिशेची प्रशंसा केलेली आहे " उदीच्या दिशि प्रज्ञानतरा वागुत्पद्यते. उदञ्चउ एव यन्ति वाचं शिक्षितुं योवा तत आगच्छति तस्य वा शुश्रूषति इतिहस्मा हैषा हि वाचो दिक् प्रज्ञाता " ह्यावरून दक्षिणे-पेक्षा उत्तरेकडे आमचे तोड का वळते हें आपल्या लक्ष्यात येईल. आनंदफंदीला आश्रय देणाऱ्या गायकवाडाची ही परंपरा आजहि चालू असलेली पाहून आनद होतो

**मराठी गुजराथी भाषा**

मराठी भाषा बोलणारे राजघराणे व गुजराथी भाषा बोलणारी प्रजा हा काकतालीय योग नसून त्यात ईश्वरी इच्छा व्यक्त होत आहे दोन्ही भाषा बोलणाराची संस्कृति एकच आहे एवढेच नव्हे तर दोनहि भाषा सख्या बहिणीप्रमाणे आहेत कानासारखे काही संस्कृतोद्भव शब्द एकाच स्वरुपात दोनहि भाषात अवतरलेले आढळतात. गुजराती हेठळ=नीचे=खाली ह्यातील हेट शब्द मराठी हेटकरी ह्या शब्दात आपणास भेटतो व हिंदी भाषेचे ऋण उभय भाषानी सारखेच उचललें आहे ही गोष्ट आपल्या प्रत्ययास आणतो रेल व चेल हे एकाच अर्थाचे दोन हिंदी शब्द त्यापैकी रेल हा एक गुजराथीने उचलला आणि मराठीने तोच अर्थ व्यक्त करण्याकरता दोनहि शब्द वापरण्यात परपरा पाडली द्विगुणीभवनाची चटक लागलेल्या मराठीला गुपचुप शब्द प्रिय होतो तर गुजराती त्यातील एका चुप शब्दावरच संतुष्ट होते. अखत्यार, ताजवा, नाबूद इत्यादि फारसी शब्द दोनहि भाषात समस्वरूप असणे साह-जिकच आहे, काही शब्दप्रयोगावरून मराठी गुजराथीचे साहचर्य एके काळी किती दृढ होते हे मनावर चागले ठसते उ व्याली हा विद्यमान गुजराथीत प्रयुक्त असलेला शब्द स्त्रियाच्या सबधात योजिलेला जुन्या मराठीत हि आढळतो (पुत्र व्याले पाच जण गुरुचरित्र) ह्याच गुरुचरित्रात गुजराथी " आवड " शब्द त्याच अर्थाने वापरलेला पाहून संशोधनाचा एक निराळाच मार्ग आपणास सापडला असे वाटूं लागते उ. शबरी सागे पतीसी । आपणास आवड आहे ऐसी । अग्नि लाविता घरासी । निद्रिस्थ झाले " (अ ४० ओवी १०७), गुजराथी बे (दोन) शब्द मराठीने आपल्या पाढ्यात (बेचाळीस) व परवच्यात (बे दुणे चार) बेमालूम रीतीने सामील करून घेतला आहे. जुन्या मराठीतील प्रथमेच्या एक वचनाचा उ प्रत्यय जुन्या गुजराथींतील संसारु विवेकीउ वगैरे शब्दात असल्याचे रमणभाईनी आपल्या निदर्शनास आणून दिले

आहे. मराठीप्रमाणेच गुजराथींत भू धातूचे हो हें रूप होतें, उ प्रत्ययासारखा प्रचलित गुजराथी ओ प्रत्यय आपलाच जुना मराठी आहे हे आपल्या सहज लक्षात येईल. ह्या वरून गुजराथेत महाराष्ट्री प्रचलित असावी ह्या चितामण-राव वैद्याच्या तर्काला पुष्टि मिळते. जाऊन आणि जईने ही रूपे दोनहि भाषाचा निकट सबंध प्रतीत करतात. ह्याहि पेक्षा अधिक कुतुहलास्पद गोष्ट म्हणजे मराठी षष्ठीचा "चा" प्रत्यय जुन्या गुजराथीतहि आपणास भेटतो उ. नारसिहाचा स्वामी मुजशुं रमता संसारमा तेने भय कशो ? (नरसिह महेता) ह्या शोधाचे श्रेय सर रमणभाई महिपतराम ह्यानाच आहे अनेक शब्द मराठी गुजराथीत सारखेच आहेत. उदाहरणार्थ —

१ मोठी, २ चूक, ३ थोडा, ४ रस्ता, ५ घर, ६ उतारू, ७ पण (परंतु) ८ माहिती, ९ कापड, १० कोण जाणे, ११ कंटाळा, १२ नाजूक, १३ वडील, १४ वाट (मार्ग), १५ निरनिराळा, १६ रडणें, १७ भागणे, १८ आज पर्यंत, १९ पलग, २० चार पाच, २१ धाक. २२ बोलता बोलता २३ चाखणे, २४ परीट, २५ किनार (काठ), २६ वखत, २७ लाचार, २८ लगन, २९ उखळी, ३० मदे (बाजू), ३१ खवीस, ३२ खून, ३३ गरदी ३४ घट, (तूट), ३५ चढाई, ३६ विकार, ३७ तपास, ३८ तडा, ३९ तार, ४० मत, ४१ मस (पुष्कळ), ४२ राख, ४३ रेती, ४४ वरी (पुन ), ४५ खूप, ४६ खचित, ४७ परत, ४८ दे, ४९ पडणे इत्यादि. कर्तृवाचक कर, गर हे प्रत्यय उभय भाषात आढळतात. उ गु. वणकर, चूडगर, मराठी वीणकर घनगर, सनगर वगेरे गु छेतरणे ह्या शब्दाकडे धाव मारल्याशिवाय फसवणे ह्या अर्थी शितरणे ह्या जुन्या मराठी शब्दाचा उलगडा होणार नाही. प्रथमा व द्वितीया ह्याचे प्रत्यय नसणे हा प्रकार गुजराथी मराठीत सारखाच आहे

ह्या भाषासाम्याप्रमाणे लिपिसाम्यहि मनावर ठसण्यासारखे आहे ग, घ, छ, ट, ठ, ड, ढ, त, थ, ध, न, प, म, य, र, व, श, ष, स, ह, क्ष आणि ज्ञ ही २२ अक्षरे गुजराथी व मराठी लिपींत सारखीच आहेत. ह्याखेरीज गुजराथी ज व इ हीं दोन अक्षरें आपण मोडींत कायम ठेवली आहेत गुजराथी लिपि मोडी आहे म्हणतात ते काही खोटे नाही. आज जरी गुजराथी लोक ओळ काढून लिहीत नसले तरी पूर्वी त्याच्यात तसा प्रघात होता हें निर्विवाद आहे. ही गुजराथी मराठीची मैत्री विचारात घेतली तर सर्व गुजराथी पुस्तके देवनागरी लिपींत छापावीं असा परिपाठवजा कायदा करणे सयुक्तिक होईल की नाही ह्याचा

विचार श्रीमंत सयाजीराव महाराज ह्यानी अवश्य करावा अशी माझी त्यांस नम्र सूचना आहे एकलिपित्व भाषैक्य घडवून आणते. दिवेटियाचा योग्य आक्षेप उपेक्षिला नाही तरी कित्येकाच्या मते नागरी लिपि ही नागर ब्राम्हणाची लिपि आहे व होती ही गोष्ट ह्या बाबतीत जमेस धरण्यासारखी आहे काव्हर्टन साहेब सन १९०६ सालच्या रिपोर्टात लिहितात की गुजराथीच्या दोन लिप्या आहेत. पैकी देवनागरीचा उपयोग कविता लिहिताना करतात ( पा ७७ ) पेशवाईत पुण्यास गुजराथी ब्राम्हण सस्कृत पोथ्या लिहिण्याचा धंदा करीत हें तत्कालीन जमाखर्च चाळीत असताना माझ्या निदर्शनास आले आहे अर्थात गुजराथी लोकाना निदान ब्राम्हणाना बाळबोध लिपि लिहिण्याचा सराव होता हे उघड होते हिंदी लिपि बालबोध आहेच गुजराथीने जर तिचा अगीकार केला तर हिंदी, गुजराथी आणि मराठी हळू हळू एकरूप होतील. तदनंतर बगालीला वळवणेहि आपणास सुलभ जाईल. देवनागरीच्या आश्रयाने बगाली सुद्धा आपणास थोडी बहुत समजते हे खालील श्लोकावरून आपल्या ध्यानी येईल.

बाताम हये छे उनला आकुल
पथतरु शाखे धरे छे मुकुल
राजार कानने फुटे छे बकुल
पारुल रजनी गंधा

( वासुदेवराव आपट्याच्या एका निबंधातून ही चतुष्पदी घेतली आहे )

तात्पर्य एक लिपीचा प्रचार राष्ट्रोत्कर्षास अपरिहार्य असल्यामुळे अधिकारी पुरुषानीं त्याचा विचार जरूर केला पाहिजें

**लिपि सुधारणा**

देवनागरी लिपीचा सार्वत्रिक प्रसार करण्याची वाटाघाट चालू असताना त्या लिपीत फेरबदल करण्याची चळवळ करणे कित-पत समंजसपणाचें होईल ही शंका जरी निराधार नसली तरी लिपीसुधारकाचे प्रयत्न हेटाळण इत पर शक्य दिसत नाही अशास्त्रीय व अशुद्ध लिपि सुधारणे आणि छापखाना व लेखनयंत्र ह्याना ती सोयीची होईल असे तीत फेरबदल करणे अशा दोन मार्गानी ही चळवळ चालू आहे. लिपिसुधारकाचे आद्य गुरु वे. सं. पाडुरंग जनार्दन पाध्ये हे होत लहान मोठ्या सुधारकानी मराठी जोडाक्षरावर घेतलेला

आक्षेप निरपवाद आहे हे कबूल करणे भाग आहे दोन व्यजनें व स्वर मिळून जोडाक्षर बनतें. असें अक्षर लिहिताना उच्चाराचा क्रम पाळणे जरुर आहे ही गोष्ट मलातरी मान्य आहे जोडाक्षरे लिहिण्याची सध्याची तऱ्हा स्वैर आहे ह्यात शका नाहीं त्यात नियमबद्धता नसल्यामुळे ती शिकण्याचा बोजा जड वाटतो. म्हणून त्यात सुधारणा होणे इष्ट आहे क्र ह्या अक्षरामध्ये सबध क का लिहिण्यात येतो हें जरी सागता आलें नाही तरि म्र, प्र, त्र, ह्या अक्षरातील र अर्धा नसून सबध आहे असे म्हणता येईल. मात्र हा र मध्याचा मोडी (न) आहे असे मानणें भाग पडेल. अच्या बाराखडीची अवश्यकता मला अजूनहि पटत नाही व्यजन व स्वर मिळून जे अक्षर बनते त्याची बाराखडी असते व्यजनात स्वर मिळवून उच्चाराचे जे निरनिराळे प्रकार आढळतात ते बाराखडीच्या रूपाने व्यक्त केले जातात क् + उ मिळुन कु होतो तसा अ + उ मिळुन उ होत नाही स्वर हे स्वत सिद्ध उच्चार आहेत म्हणून लिपीतील त्याची प्रतीके स्वतंत्रच असणे योग्य होईल ह्या दृष्टिने ओ, औ ही अक्षरे निराळीच पाहिजेत असे म्हणणे भाग आहे. अं, अः हे स्वर नाहींत व्यजन पुढल्या स्वराचा आश्रय करते तसेंच तें मागील स्वराच्या आश्रयानेहि व्यक्त होते एवढेच अं, अः वरून आपणास शिकावयाचे असते ऋ, ऌ हे उच्चारदृष्ट्या व्यजन पण कार्यदृष्ट्या स्वर असे उभयविध असल्याकारणाने त्याची व्यवस्था स्वतंत्र करणे चागले. क्ष व ज्ञ ह्याचा ऊहापोह श्री पावशे ह्यानी साहित्यपत्रिकेत केला आहे तो मननीय आहे. हे स्वतंत्र वर्ण नसल्यामुळे कोशात त्याना स्वतत्र स्थान मिळणे योग्य नाही क्ष व ज्ञ हीं द्व्यक्षरी आणि त्र्यक्षरी वर्णाची उदाहरणे म्हणून दिली असावीत तथापि ज्ञ ह्या अक्षरात दोन अथवा तीन अक्षरें आहेत, तसेंच आहेत ती कोणती ह्याविषयी उच्चारभेदामुळे मतभेद आहे आपण ज्ञ चा उच्चार द् न् य असा त्रिवर्णात्मक करतो तथापि मोडीत द् व न ही दोनच अक्षरे लिहिली जातात आणि बाळबोध ज्ञ मध्यें ज् व न असावीत असा भास होतो मोडी लिपि कशी बनली ह्याची चर्चा आजपर्यंत अनेकानी केली आहे एका कार्याला अनेक कारणे असू शकतात. तेव्हा बाळबोध अक्षरातील खालचा काना वर नेऊन कित्येक मोडी अक्षरें बनलेलीं उघड उघड दिसतात काना वर नेताना गाठ घ्यावी लागते म्हणून मोडीत गाठी फार येतात बाराखडीचा विचार करताना ऋ अन्त वर्णाला स्थान तेथे का मिळू नये ह्याला शास्त्रीय उत्तर अद्यापि कोणी दिलें नाही. तथापि मराठीत एकहि शब्द नाही की, ज्यात ऋकारात अक्षर येते कदाचित ह्या कारणास्तव बाराखडींत ऋ स्वरयुक्त व्यंजनाचा समावेश

केला नसावा मला वाटते म सा. परिषदेने एक कायमचें लिपिमंडळ नेमून सर्व प्रश्नाचा खल करावा. तसे झाले तर श्री सावरकर, शितूत, देवधर, गोखले नानल, वैद्य, प्रो माधवराव पटवर्धन वगैरे लिपिसुधारकाच्या प्रयत्नास सत्वर यश आल्याशिवाय राहणार नाही लिपींत वारंवार बदल करणें ज्ञानप्रसाराच्या दृष्टीने इष्ट नाही हे जसें खरे तसेच लिपीबदल होत आला आहे ही गोष्टहि खरी आहे. अगदी ताजे उदाहरण दीर्घ उचे देता येईल. दीर्घ इ प्रमाणे ऱ्हस्व उला रेघेच्या वर फोडून दीर्घ उ (उॅ) लिहिण्याची चाल पूर्वी होती हल्लीचा ऊ द्वित्त स्वर लिहिल्यासारखा होतो. सध्याचे मात्रास्थान अर्वाचीन आहे जुन्या मराठी पोथ्यातून प्राचीन शिलालेखाप्रमाणे पृष्ठमात्राची पद्धति पाहावयास सापडते श अक्षर दोन प्रकाराने हल्ली लिहिलें जाते बाराखडीतल्या शेंडीफोड्या 'श' पेक्षा जोडाक्षरातील श (श्र, श्व, श्च, ) जुना असावा हुएनसिगाची माहिती बरोबर असेल तर पूर्वी ४९ मूळाक्षरें व १०००० जोडाक्षरे विद्यार्थ्याला शिकवीत असे दिसतें जोडाक्षराची संख्या वाटेल तितकी वाढवता येण्यासारखी आहे. तथापि उच्चारानुसार जोडाक्षरे लिहिण्याची पद्धति तेव्हा असती तर जोडाक्षरे शिकवण्यावर इतके परिश्रम कोणी घेतले नसते. मूलाक्षरात ळ, क्ष, ज्ञ ह्याचा समावेश झाला नसावा म्हणून ४९ अक्षराची संख्या हुएनसिगाने दिली असावी.

लिपिसुधारणेने ज्ञानप्रसार झपाट्यानें होईल ही भाषा जरि थोडी बढाईची असली तरि ज्ञानाची थोडी मीमांसा करणें

**ज्ञान ह्मणजे संशोधन** ह्या प्रसंगाला साजेसेच होईल आपण ज्याला ज्ञान म्हणतों तें सर्व वस्तुत सशोधन आहे आपले ज्ञान कितीहि वाढले तरी सृष्टीतील एकहि मूल पदार्थ आपणास निर्माण करता येणार नाहीं मूल तत्त्वाच्या सयोगवियोगाने जगत् बनलें आहे. परमेश्वराने ही तत्त्वे माणसाच्या स्वाधीन केलीं आणि तो स्वस्थ बसला मूळ पदार्थापासून मनुष्याने असख्य आकृति निर्माण केल्या. ही मानवी सृष्टि इतकी विस्तीर्ण व मोहक झाली की, मूळ स्रष्ट्याचें स्मरणच लुप्त झालें. मूल पदार्थापासून अन्य पदार्थ बनविण्यास मूल पदार्थाचे गुण धर्म समजणें अवश्य असते हे गुणधर्म समजून घेऊन त्याचा उपयोग मनुष्याच्या कल्याणार्थ कसा करता येईल हे आपणास समजलें म्हणजे त्या समजण्यालाच ज्ञान असें म्हणतात ह्या वरून ज्ञान म्हणजे केवळ सशोधन होय हें स्पष्ट होतें. शास्त्रज्ञ अथवा सशोधक निसर्गसृष्ट पदार्थाची कार्यक्षमता, उपयुक्तता काय आहे हें शोधून काढण्याचा

प्रयत्न करीत असतो. ज्या पदार्थात जो धर्म नाहीं तो धर्म त्या पदार्थात तो घालू शकत नाहीं मनुष्याचा सर्व पराक्रम ह्या गुणधर्मांचे पूर्णाशानें ज्ञान करून घेणे इतक्या पुरताच असतो. अशा प्रकारच्या ज्ञानाला नुकताच आरंभ झाला व गेल्या शतकात ह्या ज्ञानाचा लोढा जरी अवाढव्य वाढलेला दिसत असला तरी त्याचे हें अवाढव्य स्वरूप येथेच थाबलें आहे असें मानण्यास यत्किचित्हि कारण दिसत नाही. उलट ह्या संशोधनाला अंतच नाहीं असे वाटूं लागलें आहें. ह्या संशोधनात्मक ज्ञानाचा उगम मानवी बुद्धिमत्तेंत आहे

निसर्गाचे धर्म काय आहेत, निसर्गात गूढशक्ति कोणती आहे एतद्विषयक जिज्ञासा उत्पन्न होण्यापूर्वी ही मूळतत्त्वे कोणी व कशी निर्माण केली ह्या विषयीचें कुतूहल माणसात प्रथम उद्भूत होणे स्वाभाविक होतें. ह्या कुतूहलाची परिणति मननप्रधान वाङ्मयाच्या निर्मितीत झाली बुद्धीच्या वाढी बरोबर अशा प्रकारच्या वाङ्मयाच्या स्वरुपात बदल होत जाणे अपरिहार्य होते. भरमसाट बालबुद्धीच्या कल्पनापासून तर्कशुद्ध विचारापर्यंतच्या सर्व वाङ्मयाचा ह्यात समावेश होतो एकीकडे वैदिक वाङ्मय व दुसरीकडे आचार्याचे भाष्य उपरोक्त दृष्टीने पाहावे म्हणजे वरील सिद्धाताचे रहस्य कोणालाहि पटेल केवळ अनुमान धपक्यावर हे वाङ्मय आधारलेले असल्यामुळे त्याने अखेर गाठली असे केव्हाच होणार नाही हें खरें तथापि ह्या भावी वाङ्मयात विशेष सत्त्व असेल असे वाटत नाही तार्किक उपपत्तीचे प्रत्यक्ष सिद्धीत पर्यवसान होत असेल तरच ह्या वाङ्मयाकडे लोकाचें आता लक्ष वेधेल. हे वाङ्मय आध्यात्मिक स्वरुपाचे असतें. अखिल वाङ्मयात हे प्रथमजात होय. आद्यावस्थेत आख्यायिका अथवा लोककथा ह्या स्वरुपात ते व्यक्त होते आपल्याकडील ब्राह्मणातील आख्यायिका ह्याच वर्गात मोडतात. साराश, अध्यात्मज्ञान व भौतिक शास्त्रें हे मनुष्याच्या बुद्धीचे क्रीडाक्षेत्र होय.

**मनो-धर्म-विकार**

परमेश्वराने माणसाला नुसती बुद्धि दिली असती तर त्याच्याकडून उपरोक्त प्रकारचें वाङ्मयच निर्माण झाले असते. परंतु बुद्धी शिवाय मनुष्याला अन्तःकरण किंवा मनहि दिलेलें आहे बुद्धि व मन भिन्न स्वभावाचीं आहेत. मन चंचल असते; बुद्धि स्थिर व गंभीर अशी असते. एकसुती वा समबुद्धीच्या माणसात विचारसादृश्य आढळतें; तथापि त्याच्या अन्तःकरणाचीं आंदोलनें, क्षोभ अगर वृत्ति सारख्याच असतील असें नाही. विचाराच्या रूपाने

बुद्धीला फुटणारे अकूर एकाच जातीचे असतात, उलट अन्तःकरणावर उभारणाऱ्या वृत्ति असंख्य असतात एवढेच नव्हे तर विसदृश वृत्ति एकाच वेळी मानवी मनावर स्वामित्व मिळवितात. परस्पर विरुद्ध वृत्तींमुळे मनुष्याचें वर्तन जरि त्या वृत्तीच्याकडे पाहिले असता अगदीं पूर्णपणे सुसगत असते तथापि तिऱ्हाईताला ते विसंगत वाटते ह्या नानाविध व भिन्न भिन्न वृत्तीच्या योगाने मनुष्याला वैचित्र्य प्राप्त झाले आहे उ. मनुष्य लोभी असतो तसा तो लौकिकाकरता हपापलेला असतो. म्हणून एकच मनुष्य कधी कृपण तर कधी उदार अशा स्वरुपाने लोकाना दिसेल प्रत्येक माणसात अत्यंत प्रबल असा एक मनोविकार असून बाकीचे कमजोर असतात कृपणतेपेक्षा लौकिकाची हाव जर जबरदस्त असेल तरच कवडीचुंबक मनुष्यातहि आपणास प्रसंगोपात औदार्याची प्रतीति येईल करंगळीवर लघुशंका न करणारा इसम राष्ट्रप्रेमाने हजारो रुपयाचे नुकसान मोठ्या आनंदाने व बिनतकरार सोसतो. मनोविकारामध्ये असलेला भेद ध्यानात ठेविला पाहिजे काही मनोविकार अन्यसापेक्ष असतात. क्रोध येणे हे आपणास अप्रिय असलेल्या गोष्टीवर अवलंबून असते. कारण घडल्याशिवाय क्रोधाचा उद्भव होत नाही ह्याच्या उलट अहपणा किंवा लोभ तसेच प्रेम ह्याचे उगमस्थान आपल्या मनातच असते क्रोधाचे आविष्करण प्रामुख्याने व अविलंबकरून शरीरावर होते प्रेमाचा उद्भव मनापासून होतो. तसेच लोभी मन परद्रव्यापहार करण्यास आपण होऊन प्रवृत्त होते ह्या सिद्धातात एकातिक सत्य नसले तरी सामान्यत व्यावहारिक दृष्टीने ते सत्यान्वित आहेत असे गृहीत धरण्यास हरकत नाही अन्य प्रकारानेहि निरनिराळ्य मनोविकारातील भिन्नता विचारणीय आहे. सर्व मनोविकारात लोभ हा आद्य विकार दिसतो लोभामुळेच क्रोध, भीति वगेरे मनोविकाराना अस्तित्व प्राप्त होते आपल्या शरिरावरील लोभामुळेच आपणास हिंस्र पशूंची-सर्पादिकाची भीति वाटते अहंपणा हा एक प्रकारचा लोभच आहे आपलेपणाचा तो लोभ होय लौकिकाच्या लोभाने माझे योग्य दोष कोणी दाखविले तरी ते मला खपत नाही दुसऱ्याचा मी मत्सर करतो तो माझ्या स्वतःच्या मोठेपणाला उणेपणा येतो म्हणून. अर्थात् मत्सर हे अहंपणाचे कार्य आहे कामविकाराचे स्वरूप ह्याहूनहि भिन्न आहें. स्त्रीपुरुषाच्या सान्निध्यात नैसर्गिक आकर्षणाने होणारा शारिरिक विकार ह्याचेच नाव काम. उन्हातून आल्यावर शीतोदकानेंच त्वचेची शांति होते त्याच प्रमाणे संभोगक्रियेने उत्तेजित इद्रियें शात होतात. स्त्रीपुरुषाच्या संसर्गाने इद्रिये बेताल होतील परतु कामविकार उत्पन्न होण्यास

स्त्रीला पुरुषाचे किंवा पुरुषाला स्त्रीचे दर्शन अपरिहार्य आहे असे मात्र नाहीं. केवळ पुरुषाच्या समाजात मुलगा वाढला तरी त्याला योग्यवेळी कामविकार अनुभूत होणारच काम हा नुसता सकल्पज किंवा मनोभव नसता तर ( मनोहि मूलं हरदग्धमूर्ते बृ. स. ७७/७४ ) विषयपरोक्ष अशा आश्रमवासी स्त्रीपुरुषाना कामविकाराचा कधीच प्रत्यय आला नसता. ह्यावरून असे दिसते की कामविकार हा बहुंशी शारीरिक असून तो अनुकूल परिस्थितीत उत्कटत्वाने व्यक्त होतो तथापि तो क्षुधा तृष्णादि शरीराच्या विकाराहून भिन्न आह सर्व शरीरभर त्वचा असल्यामुळे जननेंद्रिये ही अशत कर्मेंद्रिये व अशत ज्ञानेंद्रियेहि आहेत. अविरत क्रियेने सुद्धा ज्ञानेंद्रिये थकत नाहीत, परतु कर्मेंद्रियें क्षीण होऊन अखेरीस निकामी होतात तसेच क्षुधातृष्णादि शारीरिक विकार मनाच्या नियत्रणा खाली येऊं शकत नाहीत, उलट कामविकार मनोनियमित होऊ शकतात ह्या प्रमाणे ज्ञानकर्मेंद्रियाशीं मन कमीजास्त प्रमाणाने निगडित झालेले असते ह्या शिवाय कल्पनाचे डोंगर निर्माण करणे, वासना धरणें इत्यादि इंद्रियनिरपेक्ष असे स्वतंत्र व्यापार मनाचे असतातच हे गुंतागुंतीचे असंख्य व्यापार वाङ्मयाचे विषय होतात ह्या वाङ्मयाला सामान्यत काव्य असे म्हणतात साराश, मन आणि बुद्धि ही अखिल वाङ्मयाला जन्म देणारी आहेत. बुद्धीच्या कार्यजाताला शास्त्र ही संज्ञा असून मनो व्यापाराचे चित्र काव्यात रेखाटले जाते अर्थात् काव्यात नाटके, कादबऱ्या, लघुकथा व कविता ह्याचा अन्तर्भाव होतो बुद्धीचे कार्य सशोधनात्मक असते पशुपक्ष्या प्रमाणे आत्मसंरक्षणाची नैसर्गिक योजना मनुष्यजातीसंबंधाने परमेश्वराने करून ठेविली नसल्यामुळे बुद्धीचा उपयोग जर मनुष्याने केला नाही तर क्षणार्धात मनुष्यजात समूळ नष्ट होईल. म्हणून मनुष्यजातीच्या सरक्षणार्थ, सुखार्थ, अभिवृध्यर्थ बौद्धिक क्रिया अवश्यक आहे ह्यातच शास्त्राचे महत्त्व आहे ह्याच्या उलट कवीचे कार्यक्षेत्र म्हणजे भावदर्शन व रम्य कल्पनाविलास हे होय इंद्रिये व मन ह्याचे व्यापार मनुष्याला अपरिचित नसतात. परंतु ते सर्व त्याला शब्दात व्यक्त करता येत नाहीत. म्हणून एखाद्या प्रतिभासपन्न माणसाने त्याचे शब्दचित्र काढले म्हणजे ओळखीचा मनुष्य भेटला असता जसा त्याला आनद होतो तसा त्या शब्दचित्राने होतो एतावता मनुष्याच्या मनाला रिझविणे हेच कार्य काव्याकडून होत असते मनुष्याला जगविण्याचे काम बुद्धि करीत असते. शास्त्राला संशोधन करावे लागते, काव्याला सूक्ष्म निरीक्षणाची अवश्यकता असते दोहीची उपयुक्तता निराळी, दोहींचे कार्य वेगळे शास्त्राचे सिद्धात लोकानी एकदा पचविले म्हणजे ते शिळे वाटतात आणि त्या सिद्धाताच्या मागे जे परिश्रम

असतात, जी प्रक्रिया असते त्याच्या कडे दुर्लक्ष होते सूर्याभोवती पृथ्वी फिरते हे आता शाळेंतील लहान मुलामहि अवगत आहे, पण हा सिद्धात स्थापन करण्याच्या पूर्वी त्या संशोधकाला किती प्रयास पडले, कसकशा मार्गाने त्याने संशोधन केले हे समजून घेण्याचें सामान्य माणसास कारणच पडत नाही काव्याला मात्र शिळेपणा टाऊक नाही ते सदैव हिरवेगार, रमणीय, टवटवीत असेच असते काव्याची दुसरी मौज अशी आहे की, ते जरी वस्तुस्थितीचें प्रतिबिब असले तरी प्रत्यक्षापेक्षा त्यात मोहकपणा अधिक कुणब्याची झोपडी पाहून आनद होत नाही, परंतु तीच झोपडी प्रकाशचित्रात चित्ताकर्षक होते

**वाङ्मयाचें वर्गीकरण**

मनोबुद्धिजन्य वाङ्मयाचे आणखी वेगळ्या तऱ्हेने वर्गीकरण करता येण्यासारखे आहे. सशोधक शास्त्रज्ञ सर्वलोकाकरता-सर्वकालाकरता लिहितो त्याचे सिद्धात त्रिकालाबाधित असतात गुरुत्वाकर्षणाचा सिद्धात सर्व जगा करता व सर्वकालीन असा आहे शंकराचार्याचे तत्त्वज्ञान हिंदूकरताच आहे असे नाहीं. जगातील कोणत्याहि धर्माच्या तत्त्वज्ञाचा त्यावर सारखाच हक्क आहे सर्व शास्त्रे व तत्त्वज्ञान ह्या सदराखाली येतात दुसऱ्या प्रकारचे वाङ्मय विशिष्ट कालाचे व विशिष्ट लोकासाठी लिहिलेले असे असते ह्या वर्गात इतिहास, समाजशास्त्र, लोककथा, अर्थशास्त्र, भाषा, राज्यशास्त्र इत्यादि घालता येतील. मनोवृत्तिविषयक वाङ्मय ह्याचा स्वतंत्रच वर्ग पाडणे जरूर आहे ह्या जातीच्या वाङ्मयाचे शास्त्रीय वाङ्मयाहून एका दृष्टीने वेगळेपण दाखविता येईल. बुद्धि स्खलनशील असल्यामुळे शास्त्रसिद्धात बदलू शकतात, परंतु मनोवृत्ति निश्चित व अनुभवाच्या असल्यामुळे तद्विषयक वाङ्मय चिरायु होते. ते सार्वकालिक असते.

**ग्रंथाची योग्यता**

ह्या वर्गीकरणानुसार मराठी भाषेतील ग्रथाचा आपण आता विचार करून काय निष्पन्न होतें ते पाहूं पहिल्या वर्गात पडण्यासारखा मराठींत एकहि ग्रंथ नाही. एवढेच नव्हे तर महाराष्ट्रात रमण अथवा बोस प्रमाणे शास्त्राच्या अभ्यासाला आपणास ज्याने वाहून घेतलें आहे असा मनुष्य शोधूं गेल्यास एका दत्तोपंत लिमयाशिवाय दुसरा कोणीहि आपणास आढळणार नाही. ह्यांचा एकच शोध आजपर्यंत प्रसिद्ध झाला आहे आणि तोहि मराठींत नाहीं. तथापि त्यांच्या कडून अंशतः मराठीची ही उणीव भरून निघेल अशी आशा करणें गैरशिस्त

होणार नाही ह्या ठिकाणी लोकहितवादीच्या ह्मणण्याची आठवण होते ते म्हणतात " मराठी भाषेत जितके ग्रंथ आहेत तितकेच मराठे शहाणे आहेत. ज्या लोकास ग्रंथ नाहींत त्यास आपण अडाणी म्हणतो. महार वगैरे जुने लोक ह्यास ग्रंथ नाहीत याजमुळे ते अज्ञानात गणले आहेत " तात्पर्य, ह्या सदराखाली ब्रिटिश अमदानीपासून आजपर्यंत शून्याशिवाय दुसरा आकडा नाही हा प्रात लहान आहे असे नाही गणितशास्त्र, रसायनशास्त्र, वनस्पतिशास्त्र, भूगर्भशास्त्र, प्राणिशास्त्र, ज्योतिषशास्त्र, वैद्यशास्त्र, पशुविद्या, तत्त्वज्ञान, पदार्थविज्ञान वगैरे अनेक शास्त्राचा ह्या वर्गात समावेश होतो गीताकार काय म्हणतात हे सागण्यात मोठमोठाल्याच्या डोक्याला शीण होत आहे. परतु मी असे म्हणतो असे सागणारा एकहि प्राणी पुढे येत नाही. ही तत्त्वज्ञानाची कहाणी बाकीच्या विषयासंबधाने बोलावयासच नको

**वर्ग २**

दुसऱ्या वर्गात समाजशास्त्र, धर्म, राजकारण, चरित्रे, इतिहास, प्रवासवर्णने, अर्थशास्त्र, नीतिशास्त्र इत्यादि विषय पडतात आमच्यातील विद्वानाचे थोडे बहुत परिश्रम ह्या वर्गातील विषयासबंधाने झालेले दिसतात नीतिशास्त्रावर वामनराव जोश्याच्या पुस्तका वाचून नाव घेण्यासारखे दुसरे पुस्तक नाही बहुश्रुतपणा, विद्वत्ता, निरीक्षणशक्ति त्याचा अभाव असल्या कारणाने आमची प्रवास वर्णनं उद्बोधक होत नाहीत. त्यातल्या त्यात श्री काळे ह्याचीं वर्णने वाचनीय असतात असे मला वाटते. सामाजिक विषयाना राजवाड्या शिवाय तर अद्यापि कोणी हातच लावला नाही तथापि इग्रजी पुस्तकातील विचाराना मराठी पेहराव देऊन निर्माण केलेलें अस्सल स्वदेशी जे वाङ्मय त्याच्या जनकत्वाचा आद्यमान माधवराव गोळे ह्यानाच दिला पाहिजे हिंदुधर्म आणि सुधारणा व ब्राह्मण आणि त्याची विद्या हे दोन ग्रंथ ह्मणजे मराठीचे अलंकार आहेत अर्थशास्त्र व राज्यव्यवस्था ह्यावर विद्यार्थ्याच्या उपयोगाकरता लिहिलेले हाताच्या बोटावर मोजता येतील असे ग्रथ असले तरी त्याच्या पलीकडे मजल अद्यापि गेली नाही समाजशास्त्र व अर्थशास्त्र ह्या विषयावर लिहिणाराला माहिती जमवावी लागते व उदाहरणे, आकडे गोळा करून त्याच्या आधारावर सिद्धात प्रतिपादावे लागतात ह्या शास्त्रातील ज्ञान अनुनायक पद्धतीनेच मिळू शकते परतु माहिती गोळा करून लिहिणें ही कल्पनाच आमच्यात अद्यापि उत्पन्न झाली नाहीं. विद्यार्थी सुटीच्या दिवसात आपआपल्या गावी गेले ह्मणजे तेथे माहिती मिळविण्यास त्याना सागावे हे आमच्या कालेजा-

तील प्रोफेसराच्या ख्यानातहि येत नसेल एखाद्या विषयावर स्वतंत्र निबंध लिहून एम ए होण्याची सवलत विद्यापीठाने ठेविली आहे तिच्या योगाने माहिती मिळविण्याचें वळण भावी पिढीला लागेल असें वाटतें. सुदैवाने आमच्या देशात सामाजिक विषयात सशोधन करण्यास अनुकूलता विपूल आहे. परंतु तिचा उपयोग करून घेण्याची अक्कल अद्यापि आमच्यात आली नाही त्यामुळें ह्या प्रातात भरीव कामगिरी होण्याची तूर्त तरी चिन्हे दिसत नाहींत.

रा. ब काशिनाथ नारायण साने, खरे व विश्वनाथ काशिनाथ राजवाडे ह्याच्या दूरदर्शित्वाने आह्मी इतिहासात मात्र अभिमानास्पद कार्य केलें आहे मराठ्याच्या इतिहासावर आज दोनशे ग्रंथ वाचण्यासारखे लिहिले गेले आहेत. मला अशी खात्री वाटते की, राजवाडे ह्यानी भा इ. स मडळ स्थापन केले नसतें तर ह्या विषयात इतकी ग्रंथसंख्या हि निर्माण झाली नसती आणि कदाचित झाली असती तरी इतक्या योग्यतेचे ग्रंथ आपल्या हाती पडले नसते. राजवाड्यानी महाराष्ट्राचा इतिहास एकदम लिहिण्याचा मोह सावरून अस्सल साधने जमा करण्याची जी प्रथा पाडली तिच्या मुळेच एवढे चागले काम आपणास करता आलें राजवाड्याच्या ह्या अभिनव उपक्रमाचा दुसरा एक महत्त्वाचा फायदा असा झाला की, ऐतिहासिक संशोधन हे जाड्याजाडया आग्लभाषा विभूषिताच्या भोवतीच घिरट्या घालीत न राहता निव्वळ मराठी जाणणाऱ्या सामान्य माणसाच्या गळ्यात तें येऊन पडले भारत इतिहास संशोधन मंडळात जी काम करणारी मंडळी आहेत त्याच्याकडे पाहिले असता वरील ह्मणण्याची खात्री पडेल. राजवाडयाचे हे मंडळ इतिहासापुरते विद्यापीठच बनेल महाराष्ट्रातील सामान्य माणसे यदुनाथ सरकार सारख्या विद्वानालाहि क्षणभर गप्प बसवतील इतका इतिहास विषयक गुण महाराष्ट्रात विस्तारला आहे ह्याचें सर्व श्रेय कै. राजवाडे ह्याच्याकडे आहे. इतिहास क्षेत्रात नवीन ४५ ग्रथाची अमोलिक भर सरकारच्या कृपेनें व गोविदराव सरदेसाई याच्या परिश्रमाने अलीकडे पडली आहे तिचा उल्लेख टाळणें कृतघ्नपणाचे होईल ह्या ग्रथानी नवीन ऐतिहासिक गोष्ट जरी उघडकीस आली नसली तरी पूर्वीच्या गोष्टी सप्रमाण व विस्तारानें समजण्याम त्यामुळे मोठेंच साहाय्य होणार आहे लंडनमध्ये असलेले मराठी कागद परत पुण्यास आणण्याची खटपट करण्याचें आह्माम सुचत नाही हे दुर्दैव समजले पाहिजे. आमचे शिक्षणमत्री सर्व गोष्टी करतात. मात्र शिक्षण विषयक चागली गोष्ट असेल तेवढीच त्याच्या हातून सुटते कीं काय असा भास होतो ह्या नतर शिवकालीन विखुरलेले साहित्य सकलित करून शिवचरित्र कार्यालयाने उपयुक्त

कामगिरी केली आहे, परंतु सर्वांत शिवभारताच्या शोधाची योग्यता फार मोठी आहे शहाजीचा इतिहास ह्या एका ग्रंथामुळेच लोकाना माहीत झाला. डच, पोर्तुगीज व इंग्लिश ह्या लोकाचा संबंध आल्यामुळे अस्सल कागदाचें संशोधन युरोपियन देशात करणें अवश्य आहे राज्यकर्त्यांची सदीच अशी असते की, रा. ब पारसनीस म्हणतात, पेशव्यानासुद्धा सातारच्या राजानी जे अस्सल कागद दाखविले नाहींत ते त्यानी ग्रॅट डफच्या स्वाधीन केले.

धर्म सर्वांच्या परिचयाचा असतो म्हणूनच की काय कोणाला माहित, धर्मावर एकहि चांगला ग्रंथ मराठीत नाही. परतु ह्यात आश्चर्य मानण्याचें कारण नाही. आमच्या धर्माचें स्वरूप आमचें आम्हालाच कळत नाही मग सर्वसाधारणपणे धर्माचे विवरण आम्ही कसे करणार, ख्रिस्ती, मुसलमानी धर्मप्रमाणेच हिंदुधर्म आहे असें आमच्यातील धर्मनिष्ठ व धर्माभिमानी समजतात व प्रतिपादतात! श्री. कोकजे ह्याच्या प्रयत्नाने ह्या सार्वत्रिक समाजाचा निरास होण्याचा संभव आहे. आमचे धार्मिक आचार व धार्मिक कल्पना ह्याच्या बाबतीत श्रुतिस्मृति ह्याचें कार्य कोणतें ह्याचा निर्णय अद्यापि कोणी केला नाहीं ह्या मुख्य प्रश्नाचा उलगडा न करता धर्मावर केलेली व्याख्यानें व लिहिलेली पुस्तकें नि सत्व ठरल्यास त्यात आश्चर्य नाही हिंदूंचे समाजरचनाशास्त्र हे नुकतेच प्रसिद्ध झालेले पुस्तक ह्या विषया संबधाने उल्लेखनीय आहे तथापि ते बचावी स्वरूपाचे आहे असा वाचणाराचा ग्रह होतो युरोपीयन शास्त्रकाराची ढाल पुढें करून हिंदूंच्या धर्मशास्त्राचा बचाव करण्याचा गोविंदराव जोशी ह्याचा प्रयत्न आहे व त्याची आज जरुरी हि आहे

गाधीच्या अस्पृश्याच्या चळवळीने दोन तीन चागल्या पुस्तकाना जन्म दिला हे त्या चळवळीचे मराठी भाषेवर उपकारच झाले आहेत आमचा धर्म म्हणजें समाजशास्त्राचाच एक भाग असल्यामुळे ऐतिहासिक दृष्टीने धर्माचा विचार करणाराचेच लिखाण वाचण्याच्या लायकीचे होईल आमचा कोणत्याहि विषयाचा अभिमान विचार निर्मूलक असतो त्यामुळे ग्रथावलोकनाची अवश्यकता आम्हास भासत नाही ऋग्वेदाचे मराठी भाषातर वाचणारे सनातनी आपणात कितीसे निघतील बरें!

भाषाशास्त्रांत व्युत्पत्तिशास्त्र, व्याकरण, कोश, भाषेतिहास ह्याचा अन्तर्भाव होतो, ह्या पैकी भाषेतिहासावर श्री. कृ. पा. कुलकर्णी ह्यांच्या पुस्तकावाचून

एकहि पुस्तक नसावे हे आमच्या परिश्रमपराङ्मुखतेचे द्योतक होय. इतिहास मंडळा प्रमाणे ठिकठिकाणी भाषामंडळे स्थापन झाल्याखेरीज ह्या विषयाच्या अध्ययनाला प्रोत्साहन मिळणार नाही व्याकरणासंबंधाने पाहता किरकोळ प्रयत्न सोडले तर राजवाडे आणि दामले ह्यानी विद्वत्मान्य ग्रंथ लिहून आमची लाज राखली आहे कै. राजवाडे याचा धातुकोश प्रसिद्ध झाल्यास व्युत्पत्तिशास्त्राचे कोष्टक अंशत भरून निघेल ह्या कोशाच्या प्रसिद्धीला पुण्यातील काही विद्वान विघ्न आणीत आहेत हे पाहून खेद होतो एका माणसाने दुसऱ्यास तुझा ग्रथ मूर्खपणाने भरला आहे तो तूं छापून प्रसिद्ध करू नको म्हणून सागणे हे कमालीचे धार्ष्ट्य होय. ह्या दुर्वासाना "इश्श मेला नवरा" चालतो पण राजवाड्याच्या त्यानी कधी न पाहिलेल्या परतु त्याच्या मते प्रमादानी भरलेल्या धातुकोशाने मात्र हिंदुस्थानाच्या पैशाचा अपव्यय होत असलेला पाहून त्याचा जीव कासावीस होत आहे! वाङ्मय क्षेत्रातली ही हिटलरशाही हिटलर प्रमाणेच अपूर्व आहे! संशोधकांत प्रसिद्ध होणारा राजवाड्याचा ज्ञानेश्वरीचा ९ वा अध्याय व्युत्पत्ति ग्रंथात भर टाकणारा आहे व्युत्पत्ति जाणणाराना वेदाचा अभ्यास करणे अवश्य आहे फार्शी–मराठी कोशात तवाना ( सशक्त ) हा फार्शी शब्द म्हणून दिला आहे. परंतु मला वाटते ऋग्वेदातील ( १०-८३-३ ) तवीयान ( बलवान् ) ह्या शब्दावरुन तवाना ( ताजा तवाना ) शब्द मराठीत आला असावा

जॉनसन सारख्या एकाकी कष्ट करणाऱ्या रानड्याच्या इंग्रजी मराठी कोशानंतर शब्दकोश मंडळाने हाती घेतलेले मराठी कोशाचे काम पुरे होईल तेव्हा मराठीच्या संपन्नतेत चागलीच भर पडेल ह्यात संशय नाही कॅंडी साहेबाच्या कोशास सरकारने ५०००० रुपयाची मदत केली होती म्हणतात, ह्याचा विचार आजच्या शिक्षणमत्र्यानी केल्यास कोशाचा अधिक विस्तार करण्यास कोशमंडळाला प्रोत्साहन येईल खेड्यातील शब्दाचा संग्रह करणे अवश्य आहे मराठी भाषा बोलली जाते अशा सर्व ठिकाणचे शब्द गोळा केल्यास मराठीची शब्दसंपत्ति अफाट आहे ह्याची खात्री पटेल कित्येक जुने शब्दहि पुनरुद्धार करण्याच्या लायकीचे आहेत. उ. एकमरणे=फितणे ( प्रस्तुतकाळी सारे राज्य एकसरले आहे ) वारापाणी=नाश ( खामखा फौज जमा करून चळ घ्यावा ( चालून जावे ) म्हणजे आपणच वारापाणी होतात ); माणसाई=माणुसकी ( पदरीं लहान माणसाई येते ), कारणी=गुणी, उपयुक्त ( कारणी पुरुष ) वगैरे सिंधी, गुजराथी आणि कानडी ह्या पेक्षा मराठीची शब्दसंपत्ति मोठी आहे

**चरित्रें**

समाजाच्या इतिहासाप्रमाणे व्यक्तीचा इतिहास असतो ह्यालाच चरित्र असें म्हणतात समाजाला ज्यानी वळण लाविले आहे अथवा ज्याच्यात लोकोत्तर गुण आहेत किंवा ज्यानी समाजाची विशेष सेवा केली आहे अशा विभूतीचा इतिहास भावी पिढीला कळणें अवश्य असते जसा चरित्रनायक तसा चरित्रकार पाहिजे डॉ. भाडारकरा सारख्या विद्वानाचें चरित्र लिहिण्यास चरित्रकारहि विद्वान लागतो बाणेदार लेखकच रा. सा. मडलिकाचे चरित्र लिहूं शकेल. राष्ट्राच्या विचारात क्राति घडवून आणणाऱ्या टिळक आगरकरासारख्याचें चरित्र लिहिण्यास उत्तम असे योग्य चरित्रकार मिळाल्यास चरित्रनायकाच्या प्रमुख व विशिष्ट गुणाला प्रामुख्य मिळते नाही तर अवातर गोष्टींचाच बडेजाव केला जातो अर्थात् हा सामान्य नियम म्हणूनच घेऊन चालले पाहिजे. रानडे, टिळक, मंडलिक, भाडारकर, तेलंग, आगरकर, हरिभाऊ आपटे, विष्णुशास्त्री चिपळूणकर, आनंदीबाई जोशी ह्याची चरित्रें आपआपल्यापरी कमजास्त प्रमाणाने वाचनीय आहेत. गोखल्याच्या चरित्राची उणीव भरून काढण्यास कोणी पुढे येत नाही ह्याची मीमासा काय करावी ते समजत नाही श्री खानोलकरासारख्याचे प्रयत्न विचारात घेतले तर चरित्रात्मक वाङ्मयात आपण पुढे सरसावत आहो असे वाटून समाधान होते. पर प्रातातील लौकिकवान पुरुषाचीं विस्तृत चरित्रे लिहिण्याचे दिवस अद्यापि यावयाचे आहेत, आत्मचरित्रे निर्विकार मनाने लिहिली तर मनोरजक व उद्बोधक झाल्या शिवाय राहणार नाहीत बाबा पदमजीचा अरुणोदय अत्यंत वाचनीय आहे. अलीकडील काळात कर्व्यांच्या आत्मचरित्रा शिवाय दुसरें आत्मचरित्र प्रसिद्ध झालेलें दिसत नाही दादोबाचेहि आत्मचरित्र बऱ्यापैकी आहे. ह्या आत्मश्लाघेच्या काळात आत्मचरित्राचा अभाव हा चमत्कारिक असला तरी इष्टच मानला पाहिजे

**भाषांतरें**

संस्कृत ग्रथाचीं भाषातरें मराठींत होत आहेत हेहि आमच्या वाढत्या जिज्ञासेचे फल आहे ऋग्वेद, भारत, रामायण, कौटिलीय अर्थशास्त्र, ऐतरेय ब्राह्मण, निरुक्त हीं मराठीत आणल्याने मराठी वाङ्मयात चागली भर पडली आहे. पतंजलींचे महाभाष्य, वात्स्यायनाची कामसूत्रे ह्याच्या भाषातरानी तर मराठीचा डौल वाढल्या शिवाय राहणार नाही यजुर्वेदाचे भाषातर होत आहे तसेंच अथर्ववेदाचे व्हावयास पाहिजे. ऋग्वेद, यजुर्वेदाच्या अभिमान्याप्रमाणे अथर्ववेदाचा पुरस्कार करणारा कोणी नाही. म्हणूनच ह्या चतुर्थवेदाचें भाषांतर

झाल्यास तें केवळ आपल्या ज्ञानलालसेनेच होणारे आहे कालाच्या अंतरामुळे भाषातर करणे अत्यंत दुर्घट कर्म आहे प्रथमत प्रमादप्रचुर भाषातरे होणे स्वाभाविक आहे " विमानप्रतिमा चक्रे पाडवस्य शुभा सभाम् " (भारतसभापर्व) ह्यातील " विमानप्रतिमा " ह्याचा अर्थ विमानासारखा सभेचा नकाशा अथवा परिमाणात काढलेलें सभेचे चित्र ह्यापैकी कोणता बरोबर होईल ह्या विषयी काही काल सशय राहणारच—वेदाच्या भाषातरासंबंधाने ही अडचण अधिकच भासणार. शतपथादि ब्राह्मण व श्रौतस्मार्त सूत्रे ह्याची भाषातरे होणे अवश्य आहे बारीकसा निबंध लिहून डॉक्टर होऊ पाहण्यापेक्षा असलें काम करणें अधिक महत्त्वाचे आहे. वैदिक वाङ्मय मराठींत आल्यावर त्याचा परिणाम नवीन विचार व संशोधन ह्यावर क्रातिकारक होईल असे मला वाटते.

**काव्य**

काव्य हे स्वतंत्र वर्गात मोडतें. काव्याला ललित वाङ्मय म्हणतात. कादम्बऱ्या, लघुकथा, नाटके व कविता ही ह्या वाङ्मयाची अंगे होत हे वाङमय अत्यत प्राचीन, अत्यंत लोकप्रिय आणि अत्यंत विस्तृत असे आहे ह्या शिवाय ह्या वाङ्मया संबधाने विशेष हा आहे की, पुरुषाप्रमाणे स्त्रियानी हि एतद्विषयक यश संपादन केले आहे आणि ह्मणूनच ह्या ललनाश्रित वाङ्मयाला ललित वाङ्मय ह्मणण्याचा प्रघात पडला असावा ! कवित्व ह्मणजे रामदासानी ह्मटल्याप्रमाणे परिमळयुक्त शब्दसुमनाची मालाच होय. तेच शब्द, तोच अर्थ तथापि ग्रथनकौशल्याने काव्याला मनोहारित्व येते काव्यात पदलालित्याचें महत्व विशेष तर शास्त्रीय प्रबंधात पदलालित्य दुर्जनाप्रमाणे टाळावे लागते हिंदुस्थानात १० कोटी पुरुष, १० कोटी बायका आणि १० कोटी मुले आहेत असे सागणाऱ्या खानेसुमारीच्या लेखकाला पुरुषाच्या ऐवजी नर अगर पुन्नाग, बायकाच्या ऐवजी चारुगात्री अथवा अबला आणि मुलाच्या ऐवजी शिशु किंवा पोत हे शब्द वापरून कसे चालेल ? शास्त्र आणि काव्य ह्यात दुसरा महत्वाचा भेद आहें तो हा की, शास्त्र बाह्य वस्तुनिष्ठ असते. उलट काव्य मनोनिष्ठ असते. तसेच शास्त्राला सत्याचा आधार तर कल्पना हा काव्याचा आत्मा. शास्त्र बुद्धिप्रधान, काव्य भावनाप्रधान; काव्य आनंद प्रसवते, शास्त्र सज्ञान करते साहित्य हे नाण्या प्रमाणे आहे त्याला स्वतःची किंमत थोडी पण बाजार किंमत फार. चरित्रकार, प्रवासलेखक, इतिहासकार, तत्त्वज्ञानी हे सर्व लिहीताना आपल्याला पूर्णपणे विसरतात आणि वर्ण्य विषयाशीं तादात्म्य पावतात. अशा लिखाणात लेखकाचीं स्वत.ची मते अथवा त्याच्या विशिष्ट मनोवृत्ति याचा यत्किंचितहि ठसा उमटेल

तर तो मोठाच दोष समजला पाहिजे काव्यात कल्पनाचा व भावनाचा विलास अनुभविता येतो "न तत् त्र्यक्ष· सहस्त्राक्षो वा यच्चर्मचक्षुषोपि कवय· पश्यति" तीन डोळ्याच्या शकराला काय पण हजार डोळ्याच्या विराट पुरुषाला सुद्धा जें दिसत नाही ते दोन डोळ्याच्या कवीला सहज दिसते. असें दिसणे ह्यातच कवीचा मोठेपणा असतो. त्यातच कवीची प्रतिभा दिसून येते चादरात अथवा चाफा ह्या कविता वाचल्या म्हणजे कवी आपणास दिसतात त्या नेत्रानी पाहत नसून दुसऱ्या अप्रकट अशा नेत्रानी पाहत असतो असे दिसून येईल उडुगणाच्या रथात विश्वाच्या राणीस बसवून अनताची प्रदक्षिणा ते करीत असतात

कल्पना प्रमाणे मनुष्यस्वभाव आणि मनोभावना हे काव्याचे आधारस्तंभ होत. मनुष्यस्वभावाचे व सुखदु खात्मक भावनाचे शाब्दिक वर्णन पद्यमय असते तेव्हा त्याला आपण कविता म्हणतो, कादबरीत हेच वर्णन गद्यात असते, नाटक गद्यपद्यमय असून साभिनय असते, अभिनय हे जरी प्रामुख्याने नटांचे कार्य असले तरी त्याचे बीज लेखकाला पेरावे लागते कविता आणि नाटक, कादंबऱ्या ह्यात थोडा भेद आहे. Literature is fundamentally an expression of life ही व्याख्या नाटक कादंबऱ्यानाच अधिक लागूं पडते. मानवी जीवनाचे चित्र ह्यातच विशेष रंगविलेलें असते. रसात्मक काव्यं ही व्याख्या कवितेच्या सबधाने विशेषत योग्य होईल पळणाऱ्या हरणावर रचलेले काव्य कोणच्या जीवनाचे वास्तविक चित्र म्हणता येईल? मनुष्य व्यवहार भावना प्रेरित असल्यामुळे भावना, व्यवहार ( कृति ) हीं दोन हि काव्यात असतात तथापि त्यात कृतीपेक्षा भावना अधिक उठावदार पाहिजेत तरच रस उत्पन्न होतो नाटके व कादबऱ्या ह्यात भावनाहून कृतीला महत्त्व जास्त असते पण त्यामुळे त्याची योग्यता कमी असतें असे मात्र नव्हे. "त्रैगुण्योद्भवमत्र लोकचरित नानारस दृश्यते" !

**नाटकें**

शकराच्या ज्या नृत्या पासून चौदा ललित कलाचा जन्म झाला त्यातीं नाट्य ही एक कला आहे साऱ्या वेदाचे सार काढून प्रत्यक्ष ब्रह्मदेवाने ही विद्या भरतमुनींना दिली व देवोपदेवानी ज्या वेळीं भरतमुनीच्या सूत्रधारित्वा खाली नाटकाचा प्रथम प्रयोग केला त्यावेळी प्रत्यक्ष शंकराना किंवा पार्वतीला ताडव नृत्य आणि लास्य नृत्य करण्यास कमीपणा वाटला नाही. मालविकाग्निमित्राच्या काळीसुद्धा गणदास किंवा हरदत्त यांसारखे गायननृत्य कुशल आचार्य

मालविकेसारख्या राजकन्येला नाट्यकेलेचें शिक्षण देऊन या उच्च कलेची मान्यता लोकात प्रस्थापित करीत ह्या प्रमाणे ह्या कलेला मानाचे स्थान एका कालीं प्राप्त झालें असून अलीकडे तिच्या उपासकाचा दर्जा कमी लेखण्यात आला हे चमत्कारिक दिसतें. तथापि ह्याला हे उपासकच अशत कारणीभूत आहेत ह्यात शका नाही. “ देवाना इदमामनन्ति मुनय कान्तक्रतु चाक्षुषम् ” ही थोर पदवी नाट्यकलेला मिळवून देणे हे ह्या कलोपासकाच्या स्वाधीन आहे

कालिदासाने मालविकाग्निमित्रात खरे नाटक कशा प्रकारचे पाहिजे याची ठोकळ लक्षणे उत्तम प्रकारे दिली आहेत नाटकाच्या कथानकाची वाढ ही सत्त्व, रज, तम ह्या तीन गुणानी युक्त असलेल्या अशा विविध पात्राच्या परस्पर सबधा-पासून झाली पाहिजे मनुष्यावरूनच मनुष्यजात समजावून घेतली पाहिजे ह्या पोपच्या सिद्धातास अनुसरून ते लोकचरित म्हणजे मनुष्यस्वभावाच्या एखाद्या विशिष्ट अगाचे निदर्शक पाहिजे करुण, हास्य किंवा वीर ह्या पैकी एका रसाचाच परिपोष न करता सर्वरसाचा समप्रमाणात योग्य मिलाफ झाला असला तरच बायकामुलाचें, शिक्षिताशिक्षिताचे मनोरजन होतें. अशा प्रकारची मराठी रंगभूमि अद्यापि तरी अलकृत झालेली दिसत नाहीं

कै. विष्णुदास भावे याच्या सहायाने रामायण, महाभारताची कथानके सवादरूपानें म्हणत कै आप्पासाहेब पटवर्धन याच्या राजदरबारात नाट्यकलेने सुमारे ९० वर्षापूर्वी प्रवेश केला संभाषणाचे स्वरूप अनिश्चित, नेपथ्यरचनेचा अभाव, सर्व गायनाची जबाबदारी एकट्या सूत्रधारावर आणि आजकालच्या विदूषकाप्रमाणे हास्य उत्पन्न करण्याचे काम विदूषकावर अशी तेव्हाची स्थिति होती बहुतेक पात्रे आयत्यावेळी सुचेल तें सभाषणात म्हणत देवदानवाच्या लढाया व आरडाओरड हे तत्कालीन नाट्यकलेचे प्रमुख स्वरूप होतें ह्या नतर इंग्रजी शिकलेल्या विद्वानाना मराठी रगभूमीचे हें रानवट स्वरूप पसत न पडून निश्चित संवादाचा सागाडा तयार करण्यासाठी त्यानी सस्कृत व इंग्रजी नाटकाची भाषातरे मराठीत करून ती रंगभूमीवर आणली परशुरामतात्या गडबोले, वासुदेवराव केळकर, रा ब महाजनी, कीर्तने वगैरेनी वेणीसंहार, मृच्छकटिक, हॅम्लेट, त्राटिका, दुर्गा, किंगलीअर, रोमिओ आणि ज्यूलिएट वगैरेचीं भाषातरें करून मराठी नाटकांना वाङ्मयात स्थान मिळवून दिले ह्या नतर कै त्रिलोकेकर आणि त्याच्या मागून अण्णा किर्लोस्कर यानी विदुषकाच्या पात्राला रजा देऊन सूत्र-धाराची सर्व नाटकात चालणारी लुडबूड बंद केली व नाट्यकलेला सर्वच पात्राच्या

तोंडून सरस्वती सारखे सुरेल सूर काढावयास लावले किर्लोस्कर ह्याची योग्यता आणखी एका दृष्टीने फार मोठी आहे सौभद्र, रामराज्यवियोगासारख्या स्वतंत्र संगीत नाटयरचनेचे ते आद्य प्रणेते होते. त्या नंतर देवलांच्या शारदेने व संशय कल्लोलाने प्रवेश केला ह्या सर्वच नाटकातील संवाद, पदे व कथानक किती निर्दोष आहेत हे आजतागायत त्याची रुचि अवीट राहिली आहे ह्या वरून दिसून येणार आहे संगीत, संवाद व कथा या दृष्टीने समप्रमाणात जे स्थान मराठी रंगभूमीला या वेळी प्राप्त झाले होते ते अद्यापि तरी पुन परत मिळालेलें दिसत नाही. देवलानतर श्रीपाद कृष्ण कोल्हटकरानी आपलीं वीरतनय, मूकनायक वगैरे नाटके पुढे आणली, परंतु त्यानी जो एक नवीन पायडा पाडला त्याचे परिणाम मराठी नाटयकलेला आजवर भोगावे लागत आहेत नाटकाच्या भाषेला त्यानी अलंकारिक स्वरूप दिले पण हे अलकार पुढे पुढे इतके बोकाळले की नाट-कातला साधा सेवक देखील अगावर लतकरे असतानाहि तोंडातून नवलाखाचे बोल काढूं लागला. सरळ बोलणेंच मुळी पात्राच्या तोंडून येईना ओढाताण करून जुळविलेल्या शाब्दिक कोटयानी रगदेवताही एखाद्या चार वर्षाच्या सोळा हात जरी काठी पैठणी नेसून अडखळत चालणाऱ्या मुलीसारखी दिसू लागली. लोकचरिताचे चित्रीकरण करणे हा नाटकाचा आत्मा असून भाषा हे केवळ शरीर अथवा साधन आहे. कै कीर्तने ह्यानी आपल्या जयपाळ नाटकाच्या इग्रजी प्रस्तावनेत हीं गोष्ट स्पष्ट केली आहे "It is with the feelings and passions of man alone that one can concern himself in a work like this". भाषेच्या द्वारे लोकरंजन करून कथानकाच्या द्वारे लोकशिक्षण द्यावयाचे असते. हे काम किती नाटके करीत आहेत ह्याचा आपण विचार करा गडकऱ्यानी हा कोल्हटकरी सांप्रदाय प्रेमसन्यास व राजसंन्यास ह्या नाटकात कळसाला पोचविला तो इतका की, तात्या साहेब केळकराना देखील राजसंन्या-सातली भाषा एकदा वाचून समजेना. नाट्याचार्य खाडीलकरानी भाऊबंदकी. कीचकवध, सवाई माधवरावाचा मृत्यु वगैरे गद्यकृति वाखाणण्यासारख्या लिहिल्या, परतु नटाच्या आहारी जाऊन ज्या वेळेला त्यानी सगीत नाटके हातात घेतली त्या वेळी मेनकेच्या ताब्यात जाणाऱ्या विश्वामित्राप्रमाणे नाट्यसेवेच्या बाबतीत त्याची अवस्था झाली वरेरकर हे एकच माझ्या दृष्टीनें स्वतंत्र परंपरा पाडणारे नाटककार आहेत. परंतु सर्वकाळी, सर्वस्थळी झगडा करणाऱ्या भिन्न प्रवृत्तीच्या मनुष्यस्वभावापेक्षा आपल्या भोवती असणाऱ्या समाजातील काही कालपर्यंत जिव्हाळ्याचे वाटणारे प्रश्न त्यानी आपल्या नाटकात

गोवले असल्यामुळे त्याची नाटकें यशस्वी झाली तरी ते यश चिरकाल त्याना लाभणार नाही समाज झपाट्याने बदलत असल्यामुळे अशा नाटकातील प्रसंग लवकर शिळे होतात, मुलाच्या हुंड्यासाठी तटून बसणारा त्याचा "हाच मुलाचा बाप" आता म्हातारा झाला आहे "तुरुंगाच्या दारात' पाय ठेवण्याचे ढोंग करून "सोन्याच्याकळसावर" चढू पाहणारें "सत्तेचे गुलाम" आता सर्वांना ओळखीचे झाले आहेत त्यात नाविन्य उरलेलें नाही. अशा वेळी समाजाला त्याच्या अन्तःकरणात सदा सर्व काळ चालणाऱ्या सद्वृत्तीचीं आणि असद्वृत्तीच। चित्रे दाखविल्या वाचून मराठी नाट्यकलेची धडगत दिसत नाही बोलपटाच्या हल्ल्याला भिऊन रंगभूमीच्या "मगलभुवना" ला चागल्या चागल्या नटानी आजच "साष्टाग नमस्कार" घालावयास सुरवात केली आहे क्षणोक्षणीं नवता उत्पन्न करणारी अशी नाटकाच्या नवरत्नाची माळ नाट्यकलेच्या गळयात घालण्याचा कोणी प्रयत्न न करता जरी ही "आधळयाची शाळा" अशीच चालू ठेविली तर नाट्यकलेला "घरा बाहेर" निश्चित पडावे लागले आज मराठी रगभूमीची प्रगति झाली असे आपण ह्मणतो, पण वास्तविक चार विनोदी कोट्या करून लोकरजन करण्या खेरीज भरीव काम फारसे झालेलें नाहीं पूर्वीचा एक विदूषक घालविला खरा, पण आता नायकासुद्धा सर्वच पात्रे विदूषक बनली आहेत साराश नाट्यकलेच्या अतरंगात व ध्येयात आमूलाग्र बदल व्हावयास पाहिजे.

**ध्वनिकाव्य**

काव्याची उपयुक्तता नाहीं असें नाहीं. सामान्य मनुष्यात दैवीसंपत्ति निर्माण करण्यास काव्य हेच तेजस्वी साधन आहे उत्तम काव्य आपणास उच्च वातावरणात नेऊन सोडतें. वाच्यार्थानें जो उपदेश मनावर ठसत नाही तोच काव्यातील ध्वनीनें ठसतो. खरे बोलावे हें गद्यतत्त्वज्ञान किती हि विवेचिलें तरी सामान्य जनावर त्याचा परिणाम होत नाही, परंतु तीच गोष्ट गोष्टीच्या रुपाने काव्यात ध्वनित केली म्हणजे अत्यंत परिणामावह होते ध्वनिकाव्याचा प्रदेश स्वतंत्र आहे हे ध्यानात धरावे हरतऱ्हेचे काव्य ध्वनिकाव्य असलेच पाहिजे हा आग्रह धरणें युक्त होणार नाहीं अशब्दगोचर असा कवीचा व्यंग्य अभिप्राय प्रत्येक ठिकाणीं प्रशंसनीय ठरेल असें नाही. ध्वनि हे उत्कृष्ट काव्याचे लक्षण खरें, परंतु अलंकार शास्त्राच्या ग्रंथातून दिलेलीं पुष्कळ उदाहरणें (उ रवि अस्तंगत) चुकीचीं आहेत. रूपक, उत्प्रेक्षा, लक्षणा वगैरे प्रत्येक अलंकार ध्वन्यर्थाचें उदाहरण म्हणून पुढे करणे अयोग्य होईल. "दोन मोतीं गळालीं, सत्तावोस

मोहरा हरवल्या. रूपये व खुर्दा त्याचा पत्ता नाही '' हे रूपकालकारी वाक्य उत्तम ध्वनीचे उदाहरण देता येईल असें मला वाटत नाही ध्वनि हा कोणा हि रसिकाला केव्हाहि, बुद्धीला विशेष ताण न पडता समजला पाहिजे ज्या वेळेस वरील वाक्य लिहिलें त्यावेळी मोती व मोहरा ह्या शब्दानी कोण सूचित झाले हें लोकास माहीत होते नाही तर कोणीतरी लहान मोठी माणसें मेलीं ह्याच्या पलीकडे वरील वाक्याचा बोध सर्व माणसास होणार नाही श्री ग र आगाशे ह्यानी गोरसहरण काव्याचे विश्लेषण करुन त्यात रसध्वनि कसा साधला आहे हे फार मार्मिक रीतीने दाखविले आहे हे ध्वनि काव्याचे उत्तम उदाहरण आहे त्यात शका नाही

**शब्दालंकार व यमकें**

शब्दालकाराची हेटाळणी करण्याची ट्रम प्रशसनीय आहे असे मला वाटत नाही. अलकारानीं काव्याची चारुता फुलते ह्यात सशय नाही मराठीत यमकाचा प्रवेश कोठून झाला हा चर्चेचा विषय आहे. मला वाटते वेदात यमक ह्या शब्दालकाराचे बीज सापडण्यासारखें आहे. उ.

असौ भीमाय नमसासमध्वरउषोन शुभ्र आभरा **पनीयसे** ।
यस्य धामश्रवसे नामेन्द्रिय ज्योतिरकारि हरितो **नायसे** ।

( ऋ १-५७-३ )

अशी आणखीहि उदाहरणे देता येतील

**काव्यानंद**

काव्याचा आनद रसिकालाच होईल. अरसिक ह्या आनंदाला पारखे आहेत. रसिकाची दृष्टि शरिराच्या अगर व्यक्तीच्या पलीकडे असते ओलेतीचे चित्र पाहून आम्हाला बीभत्स-पणाची शिसारी येते ह्याचे कारण अरसिकता हे होय. रसिकतेच्या अभावी म्हणजे कलेचे ज्ञान नसल्यामुळे त्या चित्रातील स्त्रीचा उघडा भागच आमच्या चर्मचक्षुंना दिसतो कलाभिज्ञ वा रसज्ञ त्याने कोणत्याहि स्थितीतले चित्र पाहिलें अथवा काव्य वाचले तरी तो रसवापीत मज्जन करीत आत्मानंदच अनुभवीत राहील. मात्र तेथे रस किंवा कला असावयास पाहिजे. सात्विक वृत्तींतच आनंद होतो शोकपर्यवसायी नाटक पाहून आनंद होतो ह्याचेहि कारण तेंच. व्यक्तिविशिष्टत्व ज्याचे सुटत नाही त्यास उत्तररामचरित्रातील राम शोक करूं लागला की रडूच येते, रसिक-

तेचा आनंद होत नाहीं. ते लोक व्यक्तीत गुरफटलेले असतात मात्र हे त्याचे रडणे व पुत्रशोकजन्य रडणे ह्याचे स्वरूप एकच नाही खराखुरा राम शोक करीत होता तेव्हा कोणाला आनंद झाल्याचे अनुभवास आले नाही. भवभूतीच्या नाटकातला राम रंगभूमीवर शोक करतो ते पाहूनच रसजन्य आनद प्रेक्षकाला होतो भावदर्शनपटु मुलाच्या रडण्याची बतावणी करतात ती पाहून सर्व मुले आनदाने हासूं लागतात भावदर्शक रडत असतो म्हणून मुले रडत नाहीत. एवढा रस समजण्या इतके ज्ञान त्याना असते

**भावना**

सर्व कार्य भावनेमुळेच होत असते जगात आजवर मनुष्याच्या हातून जीं आश्चर्यकार्यक,प्रचंड व अचाट कृत्ये झाली आहेत त्याचा उगम भावनात आहे पुष्कळ सख्येत समाजाचे बळ नसून ते मनुष्याच्या भावनाची तडफ व व जोम ह्यात असतें भावना उत्कट पाहिजेत पण बेफाम असता कामा नये दुर्दम्य पण सात्विक भावना समाजाचे कल्याण करू शकतात. म्हणून समाजनेत्यानी अर्थात् विदग्ध वाङ्मयकारानी राष्ट्रातील लोकाच्या भावनाना इष्ट वळण लावले पाहिजे भावनाना अनिष्ट वळण लावणारे लेखक समाजाचे शत्रू होत.

**स्फूर्ति**

उत्तम काव्याचा उद्भव स्फूर्तीत होतो हा फारच अल्प प्रमाणात खरा असणारा सिद्धात अजून काव्यसृष्टीत टिकून राहिला आहे ह्याचें आश्चर्य वाटते कलेशिवाय उत्कृष्ट काव्य नाही, आणि कला व स्फूर्ति ह्याचे साहचर्य असंभवनीय आहे. शिकलेले ब्राह्मण कुळबाऊ भाषेत ग्रामगीते रचतात हें स्फूर्तीचें द्योतक कसे म्हणता येईल ? अपरिचित भाषा स्फूर्तीच्या प्रसंगी मुखावाटे बाहेर पडेल काय ? तसेच शातवृत्तीचा मनुष्य कोपिष्ठ माणसाचे चित्र रंगवूं शकतो हें काय स्फूर्तीचे कार्य म्हणता येईल ? outburst of spontaneous feeling ही काव्याची व्याख्या फारच मर्यादित अर्थाने खरी आहे उत्तम कवि सर्व सृष्टिजाताकडे प्रेमाने पाहतो. सर्व रस ह्या प्रेमाच्या अगभूत आहेत प्रेमामुळेच करुणा, शोक, शृगार इत्यादिकाचा उद्भव होतो. आपल्या स्वत वरच प्रेम करणारा कवि सामान्यत शोकरसातच बुचकळ्या मारीत बसतो फक्त स्त्रीजातीवर प्रेम करणाऱ्या कवीचे काव्य शृगारमय होते पुरुषजातीवर एकातिक प्रेम करणारा कवि वीररस प्राधान्येकरून प्रसवतो ह्याच्या उलट सर्वसृष्ट पदार्थांवर प्रेम करणाऱ्या कवीच्या काव्यात सर्व रस प्रमाणशीर असतात निष्प्रेमी मनुष्य अर्थात् निष्क्रिय असतो कदाचित् त्याने काव्य केलेच तर तें नुसते शब्दाचे अवडंबर असतें

**काव्याचा हेतु**

काव्यापासून आनद होतो हा एक काव्याचा उपयोग आहे परंतु हा आनद रसिकालाच होऊ शकतो आणि रसिकता ही सुसंस्कृत मनाच्या ठिकाणींच उत्पन्न होते ह्या दृष्टीने काव्याचा उपयोग फारच थोड्या लोकाना होणार हे उघड आहे काव्य रसमय असतें म्हणून आपातत: आनंदोत्पत्ति होते रसिकाच्या ठिकाणी आनदवृत्ति निर्माण करणे हा काव्याचा धर्म आहे, आनंदजनन हा काव्याचा हेतु नव्हे असा हेतु असता तर अश्लील अथवा उत्तान शृंगारपर काव्य ह्याचें समर्थन चागलेच करता आले असतें कारण बहुजनसमुहाला विषया शिवाय दुसरा विषय समजत नाही आता आनदोत्पत्ति हा जर काव्याचा हेतु नाहीं-तर दुसरा हेतु कोणता ? का काव्य हे निर्हेतुक असते ! कोणतीहि कृति अनुद्दिष्ट असते असे म्हणणे वेडेपणाचे होईल समाजातील दोष, बोचणार नाही अशा शब्दशस्त्राने कुशलतेने काढणे व सकल्पित राष्ट्रकार्याला जनसमुहाला प्रवृत्त करणे हा काव्याचा हेतु असला पाहिजे. आनदप्रसू काव्याहून काव्याची ही जात निराळ्या प्रकारची असते, लोकाच्या भावना जाणून त्याचा उपयोग राष्ट्रकार्याकडे जो कवि अथवा कादंबरी नाटककार करील तोच राष्ट्राचा उपकर्ता ठरेल सामाजिक दोषाचे निर्मूलन करणाराला समाजाचे सूक्ष्म निरीक्षण करावे लागते समाजातील कोणती व्यगे किती प्रमाणात समाजाच्या ऱ्हासाला कारणीभूत झाली आहेत ह्याचे पूर्ण ज्ञान कवीला असले पाहिजे लोकाच्या भावना उद्दीप्त करून त्या राष्ट्रकार्यी लावणारा कवी राष्ट्रीय ध्येयाशीं अनुस्यूत असावा लागतो अशा रीतीने कोणत्या कवीने कोणते काम केले आहे हे अद्यापि कोणी विवेचिलेले दिसत नाही आनंदोत्पादन करणारे कवि उपयुक्ततेच्या दृष्टीने खालच्या पायरीवर लागतील कवीचे हे चार प्रकार झाले, (१) नुसते वस्तुस्थितीचे हृदयंगम चित्र रंगविणारे (२) कल्पनाच्या वावटळाने आश्चर्ययुक्त आनंद उत्पन्न करणारे (३) उपहासाने किंवा काल्पनिक उदाहरणानी समाजाचीं व्यंगे काढून टाकणारे आणि (४) भावना उद्दीप्त करून समाजाकडून राष्ट्रीय कार्य उघडवून आणणारे प्रत्येकाच्या अगी निरनिराळे गुण असावे लागतात देवलांनी जरठतरुणी विवाह बंद पाडले, गडकऱ्यानी दारुबाजीला आळा घातला, केशवसुतानी समाजातील अन्याय चव्हाट्यावर आणले, भावना जागृत करून राष्ट्रकार्य करणारे कवि मात्र अद्यापि जन्मास यावयाचे आहेत. कदाचित् संकट टाळण्याकरता अशा काव्याचा गर्भपात हि होत असेल. तथापि कवींचें वर्गीकरण खालीलप्रमाणे करता येईल

## राष्ट्रीयध्येयवाले.

विनायक, सावरकर, कुजविहारी, टेकाडे, तिवारी, देशपांडे पडित, खाडीलकर (शाहीर), बेहरे, अज्ञातवासी, गोविंद

## समाज सुधारक.

१ केशवसुत २ गोविंदाग्रज ३ माधव ज्युलिअन ४ केशवकुमार ५ मायदेव ६ सोपानदेव चौधरी

## सौंदर्योपासक.

१ दत्त घाटे २ ठोंबरे ३ टिळक ४ गिरीश ५ यशवंत ६ काणेकर ७ काव्यविहारी ८ चंद्रशेखर ९ मोनाळकर १० तांबे ११ रानडे १३ नागेश, वगैरे

एका कवीच्या काव्याने एका ठिकाणचे दरोडे कमी झाले असे एक प्राचीन युरोपिअन इतिहासकार सागतो. आमच्याकडे अशा प्रकारचे श्रेय कोणा कवीला लाभले आहे काय ? तुरुंगातील कैद्याकडून दुष्प्रवृत्तिनिवारक कविता सक्तीने पाठ करून घेण्याचा प्रयोग करून पाहण्यासारखा आहे. एका काली सकारण असलेल्या चाली कालांतराने कारणे नष्ट झाल्यावर सुद्धा चालू राहतात आणि त्या हास्यास्पद होतात. अशा चालीची हजीरी कवींनी घेण्यात वावगे काही नाही परंतु राष्ट्रीय दोष नाहीसे करणे हे अधिक निकडीचे व महत्वाचे कार्य त्यांनी हाती घेणे अगत्याचे आहे

**अश्लीलता**

अश्लीलतेची दुर्गंधि ललित वाङ्मयालाच लागण्याचा संभव असतो. अश्लीलता ही शब्दात, शब्दाच्या मांडणीत, विचारात आणि सूचकतेत अशी सर्वत्र असू शकते. प्रत्येक समाजाला काही आचार व विचार पवित्र असे वाटत असतात त्या समाजाला विरुद्ध विचार अश्लील वाटणे स्वाभाविक आहे, विचार दडपून टाकणे तात्पुरते हितावह वाटले तरी परिणामी हानिकारक होतें हे निर्विवाद आहे निदान जित राष्ट्राने तरी विचारबंदीची ओरड करणे आत्मघातकीपणाचे होईल धर्मकारण असो, राजकारण असो वा समाजकारण असो अभिजात विचार स्वातंत्र्य अप्रतिहत असेच असले पाहिजे. केवळ कामुकता वाढविणे हा ज्या वाङ्मयाचा उद्देश ते वाङ्मय अश्लील अथवा त्याज्य अथवा हीणकस असेच कोणी

हि मानील. असले वाङ्मय फैलावणें हें समाजाच्या अवनतीचें लक्षण आहे. ग्रीसच्या ऱ्हासापूर्वी अशाच वाङ्मयाला ऊत आला होता. डॉ. मॅहॅफी याच्या ग्रीक लाइफ ॲंड थॅाट ह्या पुस्तकात लिहिले आहे. " They had no serious object in life and regarded the complications of love affairs as more interesting than the rise and fall of kingdoms or the gain and loss of a nation's liberty ". तारुण्यसुलभ अशा कामुकतेच्या चेष्टा खुलवून रंगविणे ह्या शिवाय अधिक महत्त्वाचे, अधिक निकडीचे, अधिक उपयुक्ततेचें राष्ट्रातील विचारवताना दिमत नाहीसे झाले म्हणजें मग त्या राष्ट्राचे दिवस भरले म्हणून समजावे. कारण ह्या एका विचाराव्यतिरिक्त दुसरा विचार करण्यास माणसात पात्रता नसते. ह्याचा दोष विद्यापीठाकडे आहे सुविद्य बनविण्या करता जन्मास आलेल्या विद्यापीठाने तरुणाना विषयलोलुप, खुशालचंद, गुलहौशी बनविल्यास त्याची जबाबदारी विद्यापीठावर पडणार हे उघड आहे विद्यार्थी दशेत वैषयिक विचार मनात सुद्धा न येऊ देण्याबद्दल प्राचीनकाळी गुरु खबरदारी घेत असत. आता नुसत्या विचारालाच नव्हे तर तद्विषयक वादविवादाला मुभा देऊन गुरुच त्यात अध्यापकाचे काम करतात आणि हे सर्व उजळ माथ्याने विद्यागृहात होत असते एवढ्यावरच सरत नाही तर असल्या चर्चेचा वृत्तात अक्षरश वर्तमानपत्रात प्रसिद्ध केला जातो. लहान मुलामुलीचे स्त्रीपुरुष सबधाविषयी काय मत आहे हे समाजाला त्वरेने कळविणे ह्या वर्तमान पत्रकारास अत्यंत अगत्याचे वाटत असते. ह्या विषयाच्या मानाने लोक तुरुंगात आपखुशीने का जातात ह्याची चर्चा त्यास काहंच उपयुक्ततेची वाटत नाही. लिगविषयक ज्ञान लहानपणीच मुलाना दिलें पाहिजे हे युरोपिअन ऋषीचे वचन विद्यापीठाच्या अभ्यास क्रमात अद्यापि अगीकृत केले नसून हि प्राध्यापक आपण होऊन शिकविण्याची दक्षता बाळगतात ह्या त्याच्या शिष्यासंबंधी आस्थेची —कळकळीची प्रशंसा कोण करणार नाही ! मराठी वाङ्मय अश्लीलतेने सडले आहे असे मुळींच नाही. वैषयिक विचाराची अतिरिक्तता ह्यात मला अश्लीलतेचा वास मारतो संसारात प्रेम पाहिजे, आनद पाहिजे, मूर्खपणा पाहिजे, बीभत्सपणा हि पाहिजे. परंतु ह्या सर्व गोष्टी प्रमाणात हव्या. अल्प प्रमाणात मूर्खपणा व बीभत्सपणा शोभतो. तथापि एथून तेथून सर्वच नंगा नाच चालविल्यास कसे होणार ? सध्या प्रेमविषयक कथावर सर्व लुब्ध झाल्यासारखे दिसत आहेत. खाडेकराच्या भाषेत सागावयाचे तर " कला म्हणजे सौदर्य हें सौदर्य श्रीमंती व

विलास याचे एकुलते एक अपत्य आणि प्रणयवृत्ति ही या अपत्याची दाई या त्रिकोणात वावरणाऱ्या कल्पनेचा पसारा" आज आपल्या भोवतीं पडलेला दिसत आहे कादंबरी लेखकापुढे ध्येय नाही व समाजाची माहिती नाही. स्त्रियाच्या सबंधाने त्याना जी गोष्ट घडवून आणण्याची उत्कठा लागून राहिली आहे ती आज शूद्र मानल्या जाणाऱ्या बहुजन समाजात प्रत्यक्ष आपणास आढळते; मग हे मुठभर ब्राह्मणस्त्रियाकरताच फक्त लिहीत आहेत काय? लोकहितवादीच्या कल्पनेला आज कित्येक वर्षानंतर फळाचा बहर आलेला दिसत आहे लोकहितवादी म्हणतात "युरोपात लग्न जाणतेपणीं होतें यामुळे स्त्री पुरुषाची बरोबरी मूळ पासून असते. पोरपणीं झालेल्या लग्नात अशी बरोबरी होण्याचा सभवच नसतो व प्रीतीचाहि विशेष संभव नसतो म्हणून एके ठिकाणी जे सापडलें नाही ते अधिक ठिकाणीं शोधता शोधता फारच घाण होते व मनुष्य गचावतें." बाजीरावाच्या सावलींत वाढलेला लोकहितवादींच्या काळचा ब्राह्मण समाज वरील कल्पनेस कारणीभूत झाला असेल आजच्या ब्राह्मण समाजाची हीच स्थिति आहे अशी आजकाळच्या कादंबरीकाराची हि समजूत झालेली दिसते (ब्राम्हण म्हणजे सर्व सुशिक्षित अथवा पांढरपेशा वर्ग असे मी समजतो) आजच्या कादंबऱ्या वाचल्या म्हणजे बहुजन समाजासाठी आम्ही काही लिहित नाही असेंच म्हणावें लागतें कामोद्दीपन हा कोणत्याहि लिखाणाचा हेतु असता कामा नये. "आधीच जन विषयातले किडे । त्याची धाव कामाकडे.' असो मराठींतील अश्लीलतेची भीति मला वाटत नाही. वैषयिक विचारावर तत्त्वज्ञानाचें व कलेचें झाकण घालण्याचा जो प्रयत्न करण्यात येतो तो माझ्या मतें फार अनर्थावह आहे, रशियन क्रांतिकारक आमच्यापेक्षा शहाणा दिसतो, Humanity Uprooted या पुस्तकातील खालील वाक्ये आमच्या तरुण तरुणींनी विचार करण्या सारखीं आहेत.

"However intense" says the Russian Revolutionary, "the ardour arising from a purely sex attraction unless it is interwomen with a spirit of actual comradeship with **a hearty devotion to some social purpose** with an outgoing wish to help one another **always** not only in personal struggles but in the big issues of life, unless in other words it is interlaid with a part of mutual interests and devotions, it may soon

spend itself, create an emotional void and degenerate into antipathy " ( Page 135 ) हे विचार आमच्या कडील कट्टर सनातन्याला हि मान्य होण्यासारखे आहेत फार वाहून जाऊं नये म्हणून इशारा देणें जरूर आहे, पण एकंदरींत बोलण्यात व लिहिण्यात तसेंच क्वचित् वागण्यात आचरटपणा दिसून आला तरी माझ्या लहानपणच्या पिढीचा मला जो अनुभव आहे त्या वरून मी असे म्हणूं शकतों की, चालू पिढीतले तरुण अधिक नीतिमान आहेत. स्त्रीपुरुषाचा अनिर्बंध संबध असावा, व्यभिचाराची कल्पनाच समाजातून काढून टाकावी ह्या तत्त्वज्ञानाला मान्यता मिळवून देण्याचा प्रयत्न चालू आहे खरा, पण त्यामुळे लोकांनी भिऊन जाऊं नये अशा नीतीच्या आवडीची लहर समाजाला मधून मधून येत असते पूर्वी इराणात एका मजदाद नामक माणसानें मी पैगबर आहे असें जाहीर करून व्यभिचार दोष नाही असा उपदेश करण्यास सुरवात केली होती. लोकहितवादी म्हणतात, नशरिवान राजाने ह्या पैगंबराला फाशी देऊन त्याच्या नवनीतीचा प्रसार बंद पाडला. आपल्या कडे व्यभिचार हे पुण्य कर्म आहे असे प्रतिपादणारे शाक्तधर्म होतेच. " मी आज पासून स्त्री स्वकीय किंवा परकीय याचे ठायीं निषेध किवा व्यभिचार मानणार नाही मला सर्व सारखे आहे " अशा प्रकारची प्रतिज्ञा शाक्त धर्माचा स्वीकार करताना करावी लागत असे. धर्माचा बोज इत पर राहिला नसल्यानें तत्त्वज्ञानाचें पाघरूण घेऊन ही व्यभिचारनीति पुन डोकावूं पाहत आहे. परंतु हे रशिअन वारें येथे रुजेल असे वाटत नाही आजच ह्याचीं आनंददायक चिन्हें दिसूं लागली आहेत मुक्तात्मा व दोन ध्रुव ह्या कादंबऱ्यात प्रेमाला गौणत्व देण्यात आले आहे

**काव्याचें भावी स्वरूप**

स्त्री व पुरूष शरिराने, बुद्धीने एकाच तोलाचे आहेत अशा समजुतीने लिहिलेल्या कादंबऱ्या कितपत सरस उतरतील ह्याची शंका वाटते. स्त्रियामध्ये लावण्य, विनय, कोमलता हे गुण आजपर्यंत मानले गेले. उलट पुरुषांत हेच अवगुण समजण्यांत येत. ह्या पुढे काय होईल सागता येत नाही. स्त्रीवैशिष्ठ्य लुप्त होऊन व्यक्ति वैशिष्ट्यच तेवढें राहणार काय ? ही पुढली भीति येथेच सोडून स्त्री पुरुषांत गुणभेद व तज्जन्य स्वभावभेद आहे असें गृहीत धरल्यास त्यांचीं शब्दचित्रें वेगवेगळीं असलीं पाहिजेत हें उघड आहे. उदाहरणार्थ पुरुषांचा विनोद व स्त्रियाचा विनोद हे एकाच स्वरुपाचे असणार नाहीत. प्रियंवदा आणि अनसूया ह्याचा विनोद विदूषकाच्या विनोदाहून भिन्न स्वरुपाचा कसा आहे

हे विशद केले असता समजून येईल उपहासवृत्ति, स्वैरपणा ह्या सारखे आजपर्यंत पुरुषी मानलेले गुण अभिन्नतेच्या कल्पनेमुळे स्त्रियात हि खरोखर सक्रात झाल्यास कादंबऱ्या नाटकाचें स्वरूप एकदम बदलणे शक्य आहे. मुलाला जन्म देण्याच्या क्रियेमुळे स्त्रीला पान्हा फुटतो, तिच्या ठिकाणी अपत्यप्रेम उत्पन्न होते आणि मुलाला दुधाचा पुरवठा व्हावा म्हणून पुरुषाश्रयी बनण्याची वृत्ति तिच्यात निर्माण होते परंतु प्रसूति कर्माच्या अभावी ह्या गुणाचा लोप होणे अपरिहार्य आहे तसेच आजपर्यंतच्या कादबऱ्या कुटुंबाभोवती घुटमळत होत्या आता कुटुबसस्था नष्ट झाल्यावर काव्याच्या बाह्य स्वरुपाप्रमाणे अन्त स्वरूपहि पार पालटून जाईल.

**कला**

कवितेपेक्षा नाटक कादबऱ्यात कलेचा प्रादुर्भाव अधिक दिसतो. निदान कलेच्या विलासाला तेथे अविक वाव मिळते कवितेत कल्पनाचे खेळ खेळता येतात. नाटकात व कादंबऱ्यात भावदर्शन, वस्तुवर्णन, स्वभावरेखन ह्याचे वैशिष्ट्य असते पंडित सातवळेकर याचे कलेसबंधीचें मार्मिक विवेचन उद्बोधक आहे त्याच्या दृष्टीने पाहिल्यास मराठी वाङ्मयात कला अद्यापि जन्मास यावयाची आहे असेच म्हटले पाहिजे. खरा कलावंत परमेश्वराशी स्पर्धा करतो तो परमेश्वराच उष्टे खात नाही परमेश्वर कापूस निर्माण करतो तर मनुष्य त्या कापसा पासून कापड करून दाखवितो. एकाच झाडावर निरनिराळ्या जातीची फळे मनुष्य आणून दाखवितो ती कलाच होय. वाङ्मयातील कला ह्याच स्वरुपाची आहे कलावान कादंबरीकार असा मनुष्य निर्माण करील की तो सृष्टींत आढळणार नाही. फक्त त्यात प्राण नसेल शेक्सपीअर्सच्या नायिका ह्या पुस्तकात ग्रंथ कर्त्री म्हणते "The incident of Hermione's supposed death and concealment for sixteen years is not indeed very probable itself, nor very likely to occur in every day life. But besides all probability necessary for the purpose of poetry, it has all the likehood it can desire from the peculiar character of Hermione who is precisely the woman who could and would have acted in this manner." प्रजेकरता पत्नीचा त्याग करणारे राजे प्रत्यक्ष सृष्टींत आपणास आढळणार नाहीत, परंतु वाल्मिकीच्या रामाने सीतेचा त्याग करण्यात

आपणास अस्वाभाविक काही वाटत नाही. आपल्या कल्पनाशक्तीनें असामान्य व उदात्त स्त्रीपुरुष श्रेष्ठ दरजाचा कवि निर्माण करतो आणि त्यामुळे असे स्त्री पुरुष पुढे प्रत्यक्ष सृष्टीत जन्मास येतात हा कवीचा श्रेष्ठपणा स्पृहणीय आहे परमेश्वर नुमता मानवी देहाचा सापळा तयार करतो कवि त्यात मनुष्यत्व घालतो

**कालानुसार वर्गीकरण**

वाङ्मयाचे दुसऱ्या एका प्रकाराने वर्गीकरण करता येण्यासारखे आहे. (१) भूतकालीन (२) वर्तमानकालीन आणि (३) भविष्यकालीन ह्या दृष्टीने विचार केला तर आपण सर्वभूतकालातच वावरत आहो असे दिसते. भुताचे चर्वण करणे हे अद्यापि आमचे सुटलें नाही आमचे बरेचसे ग्रथ भूतविषयक असतात. वर्तमानाबद्दल लिहिण्याला परिश्रम लागतात कायद्याची बधने असतात. परंतु उपयुक्ततेच्या दृष्टीने वर्तमान विषयक वाङ्मय फार महत्त्वाचे असते. भविष्यविषयक वाङ्मय उत्तेजक असते. परतु भूतवर्तमान पूर्णपणे जाणणाऱ्या आणि भविष्याचे आकलन करण्या इतकी कुशाग्रबुद्धि असणाऱ्या विद्वाना शिवाय अशा प्रकारच्या वाङ्मयाची निर्मिति होणार नाही. असलें वाङ्मय मराठीत नाहीच ह्मटले तरी चालेल अशा दृष्टीने मराठी भाषेतील ग्रंथाकडे पाहिले असता आपण कोणत्या पायरीवर आहो ह्याची यथार्थ कल्पना कोणासहि करिता येईल.

**वाङ्मयाचें महत्त्व**

वाङ्मय ही समाजाची नाडी आहे कोणत्याहि समाजाच्या वाङ्मयीन स्वरुपावरून तो समाज सस्कृतीच्या कोणत्या पायरीवर आहे हे समजतें ह्या वाङ्मयावरून सरकार, लोक व विद्यापीठ ह्या तीनही संस्था परिक्षिल्या जातात. वाङ्मयाच्या बऱ्या वाइटपणाची जबाबदारी तीनहि संस्थावर सारखीच आहे म्हणून आजच्या सारख्या वाङ्मयविषयक कार्यात लोका प्रमाणे विद्यापीठाने व सरकारनेहि लक्ष घातलें पाहिजे. परतु आमच्या समेलनाची वार्ताहि दोघास नसते सरकार व विद्यापीठ ह्याच्या सहकार्याच्या अभावी देशी भाषातील वाङ्मयाला ठेचा खात खात आपला मार्ग आक्रमण करावा लागत आहे असे असूनहि मराठी भाषेचें पाऊल झपाट्याने व नेटाने पुढे पडत आहे हे पाहून आनद होतो लोकहितवादींची भाषा आणि हल्लीच्या कोणत्याहि काव्याच्या प्रस्तावनेची भाषा पाहा म्हणजे आपला अभिमान किती सकारण आहे ते लक्ष्यात येईल. प्रत्यक्ष शब्द जड पण चैतन्योत्पादनाची त्याची शक्ति प्रचंड हे जड शब्द साम्राज्याची

उलथापालथ करू शकतात ' त एव पदविन्यासास्ता एवार्थविभूतय । तथापि वीर्यवती भाषा जायते कर्तृकौशलात् '' गरीब बिचाऱ्या लोकहितवादींनी तळतळून लोकाना सज्ञान करण्याकरता लेख लिहिले परतु त्याचा परिणाम लोकावर झाला नाही उलट विष्णुशास्त्रीनी आपल्या लेखणीनें लोकाच्या अन्त करणात खळबळ उडवून दिली. टिळक आगरकराना जे साधले तें त्याची परंपरा चालविणाराना साधत नाही मोहक व वीर्यवती भाषा ह्यात भेद आहे वीर्यवती भाषेची सध्या पिछेहाट झाल्यासारखी भासत आहे आगरकराना समाज सुधारणा करावयाची होती ती आज झाली आहे. राजकारणात टिळकाचे स्वत चे धोरण होते त्याच्यापुढे लोकमत बनविण्याचे ध्येय होते त्यामुळे त्याच्या भाषेत ओज भरले होते सध्या महाराष्ट्राला धोरण नाही व ध्येयहि नाही ह्या कारणास्तव वीर्यवती भाषेचा आश्रय तुटला. आता प्रेमाच्या क्रीडागणात स्त्रीपुरुष रमत असलेले दिसत आहेत म्हणून त्या विषयाला पोषक अशी घोसदार, मोहक, नटलेली, पल्लेदार भाषा उत्कर्ष पावत आहे. हाहि प्रकार भाषेमध्ये यावयास पाहिजे होता ह्या दृष्टीने ह्या प्रेमाने भाषेवर मोठेच उपकार केले आहेत असें म्हणावे लागते. राजकारण नाही, समाजकारण नाही, तेव्हा प्रेमकारणच आम्हास शिल्लक राहिलें. आता अर्थकारण पुढे येऊ पाहत आहे तेव्हा आणखी निराळाच एक भाषेचा नमुना उत्पन्न होईल ते हि इष्टच आहे आर्थिक सुधारणेच्या नेत्यात अगभूत तेज असेल तर प्रेमकथाचा पूर आपोआपच ओसरू लागेल समाजवादाचा ओनामा हे पुस्तक बदललेल्या मनूची साक्ष देत आहे.

**वाङ्मयाचे प्रकार**

भाषेप्रमाणे वाङ्मयाचे निरनिराळे प्रकार उत्पन्न होत आहेत. लघुकथाचा उदय नुकताच झाला असला तरी वयाच्या मानाने ह्या मुलीत गुण अधिक आहेत. काव्यात निरनिराळी वृत्ते प्रविष्ट झालीं आहेत. वृत्तनाविन्याचे श्रेय छदोरचनाकार माधवराव पटवर्धन व रानफुलेकर्ते विनायकराव सावरकर ह्यांनाच विशेषत.दिलें पाहिजे ह्या शिवाय वाङ्मय क्षेत्रातली संकुचित दृष्टि लोप पावत आहे सर्व घडामोडीवर लेखकाची दृष्टि जात आहे. एकाच वेदीभोवतीं प्रदक्षिणा घालीत बसल्याने वाङ्मय समृद्ध होत नाही ह्या दृष्टीने प्रतापगडचें युद्धकार श्री मोडक ह्याचे अभिनंदन करणें युक्त आहे मराठी वाङ्मय निरनिराळे प्रांत काबीज करीत आहे हें प्रगतीचे द्योतक आहेह्यात संशय नाही. सुलभ वास्तुशास्त्र, वाचनालयशास्त्राचा ओनामा, जप्त झालेले गुन्हेगार, बातमीदार, हीं पुस्तकें व

थालीपीठ, एरंडाचे गुऱ्हाळ ह्या सारखे विनोदी लेख उदाहरणार्थ सांगता येतील. ओगले आणि मिराशी ह्यांच्या " कालिदास " ग्रंथानी टीका विषयक लेखनाला योग्य वळण लागणार आहे. निरनिराळ्या कुळाचे इतिहास लिहिले जात आहेत त्यामुळे हिंदु समाजाच्या नानाविध अंगाच्या इतिहासाची सामग्री संकलित होईल. प्राचीन चरित्रकोश, महाराष्ट्र सांवत्सरिक, भारतीय ज्योतिष-शास्त्राचा इतिहास, अशासारख्या अत्यंत आवश्यक अशा संदर्भ ग्रंथानी शास्त्रा-भ्यासकाची मोठीच सोय करून दिली आहे. बडोदें, कोल्हापूर येथे होणारे व्यायाम व व्यवहारकोश ह्यानी संदर्भग्रंथातील उणीव भरून निघेल. महाभारताची सूची तयार करण्याची अवश्यकता संस्थानिकास पटविल्यास त्यांच्या प्रोत्साहनाने एखादी संस्था तें काम हाती घेऊं शकेल.

**अहिंदूंचें वाङ्मय**

मराठी भाषा बोलणारे हिंदू प्रमाणे अहिंदू हि आहेत. ज्यू, मुसलमान, ख्रिस्ति वगैरे भिन्न धर्मीयानी मराठीत उत्कृष्ट ग्रंथ-रचना केली आहे. आपल्या धर्माचा प्रसार करण्या करता मराठी भाषेत लिहिण्यास प्रवृत्त झालेल्या मूळ व धर्मांतर केलेल्या ख्रिस्ती लोकातून रा. नारायण वामन टिळकासारखा कवि निर्माण झाला हा धर्मांतराने झालेल्या हानीचा वचपा भाषेने काढला ! ख्रिस्ति लोकानी निर्माण केलेले वाङ्मय थोडे थोडके नाही हे रा. उजगरे ह्यांच्या निबंधा वरून स्पष्ट होते.

८० इस्रायल लोकानी २०० पुस्तके मराठीत लिहिली आहेत असा श्री. चितोपंत कर्वे ह्यांचा तर्क आहे. तथापि ख्रिस्ति समाजातील टिळक किंवा मुसल-मानातील मगनभाऊ, शेखमहमद, शहामुनि अशासारखे ग्रंथकार ह्या समाजात झालेले दिसत नाहींत. मुसलमानी मराठी ग्रंथकार दिवसेंदिवस कमी होत आहेत ह्याचा विचार आपण केला पाहिजे.

आम्हापैकी कित्येकानी बंगाली, हिंदी, गुजराथी व कानडी ह्या भाषातहि त्या त्या भाषेंतील वाकबगार लेखकापेक्षाहि अधिक लौकिक संपादन केला आहे ही जरी मराठी वाङ्मयाच्या दृष्टीने हानि असली तरी आमच्या कर्तृत्वाची थोरवीच समजली पाहिजे. आम्ही आज पर्यंत हेटाळलेल्या संत कवींचा भाग्योदय होऊन त्यांच्या काव्याना ॲबट साहेबानी इंग्रजी भाषांतराचा मान मिळवून दिला आहे.

मराठीत ग्रंथवृद्धीला अनेक विघ्ने आहेत त्याचा आता आपण विचार करू

**अन्य भाषा असणारे राजे व मराठी**

प्रथमत राज्यकर्ते परभाषा बोलणारे असले म्हणजे प्रजेच्या भाषेला गौणत्व प्राप्त होत असते हा नियम आहे जेत्याची भाषा जिताच्या भाषेला कशी दडपून टाकते ह्याचे विवेचन 'मराठी भाषेवरील सावट' ह्या निबधात मी केले असल्यामुळे त्याची पुनरुक्ति येथे करीत नाही. राज्यकर्त्यांच्या भाषेला फाजील महत्त्व प्राप्त होते त्या मानाने प्रजेच्या भाषेची पिछेहाट होते गोवे सरकार पोर्तगीज भाषेचे प्रस्थ माजवीत आहे. बिचारी मराठी भाषा सुरीचा घाव घेण्यास पुढे मान करून उभी आहे हा घाव चुकविण्याचे अवसान आम्हा मराठी भाषा बोलणारात नाही ह्या विचाराने लज्जेनें मान खाली घालावी लागते गोवे प्रातातलीच स्थिति निजामी राज्यात आहे मोगलाईची साम्राज्यसत्ता नादत असता जे केले गेले नाही ते आज निजाम साहेब राजरोस रीतीने करीत आहेत. भिन्न नस्कृतीचे राजे आपली संस्कृति आपल्या प्रजेवर तिच्या इच्छेविरुद्ध लादूं लागले म्हणजे तेवढ्या पुरते त्याचे राजेपण सुटून ते सरकशीतले रिंगमास्तर बनतात. अशा राजाच्या संस्कृतीचा हिणकसपणा अशा गोष्टीवरून अजमाविता येतो राजा प्रजेमध्ये मिळून गेला पाहिजे परतु प्रजेची भाषा शिकण्याची अवश्यकताहि परकी राजाना भासू नये हे कशाचें द्योतक आहे ते सागावयास नको. पोर्तुगाल अथवा इग्लंड ह्याच्या राजाना हिदुस्थानातील भाषात बोलता येत नाही ह्याचे आश्चर्य वाटण्याचे कारण नाही कारण त्याच्या निकृष्टातल्या निकृष्ट अधिकाऱ्याला हि प्रजेच्या भाषेत उत्तम बोलता येत नाही आणि त्यानी बोलावे अशी आम्ही अपेक्षाहि करित नाही आता बडोदे, ग्वाल्हेर, इदूर येथील आमच्या मराठी सस्थानिकाकडे पाहा ते आपल्या प्रजेच्या भाषेत तासच्या तास सहज बोलूं शकतात ह्यातच हिदु संस्कृतीचा मोठेपणा आहे कोणावरहि आपण होऊन आक्रमण करणे किंवा कशाचा विध्वस करणे ह्या गोष्टी आमच्या सस्कृतीला अपरिचित आहेत. तथापि आक्रमकाचीं कृत्ये चव्हाट्यावर आणणे व परकी सत्तेखाली असलेल्या मराठी प्रजेची भाषा जगविणे हे आपले कर्तव्य आहे आणि त्यासाठी सघटित प्रयत्न होणे अवश्य आहे एवढे मात्र खरें. गोव्यात मराठीवर होणारे हल्ले परतविण्याकरता श्री प्रियोळकर जीवापाड मेहनत करीत आहेत त्यास आपण पाठिबा दिला पाहिजे

**उसने विचार**

सध्याच्या परिस्थितीत मराठी भाषेची वाढ ज्या प्रकाराने व ज्या मानाने व्हावयाची तशी झाली आहे ह्यात संशय नाही. एका दृष्टीने आढावा घेतला तर राजवाड्याप्रमाणेच

निराशेचे उद्गार निघणे स्वाभाविक आहे शास्त्राचा अद्यापि अरुणोदयहि झाला नाही. शास्त्राची अमावस्येची मध्यरात्र कधी सपेल ह्याची अधुक सुद्धा कल्पना करिता येत नाही भूतकालीन सशोधन मात्र आशाजनक आहे पण डॉ भाडारकराची काटेकोर विवेचन पद्धति अथवा राजवाड्याची कल्पनाची घडाडी ह्याचा प्रत्यय कमी येतो. वर्तमान-परिस्थिते-विषयक वाङमय परिश्रम करण्याची इच्छा नसल्यामुळे निर्माण होत नाही समाजाच्या भावी स्थिती विषयी जे काही लिहिले जाते ते सर्व उसन्या विचाराचे असते. स्वतःच्या बुद्धीचा उपयोग कोणी करीत नाही असल्या वाङ्मयाला कवडीचीहि किमत नसते हिंदुस्थानातील मनुष्य म्हणजे हिंदी हातापायाचा पण युरोपीयन डोक्याचा असा बनला आहे. समाजाची घटना अगदी नवीन पायावर करावयाची असेल तर त्या कामी वर्तमानभूत समजून घेण्याची गरज नाही असे म्हणता येईल परंतु अधिकाराव्यतिरिक्त सस्कृतीने सुटलेला, परपरेने फुटलेला, कारणाची उपाधी घालविलेला असा निराळा समाज बनविणाची हाव धरणे वेडेपणाचे आहे नवीन समाज घटना रशियन सरकार करीत आहे, लोक करीत नाहीत रशियात सुद्धा कामकरी वर्गाला हाताशी धरून हा प्रयोग केला जात आहे ह्यात शहाणपणा आहे, युक्ति आहे. युरोपातील कामकरी वर्ग खराखुरा कामकरी आहे. घर ना दार पाठी बिऱ्हाड अशी त्याची स्थिति आमचा कामकरी वर्ग घरदाज आहे त्याच्या पाठीमागे हजारोवर्षाची परपरा आहे ह्याचा विचार न करिता इतराच्या तोडचे शब्द पोपटा प्रमाणे बोलत राहणे ह्याला कोण शहाणपणा म्हणेल ? पोपट बिचारा नुसते बोलतो त्यात त्याचा अभिमान किंवा आवेश नसतो उलट आमच्या विद्वानात ही दोनहि असतात तुमचे विचार उसने आहेत हे सागणे त्यास मुळीच खपणार नाही विचार हा कार्य कारणाच्या नियमानी विद्ध असतो कारणातून उत्पन्न झालेला जो विचार तोच फलदायी व हितावह होतो येथे विचार म्हणजे आपण उपाय योजना समजतो राष्ट्राच्या पुढे जे वरचेवर प्रश्न निर्णयाकरता येतात ते कसे सोडवावयाचे ह्याचा विचार राष्ट्राला करावा लागतो हे प्रश्न परिस्थितीमुळे निर्माण होत असतात परिस्थिती नेहमी बदलत असते ह्या बदलाला अनेक कारणे असली तरी आर्थिक कारणे बलवत्तर असतात. समाजामध्ये गुणदोष सदैव वास करीत असतात त्याच्या प्रमाणात चलबिचल असते. दोषाचे प्रमाण अधिक झाले म्हणजे गुणाविक्रय होण्याचे उपाय योजावे लागतात. कितीहि चागला उपाय असला तरी तो त्रिकालाबाधित अथवा चिरकालीन टिकणे शक्य नाही कारण आपण चागलें म्हणून करायला जावे तो त्यातूनच कालातराने

वाईटाची उत्पत्ति होते. हा त्रिकालाबाधित सिद्धांत आहे बालविवाह, प्रौढ विवाह, नोविवाह, एकपत्निकता, अनेकपत्निकता, एकपतिसंबंध, अनेकपति संबंध, स्वैराचार, एकसत्ताक राज्यपद्धति, शिष्टसत्ताक राज्यपद्धति, प्रातिनिधिकपद्धति, लोकसत्ताक राज्यपद्धति, अप्रतिबंध सत्ताधारित्व इत्यादि सर्व गोष्टी जगाने अनुभविल्या आहेत व आवश्यक म्हणून वेळोवेळीं पतकरल्या आहेत तेव्हा नवनीतीच्या बागुलबुवाने कोणी हि भेदरून जाणार नाही. जुना आचार सोडून नवा आचार धरा म्हणून सागण्यात येते तेव्हा ह्या नवीन औषधाची जरूरी भासण्याइतका फरक आमच्या प्रकृतीत झाला आहे काय ह्या बद्दल वाद असतो. युरोपमध्ये सर्पदंशावर नवीन औषध शोधून काढले एवढयाच करता आम्हाला सर्पदंश न होताहि ते घेण्याचा आग्रह पढतमूर्ख वैद्य करू लागले तर आम्हाला ते जगवणार की मारणार हे कोणीहि सागू शकेल पुढे ध्येय नसता परकीयानी लिहिलेली पुस्तके वाचण्याचा हा परिणाम आहे. ग्रंथालयाचा आम्ही दुरुपयोग करीत आहो हातास येईल ते पुस्तक वाचावे त्यात काही नवीन आहे, आणि ते मराठीत, असा प्रकार हल्ली चालू आहे. त्यामुळे आमच्या पुष्कळ लिखाणात ' राम ' नसतो मी एखाद्या विषयाचा विचार करीत असेन तर माझी अनुमाने बरोबर आहेत की नाहीत ह्याचा पडताळा पाहण्याकरता मला पुस्तकाची अवश्यकता लागेल. परंतु मला कधी जन्मात विचार करण्याचा प्रसग नाही तर मी पुस्तके का वाचावी ? पण वाचतो आणि तेच माझे विचार म्हणून ग्रहण करतो. आपल्या डोक्यात काहीच नसले म्हणजे त्या रित्या डोक्यात दुसऱ्याचे विचार आपोआपच येऊन बसतात अशा ह्या दुसऱ्याच्या विचाराच्या जोरावर आम्ही समाजात धुमाकूळ माडतो सभोगाशिवाय रासायनिक क्रियेसारख्या कृत्रिम उपायानी संतति निर्माण करणे शक्य आहे असा ज्याना भरंवसा वाटतो त्याना अभिनव समाज घटनेची स्वप्ने पडावी ह्यात यत्किंचितहि आश्चर्य नाही असल्या शक्यतेचा वारा ज्या समाजाच्या कानावरूनहि गेला नाहीं त्या समाजापुढे पाश्चात्याच्या समाजविषयक काल्पनिक कल्पना आदर्श सुद्धा नव्हे तर अविरत् अनुकरणीय म्हणून माडणें म्हणजे निष्प्राण वाङ्मय निर्माण करणें होय विचारहि अस्सल स्वदेशी पाहिजे इतर लोक काय म्हणतात हे अवश्य समजून घ्यावें, परतु अखेरीस मी काय म्हणतो ह्यालाच किमत अधिक असणार आमच्या धर्माचाराना श्रुति स्मृति प्रमाण नसल्या तरी श्रुतिस्मृतिज्ञाचे प्रामाण्य आहे; त्याच प्रमाणे समाजकारणात व दुसऱ्या कोणत्याहि कारणात. कायद्याच्या क्षेत्रातहि कायद्यापेक्षा कायदा जाणणाऱ्याच्या स्वतंत्र अक्कलेचें महत्व अधिक. आपल्याकडे चोरी करणारे

अशिक्षित, दरिद्री, जंगली असे लोक असतात परंतु चोऱ्या जिरवणारे सभावित असतात. शब्दप्रमाणाला चिटकून बसणारा न्यायाधीश चोरीच्या गुन्ह्याकरता कडक शिक्षा देऊन चोरीला मदत करण्याच्या गुन्ह्याला सौम्य शिक्षा देईल ह्याच्या उलट कायद्याच्या ज्ञानाने तल्ख झालेल्या बुद्धीचा न्यायाधीश चोरीचा माल अल्प किमतीत विकत घेऊन चोऱ्या छपवणाऱ्या सभाविताला अत्यंत कडक शासन करील. साराश, स्वतंत्र विचाराची थोरवी अद्यापि आम्ही ओळखलेली दिसत नाही रशियन स्त्रियाना पुरुषसंबधात पूर्ण स्वातंत्र्य मिळाले एवढेच आपण वाचतो. पण त्या स्वातंत्र्याला अनुकूल अशी रशियन परिस्थिति होती इकडे आपले लक्ष जात नाही Humanity Uprooted ग्रंथाचा कर्ता म्हणतो " When I visited the cossack settlement in the summer of 1928 I learned that to this day many youths there follow the old custom of wooing a girl by sleeping with her, usually at the barn at frequent intervals and for a lengthy period, **of course the girl preserves her virginity** " सर्व गोष्टींचा विचार करून स्वत ची उपाय योजना करणारे मला फक्त गांधीच दिसतात पण परगुरु करण्याची चटक लागलेल्याना त्याचे गुरुत्व न मानवणे स्वाभाविक आहे. गुजराथी भाषेला गांधीचा लाभ झाला तसा मराठीला अद्यापि कोणी गांधी मिळाला नाही विचार व भाषा ह्यामध्ये गांधीनी क्रांति केली. त्यांची भाषा ( गुजराथी ) खणखणीत, साधी परंतु हृदयस्पर्शी अशी असते ते लोकांच्या भाषेत बोलतात तथापि, शुद्धता, प्रगल्भता व श्लीलता ह्यांच्या मर्यादेचे अतिक्रमण केव्हाहि त्यांच्याकडून होत नाही. सहाव्या गुजराथी साहित्य परिषदेला गांधी सांगतात "हुं बाणभट्टनी कादंबरी नथी मागतो परंतु तुळसीदासनुं रामायण मागू छू " ह्यात गांधीनी मौल्याचा विचार व्यक्त केला आहे. बदलणारी व स्थिर मौल्यें ह्यातील भेद समाजाने ओळखला पाहिजे आगगाडीत प्रवासात असताना अमंगल परिस्थितीत अन्नसेवन करावे लागले तरी तेवढ्याने नेहमी अमंगलपणें अन्नग्रहण करण्यास हरकत नाही, तोच धर्म, तोच सदाचार असे प्रतिपादल्यास योग्य किमती कोणत्या हे आपणास समजत नाही असेच कबूल केले पाहिजे. आजचे ग्रंथकार भलत्याच घटनेला भलतीच किंमत देतात असे दिसते. ह्यामुळे वाङ्मयाचीच किंमत कमी होते

**ग्रंथ परीक्षण**

गुणा बरोबर दोष हे येतातच. त्यात मोठा दोष म्हणजे अर्थाकरता शब्द आहेत नुसत्या शब्दाना किमत नाही ह्याचा विस्मर शब्दासाठीच कित्येक लिहीत असतात काव्यवाङ्मयात ह्या प्रवृत्तीला उत्तेजन अधिक मिळते. ह्यानतर तर्कशुद्धता आणि तिच्या बरोबर स्पष्टता हे गुण फार थोड्या लेखकात आढळतात प्रश्नाच्या बुडाशी जाऊन विवेचन करणारे लेखक दुर्मिळ ह्या बाबतीत आमच्या पेक्षा इंग्रेजी लेखक श्रेष्ठ होत विषयाची माडणी त्याना चागली करता येते त्याची विषयाची पकड मजबूत असते. आमच्या लिखाणात उथळपणा भासतो. पूर्वीचे पडित आपआपल्या विषयात तरबेज असत शका विचार त्यास त्याच्या पद्धतीने ताबडतोब ते समाधान करू शकत ही तयारी हल्लीच्या विद्वानाची नसते. लेखनात जे आले असेल त्याच्या पर्ल कडे त्याचे त्यानाच ठाऊक नसते ह्याचा परिणाम असा होतो की, कोणत्याहि मोठ्या ग्रथाचे परीक्षण मार्मिक रीतीने होत नाही आम्ही थोडेसे इंग्रजी वाचतो आणि त्या अनुरोधाने मराठींत लिहितो. ह्या तुटपुंजीच्या भाडवलामुळे उपयुक्त टीका आम्हाला कशी करता येणार? ज्ञानप्रकाशाने काव्य-शास्त्र-विनोद हे सदर सुरू करून मराठी भाषेला सहाय्य केले आहे विषय आणि परीक्षण ह्यामध्ये प्रमाण मात्र पाळले जात नाही. ग्रंथकाराने लिहून दिलेले परीक्षण छापणारे संभावित वर्तमान पत्रकार आहेत ह्यात अनीति आहे ही कल्पनाहि त्याना नाही वाचकाची ही फसवणूक जाणून बुजून केली जाते ह्याची त्यास आठवण करून देणे अवश्य आहे प्रतिभेतली परीक्षणे अभ्यासपूर्वक केलेली दिसतात परंतु परीक्षकाच्या एककल्ली विचारामुळे थोडा तोल सुटतो कादबऱ्या, नाटके, लघुकथा, कविता ह्याची परीक्षणे बऱ्याच वरच्या दरजाचीं असतात परंतु इतर ग्रथाविषयी बोलावयाचे तर ग्रथाची योग्यता व त्याचें परीक्षण ह्याचें नेहमी व्यस्त प्रमाण असते

**शुद्धलेखन**

घोसदार, अलंकारिक व परिणामकारक भाषा लेखकाची असते ह्यात सशय नाही. परंतु शुद्धलेखनाकडे अत्यंत दुर्लक्ष केले जात आहे. अशुद्ध लेखनाचा दोष वाढत्या प्रमाणात आहे. ह्याची जबाबदारी विशेषत· विद्याखात्यावर पडते. शाळात श्रुतलेखनाकडे कोणाचें लक्ष नसतें मराठी शिक्षकानाच शुद्ध लिहिता येत नाही. परीक्षकहि ह्या विषयी बेफिकीर असतात. दुकानदाराच्या, म्युनिसपालिटीच्या, लोकलबोर्डाच्या किंवा दुसऱ्या कोणत्याहि जाहि-

रानी अगर पाच्या पाहा आरंभापासून अखेरपर्यंत अशुद्ध लेखनच आढळेल कोणाचेहि लहानमोठ्याचे, स्त्रीपुरुषाचे, शिक्षित अशिक्षिताचे, विद्वान् अविद्वानाचे खासगी पत्र वाचा शुद्धलेखनाचे खून केलेले सापडतील विभक्तीचा प्रत्यय लागला असता किंवा शब्दयोगी अव्ययाच्या पूर्वी उपान्त्य दीर्घ स्वर र्‍हस्व होतो तसेच अन्त्य र्‍हस्व स्वर दीर्घत्व पावतो हा नियम नष्टस्मरण झाल्यामुळे "मजूराने, बुद्धीला, खजीराप्रमाणे" असे शब्द चागल्या लेखकाकडून लिहिले जातात. ' आशिर्वाद व दास्यत्व " हे लिखाण तर विद्वन्मान्य होऊन बसलें आहे अनुस्वारासबंधी तर विधिनिषेध राहिलाच नाही शुद्धलेखनमंडळाने एकमताने शुद्ध लेखनाविषयीचे काही नियम ठरविले केसरी सारख्या वर्तमानपत्राने ते स्वीकारिले, नागपूर विद्यापीठाने ते अमलात आणले, आमच्या कडील हायस्कुलच्या हेडमास्तरानी त्यास बहुमताने समति दिली पण चमत्कार असा की, मुबई विद्यापीठातील एतद्विषयक अधिकाऱ्यानीं अज्ञानमूलक दुराग्रहाने ते झिटकारले ! ह्या समेलनात सर्व ग्रथकारानीं शुद्ध लेखनमडळाच्या शुद्ध लेखनाप्रमाणे आम्ही ग्रथ लिहू असा ठराव करून विद्यापीठातील मराठीच्या तद्ज्ञाना (?) उत्तर द्यावें अशी माझी आग्रहाची विनती आहे शुद्धलेखनावरून मनुष्याच्या शिक्षण विषयक सस्काराचा अदाच करता येतो म्हणून त्या विषयी फार दक्षता बाळगिली पाहिजे खालील वाक्य एका दक्षिणी कंपनीच्या पत्रातील आहे ' आम्ही **पब्लिशर्स** असल्यामुळें काहीं त्याच्या बहुमोल **आयडियेचा** उपयोग झाल्यास कपनी त्याची फार आभारी होईल." तसेंच व्ही बी बापट, एस् एम् जोशी अशी इंग्रजी मराठी नावें लिहिण्याची जी खुळसट पद्धति पडली आहे तिच्यात आमच्या नामाकित विद्वानाना काहीच गैर वाटत नाही, हें आश्चर्य होय अथवा मराठी शरीर आणि इंग्रजी डोके अशा आम्हा विद्वानाचे ते प्रतीक तर नसेलना ? एका प्रमुख वर्तमानपत्रात " आपल्या प्रास्ताविक भाषणात मुख्य पाहुण्याना त्यानी चागली स्पष्ट सूचना दिली असता हि " असे वाक्य होते ह्यात समजण्यास कठीण असे काहीच नाही. तथापि स्पष्ट सूचना ह्याचे त्यानी स्पष्टीकरण Broad hint हे कंसात इंग्रजी शब्द देऊन केले होते इंग्रजीचा हा वरचष्मा अगदी असह्य होत चालला आहे ?

**अनाक्रांत प्रदेश**

काही बाबतींत आपलें पाऊल पुढें पडत असलें तरी अद्यापि अनाक्रांत प्रांत फार आहे हे विसरून चालणार नाही नृत्यकला, संगीत, भारतीय खेळ, देवेतिहास, चालीरीती इत्यादि अनेक विषयाना आपण अद्यापि हात लावला नाही. श्रीमंत बाळासाहेब पंत, रा ब धुरंधर असे धुरंधर चित्रकार

आपल्यांत असूनहि चित्रकलेवर मराठीत ग्रंथ नसावा ही खेदाची गोष्ट होय श्रीमत बाळासाहेब पंत ह्याचे "अजठाची लेणी" हे पुस्तक मराठीत झाल्यामुळे वरील उणीव अंशत. भरून निघाली आहे. त्याचा "आर्याची चित्रकला" व दाभाड्याचा "भारतीय चित्रकला" हे दोन निबंध वाढवून त्याची परिणति मोठ्या ग्रंथात करता येण्यासारखी आहे महाराष्ट्रात अलिखित वाङ्मय विपुल आहे त्याच्याकडेहि आमची दृष्टी अद्यापि वळली नाही कहाण्या, मंत्र, कथा, लावण्या ह्याचा भाषेच्या व इतिहासाच्या दृष्टीने विचार व्हावयास पाहिजे. ह्या बाबतीत त्याचे महत्त्व फार आहे ह्याची जाणीव अजून उत्पन्न झालेली दिसत नाही.

**मराठी विद्यापीठ**

आमच्या इकडील तत्त्वज्ञानाचे पर्यवसान जसे मोक्षात तसे चालू शिक्षण पद्धतीचे पर्यवसान परीक्षेत होते, आणि परीक्षा नोकरी करता दिल्या जातात ह्यामुळे विद्याभिरुची उत्पन्न होत नाही वाचनाची कोणाला हौस नाही व गरज भासत नाही म्हणून मराठी ग्रंथाना गिऱ्हाईक नाहीं. वाचकापेक्षा लेखकच अधिक दिसतात ! ही स्थिती बदलावयाची असल्यास ज्ञानलालसा वाढेल असे शिक्षण पाहिजे. परीक्षाचे बंड मोडल्यास असे शिक्षण देता येईल. संस्थानातून हा प्रयोग करण्यासारखा आहे परीक्षाचा काळ येण्यापूर्वी म्हणजे ब्रिटिश अमदानीच्या आरंभी जे लेखक होऊन गेले त्याच्या सख्येकडे पाहिले तर ज्ञानार्जन व ज्ञानप्रसार ह्याची तळमळ लोकाना लागली होती असे वाटू लागते. ही तळमळ आज दिसत नाही. आम्ही विद्वत्तेचा टेंभा मिरविण्याकरता लिहितो. ज्ञानाचा हव्यास म्हणून लिहित नाही. बडोद्या सारख्या संस्थानात प्रारंभापासून अखेरपर्यंत मराठीतून शिक्षण दिले जाईल असे विद्यापीठ निर्माण केल्यास मराठीभाषावृक्ष मधुरफलाभरणाने शोभायमान होण्यास वेळ लागणार नाही. सध्याच्या विद्यापीठाकडून उत्तम नोकर हि निर्माण होत नाहीत तसे उत्तम विद्वानहि होत नाहीत आहेत ह्याधर्तीवर आणखी विद्यापीठे स्थापन करण्याच्या सूचना करणे म्हणजे विचार दौर्बल्य प्रकट करणे होय.

**सहकार्य**

महाराष्ट्रातील सर्व जाणत्या लेखकात सलोखा असेल तर लेखकाना आप आपल्या विषयात परस्पराकडून सहाय्य मिळत राहील व त्यामुळे लेखनाची किमत हि वाढेल. सलोखा उत्पन्न होण्यास परस्पराच्या गाठी भेटीचे

प्रसंग वारंवार आले पाहिजेत सालोसाल भरणारीं संमेलनें हे कार्य करीत असतात तसेच परगुणाचा पर्वत करण्याची वृत्ति अंगी बाणावी लागते आणि आत्मश्लाघेची खोड सोडावी लागते दर्प हा स्नेहाचा शत्रु आहे थोडा अधिक विनय आपण संपादन केला पाहिजे असे मला वाटतें आपल्या वाचनात व विचारात कित्येक वेळा अशा गोष्टी येऊन जातात की त्याचा आपल्या विषयास फारसा उपयोग नसतो पण तत्संबधी लेखकास त्या महत्त्वाच्या असतात. अशा लेखकास त्या कळविल्याने त्याचें अनायासें कार्य होतें व ज्ञानात भर घालण्याचें पुण्य लाभते म्हणून मी सुचविलेल्या विद्वत्सहकार्याच्या अवश्यकतेचा आपण विचार करावा अशी माझी इच्छा आहे

**मराठी पोथ्यांचें संशोधन**

जुन्या मराठी ग्रंथांचे पुन संशोधन होणे अवश्य आहे. ज्ञानेश्वरीचे दोनदा संशोधन झाले तुकारामाचा अस्सल गाथा प्रसिद्ध झाला रघुनाथ पंडिताच्या काव्याचे मूळ शोधण्याचे प्रयत्न चालू आहेत. अनेक ठिकाणच्या जुन्या पोथ्या मिळवून त्या तपासून लेखकाचा अथवा कवीचा अव्वल ग्रंथ प्रकाशित करण्याचें महत्त्व आपणास पटूं लागलें आहे हें खऱ्या व शुद्ध जिज्ञासेचे नि संशय द्योतक होय. ठिकठिकाणी असलेल्या मराठी पोथ्याची यादी तयार करून ती प्रसिद्ध केली असता संशोधकास ती फार उपयोगी पडेल द्रव्यबळ व मनुष्यबल नसल्यामुळे म सा. परिषदेला असलीं कामें हातीं घेता येत नाहीत हे पाहून खेद होतो

असो, आज आपण येथे मराठीचा अभिमान धरून बोलत आहो हे खरें, पण एकराष्ट्रीयत्वाच्या सक्तीच्या अवश्यकतेपुढे हिंदुस्थानातील कोणतीच भाषा शुद्ध स्वरुपात राहणार नाही सर्वभाषा मिळून निराळीच एक भाषा निर्माण होईल प्राचीन काळीं ग्रीस देशात असाच प्रकार झाला होता ग्रीसची ॲटिक भाषा राहिली नाही. दळणवळणामुळे व्यवहाराची सर्व देशाला सामान्य अशी भाषा उत्पन्न झाली आणि पुढे ती आपोआप साहित्य व तत्त्वज्ञान ह्यावर ग्रंथ लिहिण्याच्या योग्यतेची बनली. हिंदुस्थानातहि असें का होऊं नये ? आणि झालें तर त्यात वावगें ते काय ?

**उपसंहार**

महाराज, येथपर्यंत माझ्या नेहमीच्या जिज्ञासू आणि अभ्यासू मनाला आधुनिक साहित्याविषयीं प्रेमकातरभावानें जें कांहीं वाटले ते स्पष्टपणे माडलें. या विहंगमावलोकनात बरींचशी क्षेत्रे दृष्टिपथातून निसटलीं असण्याचा

संभव आहे. पण अध्यक्षाचे भाषण म्हणजे एकूण एक प्रचलित प्रश्नाचा खरपूस समाचार घेण्याची आयती आलेली संधी असे मी समजत नाही. अध्यक्षाचे भाषण कसें असावे याचे जखडून टाकणारे नियम आजपर्यंत केले गेले नाहीत हे मी एक भाग्यच मानतो तसे असते तर अध्यक्षाला विचारस्वातंत्र्य न राहून तो एकाच चाकोरीतून डोळे मिटून चालणारा ‘ नरपुंगव ’ बनता ? असो. माझ्या विचाराच्या झेपेत, ज्यानीं सर्व वातावरण सुन्न करून सोडले आहे ते समाजवाद आणि नवमतवाद विस्ताराने आलेले नाहीत तरी त्याचे महत्त्व मी ओळखतो आपल्या तरुणात हे वाद रुजत चालेले असले तरी ते परिस्थितिसापेक्ष नाहीत हे विचारार्तीं सहज पटेल, म्हणून त्या वादाना वेळेचे महत्व ओळखून जरा दृष्टीआड केले इतकेच. समाजवादी तरुणाची ध्येयनिष्ठा, त्याची समाजाविषयी तळमळ व कडेलोटीचा स्वार्थत्याग करण्याची वाटेल तेव्हा तयारी हे राष्ट्रोन्नतीला पोषक असे प्रशसनीय गुण नवमतवाद्यात जरी अद्याप दिसत नसले तरी, अन्यायी सनातन समाजावर सूड उगविण्याच्या भावनेची बेहोषता स्वत च्या सुविचारानीच कालातराने नष्ट होऊन तेहि खरे समाजसेवक बनतील यात शका नाही

आपल्या वाङ्मयाचा भावी काल उज्वल आहे असे मी आशावादीपणा ठेवून म्हणतो आजचीच तरुण पिढी आमच्या वेळच्या पिढीपेक्षा ज्ञानाने जास्त भरते, हे आम्हाला प्राजळपणे कबूल करावे लागेल महाराष्ट्रशारदेची अहमहमिकेने सेवा करण्यास विविध साहित्याचा अवलब करून सारा तरुणवर्ग सरसावला आहे देवीची पूजा बाधण्यास भक्तानी आणलेल्या पुष्पाजलीत काही पुष्पे शिळीं, काही दुसऱ्यानी हुगलेली, काहीं गंधहीन तर काही विलायती अशी मजसारख्या एखाद्या पूजाऱ्यास वाटून त्याने तीबद्दल यदाकदाचित नापसती व्यक्त केली तर ती केवळ देवताप्रसाधनाच्या चोखदळपणामुळेच होय असे आपण समजावे महिना शेकडोवारी पैसा घरात आणणाऱ्या आपल्यापेक्षा फारच मोठ्या कर्तबगार मुलाकडे पाहून आनदातिशयाने हृदय उचंबळत असताहि वाचेने बाप त्याच्या काही खोडीबद्दल नाराजी व्यक्त करतोच ना ? त्याप्रमाणें माझ्या भाषणाचे आहे.

शेवटी, मला ह्या साहित्य समेलनाचा अध्यक्ष निवडण्याचे आपण धाडस केले ह्या बदल मी आपले पुन एकदा, मन पूर्वक आभार मानून आम्हा सर्वांच्या बुद्धीला चोदना देण्याविषयी ओजस्वी बुद्धीच्या सवित्याची प्रार्थनाकरून मी आपली रजा घेतो

---

मराठी साहित्य संमेलन, अधिवेशन १९ वें, बडोदें.



अध्यक्ष, विभाग–अध्यक्ष व चिटणीस.

मराठी साहित्य संमेलन, अधिवेशन १९ वें, बडोदें.




अध्यक्ष, स्वागताध्यक्ष, प्रतिनिधि व चिटणीस.




श्री.

# मराठी साहित्य संमेलन

## अधिवेशन १९ वें, बडोदें.

---

सन १९३४.

---

भाषा विभाग.

अध्यक्ष :

## प्रो. पांडुरंग वामन काणे

## यांचें भाषण.

---

सद्गृहस्थहो,

भाषाविभागाचा अध्यक्ष ह्मणून चार शब्द मी बोलत आहे मराठी भाषेचा खोल शास्त्रीय अभ्यास मी केलेला नाही त्याचप्रमाणे मराठी भषेच्या शास्त्रीय व्याकरणासबंधानें एखादा नवीन सिद्धान्त सागण्याचा किंवा शोध लावण्याचा माझा अधिकार नाही किवा माझ्यात सामर्थ्य नाही संस्कृत भाषेतील वाङ्मय व सर्व साधारण भाषाशास्त्रीयाचा अल्प परिचय मला आहे त्याच्या जोरावर मी काहीं बोलणार आहे ते आपण गोड करून घेण्याची कृपा करावी

कै राजवाडे यानी मराठी धातुकोशाची जुळवाजुळव करून तो छापून प्रसिद्ध करण्याच्या अवस्थेपर्यंत आणून ठेविला होता असे प्रसिद्ध झाले आहे व त्या कोशात काय धोरण त्यानीं आखले होते याबद्दलही हकीकत प्रसिद्ध झाली आहे. मला एक गोष्ट प्रथमच सागून टाकली पाहिजे कै राजवाडे याचा कोश प्रसिद्धच होऊं नये, झाल्यास मोठीच आपत्ति ओढवेल असे काही सद्गृहस्थाचें मत आहे व तें त्यानीं जाहीर केले आहे माझे तसे मत नाही माझे स्वत चें मत असें आहे कीं, तो धातु-कोश अवश्य प्रसिद्ध व्हावा कै राजवाडे यानी अनेक वर्षे खपून हजारो उदाहरणें जमवून तो कोश आपल्या पद्धतीने तयार केला आहे त्याची पद्धति चुकीची असेल परंतु जमविलेली साधने फार परिश्रमाने जमविलेली व बहुमोलाची असतील जर त्याची पद्धति किवा अनुमाने चुकीची असतील तर त्याबद्दल ऊहापोह होऊन योग्य दिशा विचारी व विद्वान मराठी वैयाकरण दाखवितील अशा रीतीनें कै राजवाडे याचा धातुकोश अपकारक न होता उपकारकच होईल असें मला वाटतें

मराठीचा संबन्ध संस्कृत भाषेशी किती निकट व दृढ आहे हे सर्वांना माहिती आहेच तेव्हा धातूंच्या बाबतींत संस्कृत वैयाकरणाची काय पद्धति आहे व त्यांचे प्रयत्न कोणत्या स्वरूपाचे आहेत याचे दिग्दर्शन करण्याचे योजिलें आहे, मराठीचा धातुकोश तयार करिताना संस्कृत धातुपाठ विषयीच्या विचाराचा अत्यन्त उपयोग होईल अशी माझी समजूत आहे माझ्या अल्प बुद्धीप्रमाणें मी संस्कृत धातुपाठासंबन्धाने काही विचार प्रकट करीत आहे.

ब्राह्मण ग्रंथापासून वैदिक भाषेच्या खोल अभ्यासाला व व्याकरण विषयाला सुरवात झाली. निघण्टु मध्ये आपल्याला धातूसंबन्धाने बरीच माहिती मिळते. ऋग्वेदात 'भ्राजते भ्राशते भ्राश्यति ज्योतते द्योतते द्रमदित्येकादश ज्वलतिकर्माण' (निघण्टु १ १६) इतके अकराशब्द 'ज्वलति' या अर्थाचे आहेत, १८ 'कान्ति' या अर्थाचे (निघण्टु २ ६) १२२ 'गति' या अर्थाचे (निघण्टु २ १४) इत्यादि माहिती निघण्टूंत दिलेली आहे. यावरून अर्थावरून धातूच्या वर्गीकरणाला सुरवात झाल्याचें स्पष्ट होत आहे. त्याचप्रमाणें 'ज्योतते' व 'द्योतते' असे दोन धातू (हल्लीं उपलब्ध असलेल्या धातुपाठात आहेत त्याप्रमाणे) निघण्टुकारानें एकार्थक मानले होते.

यास्काचार्यांनीं संस्कृतातील धातूसंबन्धाच्या दोन सिद्धान्ताबद्दल महत्वाची माहिती दिली आहे. नाम, आख्यात, उपसर्ग व निपात असे पदाचे चार वर्ग आहेत त्यापैकीं नामें आख्यातापासून उत्पन्न झालीं असे शाकटायन या वैयाकरणाचें मत होतें व नैरुक्ताचें तसेंच मत होतें परंतु सर्व नामे आख्यातापासून झालीं नाहींत असें गार्ग्य या नैरुक्ताचें आणि वैयाकरणापैकीं कांहींचें मतहोतें.[1] उपसर्ग हे आख्यातापासून पृथक् असता अर्थाभिधायक असत नाहीत तर नामें व आख्यातें याच्या काही विशिष्ट अर्थाचे द्योतक असे ते असतात असें शाकटायनाचें मत आहे, उपसर्गांना निरनिराळे अर्थ आहेत असे गार्ग्य याचे मत आहे[2]

पाणिनीनें 'भूवादयो धातव' (१ ३ १) असे सागून धातूंचे दहागण सांगितले व त्याचा म्हणून एक स्वतंत्र धातुपाठ अष्टाध्यायीचे परिशिष्ट म्हणून असला पाहिजे. परंतु हली उपलब्ध असलेला धातुपाठ त्याचा आहे असें मुळीच म्हणता येत नाहीं त्याला अनेक कारणे आहेत तीं विस्तारानें येथें देण्याची आवश्यकता नाहीं हल्लीच्या उपलब्ध धातु पाठात सुमारें १९०० धातु आहेत निरानिराळ्या प्रतींत निरनिराळी संख्या मिळते उदाहरणार्थ, वेंकटेश्वर प्रेसनें छापलेल्या सिद्धान्त कौमुदींत १९६७ आहेत तर म्हैसूरमध्ये छापलेल्या माधवीय धातुवृत्तींत १८९९ धातूंचें धातुपाठात परिगणन केलें आहे या धातुपाठाचे थोडेसें समीक्षण केलें असतां अनेक आश्चर्यजनक गोष्टी दिसतात पाणिनीनें 'स्तम्भु-स्तुम्भु स्कम्भु-

---

१ तत्र नामान्याख्यातजानि-इति शाकटायनो, नैरुक्तसमयश्च। नसर्वाणीति गार्ग्यो वैयाकरणाना चैके। निरुक्त १ १२

२ न निर्बद्धा उपसर्गा अर्थान्निराहुरिति शाकटायनो नामाख्यातयोस्तु कर्मोपसंयोगद्योतका भवन्ति। उच्चावचा पदार्था भवन्तीति गार्ग्य। निरुक्त १ ३०

स्कुम्भु स्कुन्भ्य श्नुश्च "[3] ( ३ १ ८२ ) या सूत्रात जे पहिले चार धातु दिले आहेत ते प्रचलित धातुपाठात नाहींत. पतञ्जलीच्या महाभाष्यात ' कास् प्रत्यया दाममन्त्रे लिहि ' ( पा ३ १ ३ ५ ) या सूत्रावरील ' कास् ग्रहणे चकास उपसंख्यानम् ' या वार्तिकावरील भाष्यात धातूंच्या चुलुम्पादि गणाचा उल्लेख केला आहे[4] वामनाच्या काव्यालंकारसूत्र व वृत्ति यामध्यें मिलि, क्ष्वि, क्षपि इत्यादि लौकिक धातुचा उल्लेख केला आहे व असें ह्मटलें आहे कीं धातुगण हा परिसमाप्त झाला नाहीं तर तो सारखा वाढतच आहे[5] क्षीर स्वामीच्या क्षीरतरङ्गिणीमध्यें स्पष्ट ह्मटलें आहे कीं भु इत्यादि धातूंचे जें परिगणन धातु पाठात केलेलें आहे तें फक्त निदर्शन आहे, बहुतेक इतकेंच धातु प्राय. प्रयोगात आहेत इतकेंच दर्शविण्याचा धातुपाठाचा उद्देश आहे ह्मणून धातुपाठात अंतर्भूत न झालेले स्तम्भु स्तुम्भु इत्यादि सौत्र धातु, चुलम्पादि महाभाष्यकारानें सांगितलेले धातु आणि मिलि क्ष्वि प्रभृति लौकिक धातु याचा धातु ह्मणून निर्देश केला पाहिजे. हे सर्व धातुपाठात नसलेले धातु ज्यात आले आहेत असे श्री भोजाचे श्लोक हि त्यानें उधृत केले आहेत व वामनानें ह्मटलें आहे त्याप्रमाणेंच ' वर्धते हि धातुगण ' असाही त्यानें शेरा मारला आहे[6] लुडि लुठि असे पाठ आहेत ' पिजि वर्णे '

---

३ काहीं ठिकाणीं ' स्तन्भु–स्तुन्भु-स्कन्भु-स्कुन्भु असापाठ आहे

४ ' कास्यनेकाच इति वक्तव्यम् । किंप्रयोजनम् । चुलुम्पाद्यर्थम् । चुलुम्पाचकार दरिद्राचकार । ' महाभाष्य ( कीलहॉर्न प्रत ) व्हॉल्यूम २ ' पान ४४ )

५ सूत्र ' मिलि क्ष्वि–क्षपि प्रभृतीना धातुत्वं धातुगणस्यापरिसमाप्ते । मिलति विक्ष्वते क्षपतीत्यादय प्रयोगा दृश्यन्ते। वर्धते धातुगण इति हि शब्दविद आचक्षते। तेनैतेषा गणपाठेनुमत शिष्टप्रयोगात् । ' वृत्ति ( काव्यलंकारसूत्र ५, २०२ ).

६ यदेतद्भ्वत्यादि धातुपरिगणनं तद्बाहुल्येन निदर्शनं वे ज्ञेयम् । तेनापठिता मिलिक्ष्विप्रभृतयो लौकिका स्तम्भुस्तुन्भ्वादयश्च सौत्राश्चुलुम्पादयश्च वाक्यकारीया धातव उदाहार्या । वर्धते हि धातुगण । तथा च श्रीभोज ।

मिलन्त्याशासु जीमूता विक्ष्वन्ते दिविग्रहा ।
तप क्षपयति प्रावृट् क्षीयन्ते कामिविग्रहा ॥
अत स्तुनीहि मासर्तून् वसन्तो मावधस्मर ।
दूति दृतमृतीयस्त्र जिजापयिषति स्मर ॥
मुमलक्षेपहुङ्कारस्तोभै कलमखण्डिनि ।
कुशाविष्कम्भमुजभ्नत् निष्कुभ्नातीव ते स्मर ॥
नीपानान्दोलयन्नेष प्रेङ्खोलयति मे मन ।
पवनो वीजयन्नाशा ममाशामुच्चुलुम्पति ॥

बद्दल ' पृजि वर्णे ' असा कित्येकाचा पाठ आहे काहीं धातु एकाच अर्थाचे असून व त्याच्यात वर्णसादृश्य असून ते भिन्न मानिले आहेत ते भिन्न मानण्याचे कारण समजत नाही वास्तविक ' रुटिलुटिस्तेये ' हे दोन धातु नसून एक मानण्यास हरकत नाही र चा ल सस्कृतात च पुष्कळ ठिकाणी आहे (अर अलं, रघु लघु) व संस्कृतातून प्राकृतात तर पुष्कळच ठिकाणी झालेला आहे ' वज व्रज ' गतौ असे दोन भिन्न धातु धातुपाठात आहेत, मूळचा ' व्रज ' असून कालान्तरानें 'व्रज' मधील र् गळून वज शिल्लक राहिला व त्याचेंच ' वचणें ' असें मराठीत रूप झालें असे मानण्याला हरकत दिसत नाही अशा प्रकारानें एकार्थक व बहुताशी समानवर्ण असणाऱ्या धातूंच्या अनेक जोड्या आहेत व धातु पाठात ते सर्व भिन्न धरिले आहेत उदाहरणार्थ, कुर्द खुर्द गुर्द गुद क्रीडायामेव, ध्रेक्र ध्रेक्र शब्दोत्साहयो , राघृ लाघु द्राघृ सामर्थ्ये, कुच्च कुञ्च कौटिल्याल्पभिावयो , लछ लाछि लक्षणे, रप लप व्यक्ताया वाचि, धिणि घुणि घृणि ग्रहणे, चमु छमु जमु जिमु झमु अदने, तुप तुम्प त्रुप त्रुम्प तुफ तुम्फ त्रुफ त्रुम्फ हिंसार्था ,वुड व्रुड संवरणे, स्कर स्कुर स्कल स्कुल चलने इत्यादि

धातु पाठातील धातूच्या अर्था संबंधाने हि मतभेद आहेत, उदाहरणार्थ, ' लड विलासे ' व ' लल ईप्सायाम् ' असे लड व लल याचे भिन्न अर्थ दिले आहेत तर काहीनी ' लड विलासे लल इत्येके ' असें म्हणून ' लड किंवा लल ' असा एकच धातु मानिला आहे अदादिगणातील पिजिवर्णे या धातुबद्दल फारच मतभेद आहे ( पिजिवर्णे संपर्चने इत्येक उभयत्रेत्यन्ये अवयवे इत्येके अव्यक्तेशब्दे इतीतरे ) अनेक धातूंचे दोन दोन अर्थ आहेत.

तीन किंवा त्याहून जास्त ज्याचे अर्थ दिले आहेत असे सुमारे चाळीस धातु आहेत त्याची यादी खाली दिली आहे.

| | |
|---|---|
| नाथृ | याच्ञोपतापैश्वर्याशिःषु |
| मदि | स्तुतिमोदमदस्वप्न गतिषु |
| मचि | धारणोच्छ्रायपूजनेषु ( आणि दीप्तौ ) |
| ऋज | गतिस्थानार्जनोर्जनेषु ( आणि उपार्जने ) |
| शट | रुजाविशरणगत्यवसादनेषु |
| मठ | मदनिवासयो ( आणि गतौ ) |
| पैणृ | गतिप्रेरणश्लेषणेषु |
| कनी | दीप्तिकान्तिगतिषु |

| | |
|---|---|
| अम | गतौ शब्दे संभक्तौ |
| दय | दानगतिरक्षणहिंसादानेषु |
| भल्ल | परिभाषणहिंसादानेषु ( किवा हिंसादनेषु ) |
| अल | भूषणपर्याप्तिवारणेषु |
| अव | रक्षणगतिकान्तिप्रीतितृप्त्यवगमप्रवेशश्रवणसामर्थ्ययाचन क्रियेच्छादीप्त्यवाप्तिआलिङ्गनहिसादानभाववृद्धिषु । |
| धिक्ष | संदीपनक्लेशनजीवनेषु |
| भिक्ष | भिक्षायामलाभे लाभे च |
| दीक्ष | मौञ्ज्येज्योपनयननियमव्रतादेशेषु |
| बल्ह (वल्ह) | परिभाषणहिसादानेषु |
| ज्ञा | मारणतोषणनिशामनेषु |
| षद्ऌ | विशरणगत्यवसादनेषु |
| कुच | संपर्चनकौटिल्यप्रतिष्टम्भाविलेखनेषु |
| वेणृ (वेनृ) | गतिज्ञानचिन्तानिशामनवादित्रग्रहणेषु |
| यज | देवपूजासंगतिकरणदानेषु |
| अस (अष) | गतिदीप्त्यादानेषु |
| पिजि (पृजि) | वर्णे संपर्चने अवयवे अव्यक्ते शब्देच |
| हु | दाने आदाने अदने प्रीणनेपि |
| दिवु | क्रीडाविजिगीषाव्यवहारद्युतिस्तुतिमोदमदस्वप्नकान्तिगतिषु |
| ऋछ | गतीन्द्रियप्रलयमूर्तिभावेषु |
| रिफ (रिह) | कथनयुद्धनिन्दाहिसादानेषु |
| हुण | हिसागतिकौटिल्येषु |
| अञ्जू | व्यक्तिम्रक्षण कान्तिगतिषु |
| प्रुषप्लुष | स्नेहनसेचनपूरणेषु |
| पिञ्जि (पिज ल्रजि) | हिसादाननिकेतनेषु |
| ज्ञप | ज्ञाने ज्ञापने मारणतोषणनिशानेषु |
| विद | चेतनाख्यानविवासेषु |
| वस | स्नेहच्छेदापहरणेषु |

ह्या वरील यादीवरून स्पष्ट दिसतें कीं भिन्न भिन्न अर्थ असले तरी धातु एकच अर्से मानण्याला पाणिनिपतञ्जलिसारखे मुनि कबूल होते. पतञ्जलीने म्हटलें आहे कीं धातूंचे अनेक अर्थ नसतात असे नाही. वप हा धातु प्रकिरण व छेदन या दोन्ही अर्थी आढळतो, त्याचप्रमाणें ईड हा धातु स्तुति चोदना याच्चा व प्रेरण या अर्थी उपयोगात आणतात, कृ हा धातु जे पूर्वी अस्तित्वात नव्हतें ते अस्तित्वात आणणें या अर्थी आहे तसा निर्मलीकरण ह्या अर्थानेंही येतो.[७] या सर्व ठिकाणी अर्थ एकमेकापासून भिन्न असल्यामुळें धातु भिन्न आहेत असें ह्मणता आलें असतें परंतु प्राचीन वैयाकरणानी तसें ह्मटलें नाहीं

धातूंचे जे अर्थ धातुपाठात दिले आहेत ते फक्त निदर्शनार्थ आहेत असें सौनागाचें मत होतें व त्याची ह्मणून एक कारिका क्षीरस्वामीनें आपल्या तरंगिणीत दिली आहे[८] कीं धातु हे क्रियावाचि आहेत हें सांगण्यासाठीं त्याचा एक एक अर्थ निर्देश केला आहे पण लोकात त्याचा प्रयोग केला जातो त्यावरून त्याच्या अर्थाचे अनुमान करावें कारण धातूंना अनेक अर्थ असतात हे सौनाग पतञ्जलीच्याहि पूर्वी होते महाभाष्यात अनेक ठिकाणीं ‘ सौनागा पठन्ति ’ असे उल्लेख आले आहेत

भुवादि नऊगणातील धातूंची णिजन्त रूपेहि मूळ धातूच्या अर्थानेच होतात आणि चुरादिगणाचा जो पाठ केला आहे तो केवळ निदर्शनार्थ आहे असे कांहा वैयाकरणाचें मत होतें व त्याचीं उदाहरणें ‘ रामो राज्यमकारयत् ’ इत्यादि त्यानीं दिलीं आहेत.

---

७ ‘ भूवादयो धातव ’ या सूत्रावरील ‘ क्रिया विषेशक उपसर्ग ’ या वार्तिकावरील महाभाष्य ( कीलहोर्न प्रत व्हाल्यूम १ पान २५६ ) ‘ न चेदं नास्ति बह्वर्था अपि धातवो भवन्तीति । तद्यथा । वपि· प्रकिरणे दृष्टश्छेदने चापि वर्तते केश श्मश्रु वपतीति । ईडिः स्तुति चोदना याच्चासु दृष्ट प्रेरणे चापि वर्तते । करोतिरभूतप्रादुर्भावे दृष्टो निर्मलीकरणे चापि वर्तते । पृष्ठं कुरु पादौ कुरु । उन्मृदानेपि गम्यते ।

८ धातूनामर्थनिर्देशोयं निदर्शनार्थमिति सौनागा· । यदाहुः ।

क्रियावाचित्वमाख्यातुमेकैकोर्थो निदर्शित· ।
प्रयोगतोनुमन्तव्या अनेकार्था हि धातव· ॥

क्षीरतरङ्गिणी पान १९९

सकर्मक धातूचा सुद्धा प्रयोग अर्थान्तराने किंवा अन्य कारणानी अकर्मक करिता येतो उदाहरणार्थ ' भार वहति ' ह्मणजे भार ( खाद्यावर वगैरे ) वाहतो, पण ' नदी वहति ' ह्मणजे नदीचे पाणी वहात आहे [९]

धातूंच्या पाठाबद्दल व अर्थाबद्दल असलेला घोंटाळा पाहून शेवटी क्षीरस्वामीनें चुरादिगणाच्या व्याख्यानाचे प्रारंभी उद्गार काढिले आहेत ते लक्षात ठेवण्यासारखे आहेत ' याप्रमाणें नऊ गणाचें व्याख्यान कुशकाशावलम्बन करून मी कसें तरी केले, आता चुरादि गणाला आरंभ होतो मात्र या गणाचे बाबतीत मोठमोठ्या महारथींनींही हात टेकले आहेत. पाठ व अर्थ याबद्दल मूळ परंपरा नष्ट झाल्यामुळे व मोठमोठ्यांची सुद्धा बुद्धि गुग झाल्यामुळे धातुपाठातील काय सोडावे व काय घ्यावे हे आह्माला समजत नाहीं[१०], वरील विवेचनावरून खाली दिलेले सिद्धान्त माडता येतात

१ संस्कृत वाङ्मय इतके अफाट असूनही व संस्कृताचे व्याकरण पाणिनीने तयार केले तसे कोणत्याहि भाषेंत आजपर्यंत झाले नाही व पुढें होईल की नाही याची शंका आहे तरी धातु सुमारें दोन हजारच आहत

२ धातूंची संख्या फार प्राचीन काळापासून कमीजास्त होत आहे तथापि एकंदर संख्येत फार मोठा फरक पडलेला नाही

३ धातु पाठात जे धातु दिलेले आहेत त्यातील बरेच एकाच धातूची भिन्न भिन्न रूपे उच्चारभेदामुळे झालेली असण्याचा संभव आहे

४ एकाच धातूचे अनेक अर्थ असूं शकतात व त्या अनेक अर्थांत लाक्षणिक-रीत्याही संबंध नसतो हें पतञ्जलीसारख्या महावैयाकरणाना संमत आहे.

मराठीच्या वाङ्मयाचा विस्तार संस्कृत वाङ्मयाशी तुलना करता अत्यन्त अल्प आहे तेव्हा संस्कृत भाषेला जितक्या धातूंची गरज लागली त्याहून कमी धातु मराठी भाषेच्या संसाराला पुरण्यासारखे आहेत संस्कृतात सुद्धा जरी धातुपाठात

---

९ धातोरर्थान्तरे वृत्ते धात्वर्थेनोपसंग्रहात ।
कर्मणोऽविवक्षात. कर्मिणोऽकर्मिका क्रिया ॥ वाक्य पदीय

१० व्याख्यातेयं नवगणी कुशकाशावलम्बनात् । चुरादिरधुनारब्धो यत्र भग्ना महारथा ॥ पाठेऽर्थे चागमभ्रंशान्महतामपि मोहत । न विद्य किं नु जहिम किंवात्राददे वयम् ॥

क्षीरतरङ्गिणी पान १७०

सुमारें दोन हजार धातु असले तरी साक्षात वाङ्मयात ज्याचा उपयोग उपलब्ध आहे असे फारतर हजारच धातु असतील यापेक्षा जास्त मराठी भाषेंत आहेत असे मानण्याला इतर भाषाच्या तुलनेने विचार करिता कारण नाहीं तथापि ह्या प्रश्नाचा विचार इतर भाषाच्या तुलनेनेंच केवळ न करिता मराठीत उपलब्ध असलेल्या वाङ्मयाचे आलोडन व संशोधन करून व नुसता अर्थ थोडाफार भिन्न झाला कीं लागलाच धातु भिन्न मानावयाचा की काय ह्या तत्वाच्या प्रश्नाबद्दल एकमत करून मराठीचा धातुकोश तयार होऊन परिषदेसारख्या अधिकारी संस्थेकडून छापला जाईल अशी आशा प्रदर्शित करितो

महाराष्ट्र साहित्यसंमेलन

बडोदें येथें भरलेलें १९ वें अधिवेशन

अध्यक्षीय भाषण

# शास्त्रीय विभाग



# " मराठी शास्त्रीय वाङ्मय "

प्रोफेसर गोपाळ रामचंद्र परांजपे,

M. Sc, A I I. S, I. E. S.

विज्ञानाचे अध्यापक व 'सृष्टिज्ञान'चे सहसंपादक

रॉयल इन्स्टिटयूट ऑफ सायन्स, मुंबई



ता. २६ डिसेंबर १९३५.

# विषयानुक्रमणिका.

पृष्ठें

# मराठी शास्त्रीय वाङ्मय*



**अध्यक्षमहाराज व मित्रजन,**

साहित्यसमेलनात यंदाच्याच अधिवेशनापासून निरनिराळ्या विषयाचे विभाग केल्यानें अनेक विषयाची चर्चा व्यवस्थित रीतीनें पार पडेल हा हेतु बाळगून जो एक नवीन प्रघात पाडण्यात आला आहे, तो पुष्कळ दृष्टीनें उपयुक्त असाच आहे यात शंका नाहीं निदान त्यामुळें मला तरी एकाएकीं बढती मिळाल्यासारखे होऊन पुष्कळ विद्वान् व निःसीम भाषासेवकाच्या समागमाचा सहजच लाभ मिळाला मी वाङ्मयसेवकातील माझी पायरी ओळखून आहे व माझ्या मतें तरी मी ती ओलांडली नाही, किंवा तशी हावही बाळगली नाही

मी काही कवि नाही, लघुकथालेखक नाही किंवा आतापर्यंत जे रसिक व विद्वान् साहित्यभक्त या संयुक्तसंमेलनाच्या अध्यक्षस्थानी शोभून गेले, त्याच्या तोलाचा मराठी भाषेचा तज्ज्ञही नाही, परंतु एकंदर साहित्याची विभागणी केल्यानंतर प्रत्येक विभागातील कार्यक्रमाला स्वतंत्र अध्यक्षाची नेमणूक करणें साधारणपणें अपरिहार्य झालें व त्यामुळेंच मला आज हे गौरवस्थान मिळू शकलें. ही वस्तुस्थिति माझ्या नजरेंतून सुटलेली नाही अमुक ज्ञातीतील, अमुक गावचा, मॅट्रिकच्या परीक्षेला बसलेला व वयानें चाळिसाच्या आत असलेला म्हणून जशी एखाद्या होतकरू व हुषार तरुणाची प्रशंसा होते तशीच माझी आज संभावना होत असल्याचा मला भास होत आहे असें म्हटलें तर त्यात बहुधा सत्याचा विपर्यास होणार नाही

माझा पेशा शिक्षकाचा, व नेहेमीच्या परिस्थितीनुरूप बहुतेक शिक्षण परभाषेंतून झालेलें आणि विद्यार्थ्यांना सर्व शिक्षण परभाषेंतून देणें मला क्रमप्राप्त असतें अर्थात् माझा मराठीचा व्यासंग म्हणजे केवळ सवडीनुसार आणि बराचसा स्वतःच्या करमणुकीसाठी असतो. अपवाद म्हणून हौशीने एकादेवेळी लहान लहान श्रोतृसमुदायासमोर आपल्या आवडत्या विषयावर मातृभाषेंतून सोपीशी भाषणें केली. त्याचप्रमाणें वर्तमानपत्रांतून व इतर नियतकालिकांतून कधीं कधीं चार दोन शास्त्रीय विषय बालवाचकांना मनोरंजक पद्धतीनें समजावून सांगण्याचा प्रयत्न केला. माझ्या मराठीच्या व्यासंगाची मर्यादा येथेंच संपली हें आपल्याला स्पष्ट माहीत असून आपण माझा गौरव करीत आहा त्यासाठी मीं आपले मनःपूर्वक आभार मानतों. आलेल्या

---

* बडोदें येथें भरलेल्या १९ व्या महाराष्ट्र साहित्यसंमेलनातील शास्त्रीय विभागाचे अध्यक्ष प्रो. गोपाळ रामचंद्र परांजपे यांचें भाषण.

परिस्थितीला, मग ती अपेक्षित असो वा अनपेक्षित असो, न डगमगता तोंड द्यावयाचें हा शास्त्रीय ज्ञानमार्गावरचा, विशेषतः प्रायोगिक विज्ञानांतील प्रसिद्ध नियम आहे. आणि केवळ त्या नियमाचा भंग होऊं नये म्हणून मी आपली आज्ञा पाळण्यास तयार झालों समतीसाठी मला जर अगोदर विचारलें असतें तर सहज दुसरी दहा नावें सुचवून मी केव्हाच मोकळा झालों असतों.

अध्यक्षस्थानी शोभणाऱ्या विद्वानाच्या अंगी बहुश्रुतपणा, भरपूर भाषाभ्यासग, उत्कृष्ट लेखनचातुर्य, अवघड विषय सुलभ करून सांगण्याची तत्परता व शैली, साहित्यांतील विविध शाखातील पारंगतता, मानसशास्त्रातील दीर्घ अनुभव, हे व असे कित्येक गुण अवश्य असावे लागतात. वयानें, ज्ञानानें आणि तपश्चर्येनें लायक असे धुरीण आपणाला मिळूं शकले असते. तेव्हा हा विलक्षण मान मला अनपेक्षितपणें कसा मिळाला या प्रश्नाचें उत्तर शोधूं लागलों तेव्हा कित्येक निरनिराळ्या कल्पना मनात आल्या. त्यातील एकच विशेष शक्य वाटली ती अशीः—

मराठी वाचकाना सृष्टिज्ञानाची ओळख व्हावी म्हणून अनेक सहाय्यकारी मित्रा-समवेत ज्या भाषादेवीची आमच्या हातून सेवा होत आहे तीच आपलेही आराध्यदैवत आहे. स्वतःच्या घरचें मंगलकार्य चालविण्याचे वेळी आपल्याच शाखेंतील परतु कोणा-तरी परग्रामस्थ सहाध्यायाला उपाध्येपणाचा मान देण्यात येतो, त्याचप्रमाणें आपण आज मला पुढें केलें असावें.

ही कल्पना खरी असली तर मला सभाळून घेण्याची जबाबदारी आपल्यावरच पडते व त्यासंबंधी आपलें कर्तव्य बजावण्यात आपण कसूर करणार नाही अशी मला आशा वाटते.

ललित वाङ्मयात भाषा तोलून वापरावी लागते, आणि तसल्या प्रकारच्या विषयात लागणारी भाषा बरीच पूर्णावस्थेत आलेली आहे, त्यामुळें चर्चा करणाराला शब्दप्रयोग व योजना फार सावधगिरीनें करावी लागते. अजून बाल्यावस्थेत असलेल्या आपल्या शास्त्रीय वाङ्मयाला भाषा नसल्याप्रमाणेंच आहे; तेव्हा वरील प्रकारची बंधनें कमी आहेत. स्वतःचे विचार आपल्यापुढें माडावयाचे एवढाच मुख्य हेतु असल्यामुळें माझ्या हातून भाषाविषयक अनेक प्रमाद होतील, किंवा वाङ्मयदृष्ट्या मी कित्येक ठिकाणी अतिक्रमण केल्याचें आपल्या नजरेस येईल, तरी त्याबद्दल आपण मला क्षमा करावी, हीच माझी नम्र विनंति आहे.

## ( २ )

## प्रास्ताविक.

सृष्टि भक्तांची फार चाहती आहे. परंतु आपल्या मराठी भाषेंतून केलेली सृष्टीची उपासना अगदी एककली वाटते. सृष्टीच्या बाह्यांगाचीं अनेकानीं अनेक वेळा उत्कृष्ट

वर्णनें केली आहेत, परंतु सृष्टीचें अंतरंग बाह्यागापेक्षा जास्त उज्ज्वल आणि मनोरंजक असून आपल्याकडील फारच थोड्या लेखकांनी आपली लेखणी अंतरंगवर्णनासाठीं वापरली. 'ज्योतिर्विलास' या नावाच्या विश्ववर्णनात्मक शास्त्रीय ग्रथाच्या तोडीचें दुसरें काव्य अद्यापि निर्माण झालें नाही असें म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाही. मराठी वाङ्मयाची आतापर्यंतची वाढ अगदी एकागी नसली तरी तिच्यात शास्त्रीय विषयांची जेवढी प्रगति व्हावयास पाहिजे होती तेवढी झालेली नाही. काव्य, व्याकरण, कला, चरित्र इत्यादि भिन्न भिन्न शाखात गेल्या शंभर वर्षांत, विशेषतः गेल्या पंचवीस वर्षांत झालेली वाढ पाहता, शास्त्रीय वाङ्मयाची फादी अगदी साफ कोमेजून गेल्याचा भास होतो.

हिंदुस्थानात प्राचीनकाळी विद्वान् शास्त्री पंडित होऊन गेले. विशेषतः भारतीय ज्योतिषानें शास्त्रीय वाङ्मयाच्या इतिहासात आपलें नाव अजरामर करून ठेविलें आहे. पुढें कालमानास व परिस्थितीस अनुसरून शास्त्रीय वाङ्मयप्रगतीस कसकसे अडथळे आले व त्याचा महाराष्ट्रातील शास्त्रीय वाङ्मयावर किती अनिष्ट परिणाम झाला इत्यादि मुद्दे वादग्रस्त नसले तरी त्याचा फार विस्तारानें उहापोह करण्याचें हें स्थान नव्हे. फक्त एवढें नमूद करून ठेवण्यासारखें आहे की शास्त्रीय ज्ञानसंपादनाचा मुख्य मार्ग जें वाङ्मय त्याची आतांपर्यंत फार आबाळ झाली आहे व तीमुळें होत असलेलें नुकसान अत्यंत नेटानें प्रयत्न केल्याशिवाय लवकर भरून येण्यासारखें नाही. आजकालच्या महाराष्ट्रीय आबालवृद्धांचा साहित्यातील या उपयुक्त शाखेबद्दलचा दृष्टिकोणही पार बदलून गेला आहे ही विशेष दुःखाची गोष्ट आहे आपल्या वाङ्मयाचा ऱ्हास होत आहे व आपण जरूर तेवढें नवीन शास्त्रीय वाङ्मय निर्माण करण्यास साहाय्य करीत नाहीं हीं गोष्ट डोळ्यासमोर भेसूरपणें स्पष्ट दिसत असून आपण त्याबद्दल कसलीच खत बाळगीत नाही. क्वचित् प्रसंगीं स्वतत्र किंवा एखाद्या मंडळामार्फत सभा भरतात, वादविवाद होतो, पास केलेले ठराव कोणातरी शिष्टमंडळाकडे किंवा सरकारकडे रवाना होतात कधी निराळ्या उपसमिती तयार होतात. सरकारनें जेवढें लक्ष घालावें अशी आपली अपेक्षा असते तेवढें तें निरनिराळ्या कारणामुळें घालू शकत नाहीं. आमची विश्वविद्यालयें शास्त्रीय प्रगतीच्या बाबतीत पुष्कळाशी आणि मातृभाषेतून शिक्षणक्रम चालूं ठेवण्याच्या बाबतीत बहुतेक सर्वस्वी, उदासीन असतात वादातच कालाचा आणि बुद्धीचा पुष्कळ अपव्यय होतो व काहीं निष्पत्ति न होतां त्यातून पुष्कळदा आणखी एक निराळाच वादग्रस्त मुद्दा उपस्थित होऊन शुद्ध दिशाभूल मात्र होते मातृभाषा ( मराठी ) बोधभाषा असावी किंवा नसावी हा वाद कितीतरी-जुना आहे; आणि खरोखर त्यात वाद घालण्यासारखा काही एक नवीन मुद्दा आता शिल्लक राहिला नाहीं. तरी केवळ तेच तेच खुळे मुद्दे पुन्हा पुन्हा ऐकविण्यात व खोडून काढण्यात वाढत्या पिढीचें भयंकर नुकसान होत आहे. सूर्य-प्रकाश आरोग्यदायक आहे किंवा नाहीं, याबद्दल चर्चा चालूं असताना सूर्यातील

द्रव्याचा एकसारखा क्षय होत आहे, तेव्हा सूर्य संपूर्ण नाश पावल्यावर काय करावें अशा प्रकारच्या सत्य परंतु क्षुद्र वादविवादाचें कोणी स्तोम माजविलें तर तें किती अप्रस्तुत होईल ! शास्त्रीय विषय शिकविण्यात किंवा महाराष्ट्रीय भाषेत शास्त्रीय वाङ्मय तयार करण्यात मराठीचा बोधभाषा म्हणून उपयोग करता येईल किंवा नाही हा प्रश्न उपस्थित करणें म्हणजे सूर्यनाशाबद्दल खंत बाळगून योग्य उपचार न करता मुद्दाम गैरमार्गावर पाऊल टाकण्यासारखें आहे.

## ( ३ )

## शंभर वर्षांतील मराठी शास्त्रीय वाङ्मय.

" मराठी भाषा स्वतंत्र व्यवहारभाषा म्हणून आज सुमारें एक हजार वर्षें भरतखंडाच्या दक्षिणभागात प्रचारात आहे. ज्याची मूलभाषा किंवा प्रकृति संस्कृत भाषा ही होय अशा ज्या अनेक भाषा भरतखंडात पूर्वकालापासून प्रचलित होत्या, त्यातील महाराष्ट्री या नावाच्या प्राकृत भाषेची ही कन्यका होय. हिच्यात अभिजात वाङ्मय निर्माण झालेलें आहे, कारण तसें होण्यास अवश्य लागणाऱ्या अभिधान शक्ति व संविधान शक्ति या दोन्ही मराठीत पुष्कळ प्रमाणात आहेत " भाषेंतील स्वयंभू गुणाचा पुष्कळ वेळा अनुकूल परिस्थितीने विकास होतो, त्याचप्रमाणे प्रतिकूल परिस्थितीत त्याचा लोप होतो मराठी भाषेंतील शास्त्रीय वाङ्मयाचा इतिहास हे एक या नियमाला पुष्टि देण्यासारखे उत्तम उदाहरण आहे

" गेल्या आठनऊशें वर्षांच्या अवधीत महाराष्ट्र देशानें अनेक प्रकारच्या विपन्न व संपन्न परिस्थितीचा अनुभव घेतला असल्यामुळें त्या सर्व परिस्थितीचें चित्र त्याच्या वाङ्मयात रेखाटलेलें दिसतें गेल्या शतकाच्या पूर्वीपर्यंत मराठी वाङ्मयाचा मुख्य भर भक्ति, वैराग्य, तत्त्वज्ञान व पुराणोक्त–कथाश्रित रसमय काव्य यावरच होता. हा त्या कालातील जनतेच्या अभिरुचीचा व परकीय जुलमी सत्तेमुळें हताश झालेल्या जनतेंत धैर्य, धर्म-प्रेम व आत्मार्पणबुद्धि जागृत करण्याच्या आवश्यकतेचा परिणाम होय. भाषेंत संविधान शक्ति आहे की नाही हें परिस्थितीवर अवलंबून राहतें " परिस्थिति अनुकूल असली तर योग्य त्या गोष्टी घडून येऊ शकतात, एवढेंच नव्हे तर प्रतिकूल परिस्थिति असताना सुद्धा इच्छित गोष्टी मनोनिग्रहानें घडवून आणता येतात. अडचणी नेहमीच असतात. सामाजिक, राजकीय, बौद्धिक या ठोकळ आणि आर्थिक, पारिभाषिक व लोकाभिरुचिविषयक किरकोळ अडचणी सदोदित उभ्याच असतात. जरूर वाटल्यास त्याच्याआड उभें राहून स्वतःचा बचाव करता येतो, त्याचप्रमाणें धैर्यानें त्याचा प्रतिकार करता येतो निदान बौद्धिक परिश्रमानें त्याना पुष्कळशा प्रमाणात बाजूला करतां येणें अशक्य नाही. भाषेचें दैन्य, भाषेतील शब्दाचा अपुरेपणा, या अडचणी खऱ्या असल्या तरी त्याना विरोध करण्यासाठी आपण आपली वाङ्मयरूप शक्ति

वाढविली पाहिजे. प्रतिकूल परिस्थितीतसुद्धा ज्या भाषेंत " भारतीय ज्योतिःशास्त्र " व " ज्योतिर्विलास " यासारखे अप्रतिम शास्त्रीय ग्रंथ निर्माण झाले, ती भाषा कसल्याही बिकट परिस्थितीत कोणत्याही शास्त्रीय विषयाचें सुलभ, बालबोध किंवा खास तज्ज्ञासाठी विशिष्ट प्रकारचें विवेचन करण्यास अपुरी पडेल असें मानण्यास पुरेसा आधार दिसत नाही

"परभाषेंतील एकाद्या चमत्कारिक शास्त्रीय शब्दाला मराठीत प्रतिशब्द काय?" या प्रश्नाने अडवू पाहणारा आणि त्यावरून मराठी भाषेची अपूर्णावस्था सिद्ध करणारा आपलें स्वतःचें शास्त्रीय विषयाचें ज्ञान आणि मराठीवरील–मातृभाषेवरील–आपलें प्रभुत्व किती कोतें आहे याचेंच निःसंशय प्रदर्शन करीत असतो, पण त्याची त्याला जाणीवही नसते कोणती भाषा पूर्ण झाली आहे ? इंग्रजी, फ्रेंच, इटालियन यासारख्या नटलेल्या व संपन्न भाषांतसुद्धा कित्येक नवीन कल्पनांना उत्कृष्ट व सर्वमान्य असे पारिभाषिक शब्द अद्यापि मिळालेले नाहीत जर्मन भाषेंतील ' आइगेनवेर्ट ' आणि ' रेस्ट-स्ट्राहलेन ' याचा फेरफार न करता दुसऱ्या युरोपीय भाषांत बिनचोक समावेश करून घेतात

## ( ३ ) अ

### शास्त्रीय ग्रंथ.

मराठी वाङ्मयाच्या इतिहासातून निरनिराळ्या विषयावरील वाङ्मयाची कसकशी वाढ होत गेली त्याचें पृथक्करण करता येते

इ. स १८०५ ते १८३६ पर्यंतच्या कालात फारच थोडी मराठी पुस्तकें प्रसिद्ध झाली ही गोष्ट सकृद्दर्शनी चमत्कारिक वाटण्यासारखी आहे, परंतु त्यावेळची परिस्थिति लक्षात घेता थोडी तरी पुस्तकें निर्माण झाली ह्यातच अभिमान वाटतो. १८१८ ते १८२७ या दहा वर्षाच्या अवधीत फक्त तीनच पुस्तके प्रसिद्ध झाली, आणि तीं इंग्रजी अमदानीतील मराठी वाङ्मयातील पहिली तीन पुस्तकें सरकारी प्रयत्नानींच तयार करवून छापविली होती. दहा वर्षांत प्रसिद्ध झालेली तीन्ही पुस्तकें गणित विषयावर असून कर्नल जर्व्हिस यानीं आपल्या विद्यालयांतील छात्रवर्गाच्या उपयोगासाठीं भाषांतररूपानें लिहिली होती.

पुढील दशकात म्हणजे १८२७ ते १८३६ या सालांत एकदर दहा पुस्तकें मराठीत तयार झालीं. दादोबा पांडुरंगाचें व्याकरण व मोल्स्वर्थकृत इंग्रजी–मराठी कोश हे ग्रंथ वगळले तर बाकीचे सर्व शास्त्रीय विषयावरच होते. डॉक्टर मॅक्लीमन यांचीं वैद्यकावरील दोन पुस्तकें, बाळशास्त्री जांभेकर याची भूमिति, भूगोल, विज्ञान इत्यादि विषयांवरील सहा पुस्तकें आणि हरी केशवजी पाठारे यांचें " सृष्टिशास्त्र " नांवाचें एक पुस्तक हीं त्याच कालात प्रसिद्ध झालीं.

१८३७ पासून १८४७ च्या अवधींत एकंदर तीस पुस्तकें प्रसिद्ध झालीं. त्यांत हरी केशवजी याची ज्योतिष व रसायनशास्त्र या वरील दोन आणि जर्व्हिस यांचें महत्त्वमापन ही शास्त्रिय पुस्तकें आढळतात.

त्याच्या पुढच्या १८४७ ते १८५७ च्या कालात जी एकदर १०२ पुस्तकें झाली त्यांत शास्त्रीय विषयावर फक्त तीनच ग्रंथ होते. परतु स्वतंत्र शास्त्रीय लेखनास याच कालात सुरुवात झाली ही गोष्ट विशेष लक्षात घेण्यासारखी आहे यापूर्वी मुख्य भर भाषातरावर असे.—केरो लक्ष्मण छत्रे याचें सृष्टिशास्त्रावरील पुस्तक भाषातररूप असून कृष्णशास्त्री भाटवडेकर याचें "आगगाड्या" व गोविंद् गगाधर फडके यांचें "यंत्रशास्त्र" ही दोन्ही पुस्तकें स्वतंत्रपणें लिहिलेलीं होती.

यानतरच्या वर्षात ग्रंथप्रकाशनाचें मान पुष्कळ वाढलें १८५७ ते १८६४ पर्यंतच्या आठ वर्षात एकंदर ५५० पुस्तकें निर्माण झाली, व त्यात भाषातररूप असे फक्त चारच ग्रथ होते. कृष्णशास्त्री भाटवडेकर यांचे आर्यवैद्यकासबंधी "माधवनिदान", "त्र्यबकी" व "वैद्यजीवन" हे ग्रथ सस्कृतातून मराठीत भाषातरद्वारा आणलेले असून, कृष्णशास्त्री गोडबोले यानी चेंबरच्या ॲस्ट्रोनोमीचे भाषातर करून ज्योतिष-शास्त्र मराठी वाचकाना उपलब्ध करून दिलें होतें. या काळात एकदर आठनऊ स्वतंत्र ग्रंथ तयार करण्यात आले त्यातील काहीचा प्रामुख्यानें उल्लेख करणें अवश्य आहे.

| | |
|---|---|
| डॉ नारायण दाजी: | रसायनशास्त्र, वैद्यक |
| प्रो दाजी नीलकंठ नगरकर: | शंकुच्छेद |
| डॉ भिकाजी अमृत: | शारीरशास्त्र |
| प्रो. केरोपत छत्रे: | ग्रहसाधनाची कोष्टकें |
| कृष्णशास्त्री भाटवडेकर: | विद्युत |
| हरिचंद् चिंतामण: | प्रकाशलेखन |
| महादेवशास्त्री पुराणिक : | भूवर्णन |
| गोविंद् गंगाधर फडके: | यंत्रशास्त्र. |

तत्कालीन प्रचलित असलेल्या बहुतेक शास्त्रीय विषयावर स्वतत्र ग्रथ तयार झाले यावरून त्यावेळी—पाऊणशें वर्षापूर्वी—मराठी भाषेची उपयुक्तता लोकाना पटली होती ही एक, व मराठीत परिभाषेच्या काल्पनिक अडचणीमुळें ग्रंथनिर्मिति थाबली नाही ही दुसरी, या दोन्ही गोष्टी एकदमच सिद्ध होतात प्रबल इच्छा आणि लेखन-शैली असल्यावर तज्ज्ञाला शास्त्रीय विषयाची मातृभाषेंतून फोड करण्यात आनद वाटावा का कष्ट पडावे ? परंतु जी गोष्ट शभर वर्षापूर्वी सहज होत होती तिच्या शक्या-शक्यतेविषयी आज शुष्क वादविवाद चालू आहे । दुर्दैव दुसरें काय ?

सन १८६४ ते १८९४ या सुमारें तीस वर्षांत मराठी ग्रंथाची फार झपाट्यानें वाढ झाली. एकदर ५००० ग्रथ स्वतंत्र व सुमारें १००० ग्रंथ भाषांतररूप होते. त्यांतच

सुमारें २००० ग्रंथ जीर्णोद्धाररूपानें पुन्हा प्रसिद्ध करण्यांत आले होते. या काळांत केवळ शास्त्रीय विषयावर ३९१ ग्रंथ प्रसिद्ध झाले, परंतु त्यांत स्वतंत्र किंवा भाषांतररूपानें किती पुस्तकें होती याचा अंदाज करता येत नाही. बरींचशी पुस्तकें वैद्यकावरील होती एवढें मात्र निश्चित आहे. वैद्यकात इंग्रजी भाषांतरांची जास्त भर पडली असावी असें वाटण्याचा संभव आहे खरा, परंतु या बाबतीत इंग्रजी व संस्कृत या दोन्ही भाषांकडून मराठी वाङ्मयाच्या अभिवृद्धीस सारखीच मदत झाली वास्तविक पाहिलें तर ब्रिटिश अमदानीतील प्रारंभकाळात मराठी भाषेंतून देशी वैद्यकशास्त्र शिकविण्याचे वर्ग सुरू झाले म्हणून या विषयावरील इंग्रजी ग्रंथाचीं भाषांतरें जन्मास आली, नाहीतर त्यास जग दिसले नसतें. मुळात विद्यार्थ्यांकरिता म्हणून तयार केलेली पुस्तकें सर्वसामान्य लोकांकरिता उपयोगी पडूं लागली. देशीवैद्यक शिकविण्याच्या वर्गात प्रारंभी मराठीतून शिक्षण देण्यांत येत असे, परंतु हा क्रम काही वर्षांनी बंद पडला त्याचा फार अनिष्ट परिणाम झाला व मराठीत शास्त्रीय विषयावर मोठमोठे ग्रंथ निर्माण होण्याचा हा मार्ग बंद पडला आणि त्यानंतर त्यास कोठूनही उत्तेजन मिळेनासें झालें. त्या काळी जेवढ्या इंग्रजी वैद्यक-ग्रंथाची भाषांतरें झाली, त्याच्या दुप्पट भाषांतरें संस्कृतातून झालेली होती शास्त्रीय ग्रंथ–किंवा साधारणपणें कोणचेही ग्रंथ–मातृभाषेंत निर्माण होण्यास, मग ते स्वतंत्र-रूपानें असोत किंवा भाषांतररूपानें असोत, अनुकूल परिस्थितीची फार मदत होते, ही गोष्ट पाऊणशें वर्षांपूर्वीच्या या अनुभवातल्या सत्यकथेवरून अगदी स्वच्छ दिसून येते.

१८६४ ते १८९६ या बत्तीस वर्षांत शास्त्रीय आणि इतर ग्रंथाचें प्रमाण सुमारें १ : १२ असें पडते.

मुंबई ग्रंथसंग्रहालयात एकंदर ११००० पुस्तकें नोंदलेली सापडतात त्यात ३८१ वैद्यक, २०० शास्त्रीय, २७९ शेतकी, हुन्नर, संगीत इत्यादि विषयावर व १४९ गणित ज्योतिष, यावर आहेत. याची बेरीज १००९ इतकी होते या सर्व पुस्तकांचा शास्त्रीय वाङ्मयात समावेश केला तर त्याचें इतर वाङ्मयाशीं १ : ११ असेंच प्रमाण पडतें. पुस्तकनिर्मितीवरून अंदाज केल्यास सध्याची परिस्थिति पूर्वीप्रमाणेच अनुकूल नसावी असें वाटतें, परंतु वस्तुस्थिति मात्र अगदी निराळी आहे सध्याचें यंत्रयुग असून भौतिक सुधारणा फार उच्च अवस्थेला पोहोंचल्या आहेत आणि आपल्या व्यवहारात त्याचा अमर्याद समावेश झालेला आहे. अशा वेळी शास्त्रिय वाङ्मयाची झपाट्यानें वाढ व्हावयास पाहिजे होती, परंतु त्याची उपेक्षा चालू आहे असेंच चारी बाजूला आढळते.

पूर्वीच्या पेक्षा सध्याची परिस्थिति शास्त्रीय वाङ्मयनिर्मितीस सोईची आहे. ब्रिटिश अमदानीतील पहिली दहा वर्षे शास्त्रीय व इतर वाङ्मयाचें प्रमाण ३ : ० होतें. शास्त्रीय वाङ्मय मराठींत उत्पन्न करिता येणें शक्य आहे, या आधुनिक वादग्रस्त

मुद्द्यावर त्या पिढीतील विद्वानाचा अगदीं अपरपार विश्वास होता हेच सिद्ध होतें. पुढें कालानुसार हा विश्वास तरी डळमळला, किंवा परिस्थिति अचानकपणें बदलली, किंवा शास्त्रीय विषयाव्यतिरिक्त वाङ्मयनिर्मिति करण्याकडे विद्वानाची जास्त जास्त प्रवृत्ति होऊ लागली यात संशय नाही. तेव्हापासून आतापर्यंतच्या प्रत्येक दश-कांतलें प्रमाण मिळविता आले नाही, तरी १९१७ ते १९२७ या दहा वर्षांतील एकंदर शास्त्रीय पुस्तकें १४० होती. त्यात वैद्यक ३०, ज्योतिष* २५, प्राणिशास्त्र १२, पदार्थ-विज्ञान १९, यन्त्रशास्त्र ६, शेतकीबागाईत ३०, गृहशास्त्र, व्यापार व इतर किरकोळ कला यावर १८ पुस्तकें निर्माण झाली इतर वाङ्मयाशी याचें प्रमाण फार सूक्ष्म पडतें. खरोखर पाहिलें असता या कालात शास्त्रीय वाङ्मय अवश्य वाढावयास पाहिजे होतें. हा कालच विशेष शास्त्रीय सुधारणाचा होता प्रत्येक उद्योग, धंदा, कला, शास्त्र यात एक-सारखी भर पडत होती. त्यास लागणारी साधनेंही एकसारखी बदलत होती. निरनिराळ्या अपूर्व शास्त्रीय शोधामुळें जगातील सर्व प्रमुख भाषात नवीन नवीन शब्दाचा भरणा होत होता व तद्विषयक वाङ्मय एकसारखें वाढीस लागलें होते. आधुनिक समाज सर्वस्वी या सुधारणावर अवलंबून राहिला असल्यामुळें त्या त्या शाखेंतील परिभाषा व ग्रंथसंग्रह विलक्षण वेगानें वृद्धिंगत होत होता "क्ष" किरण, विमानविद्या, बिनतारी संदेशवाहक, चालतेबोलते चित्रपट, आधुनिक वैद्यक, यासारख्या कित्येक अपूर्व शास्त्रीय सुखसोयी याच काळात सुरू होऊन झपाट्यानें त्याचा आपल्या व्यवहारात अपरिमित उपयोग होत होता पण आपलें शास्त्रीय वाङ्मय पूर्णपणे निष्क्रिय पडून राहिलें होतें ! या दहा वर्षांत एकशें पंधरा शास्त्रीय पुस्तकें म्हणजे महिन्यास जेमतेम एक पुस्तक बाहेर पडत असे

वर दिलेले आकडे अगदी बिनचूक नसले तरी ते वस्तुस्थितीचे चित्र आपल्या-पुढें उभें करण्यास पुरे आहेत बदललेल्या परिस्थितीच्या अनुरोधानें आपण चाललों आहों किंवा तिच्याशी जाणूनबुजून विरोध करीत आहों याचा प्रत्येक शिक्षणप्रेमी प्रागतिकानें विचार करण्यासारखी ही गोष्ट आहे भाषेच्या अपूर्णत्वाला दोष देऊन स्वस्थ बसण्यात आतां हशील नाही. **कोणतीही पूर्णत्वास आलेली भाषा आणि तिच्यांतील केवढाही मोठा ग्रंथसंग्रह वेगानें बदललेल्या परिस्थितींत अपूर्णच ठरेल तिला पूर्ववत् पूर्णत्वास नेण्याची जबाबदारी सर्वस्वी आपली आहे** परिस्थितीला दोष देऊन न बसतां नेटानें ग्रंथलेखन करून तिचें पूर्णत्व शाबीत करणें हेंच आपल्यातील सुशिक्षितांचें आद्य कर्तव्य आहे.

---

* त्यात फलज्योतिष, हस्तसामुद्रिक, मुहूर्त, कुंडली वगैरेवर जास्त भरणा आहे. त्याना आधुनिक शास्त्रविभागणींत शास्त्राचा दर्जा देण्यांत येत नसल्यामुळें, तद्विषयक पुस्तकें या गणतींत धरली नाहींत.

## ( ३ ) ब

## शास्त्रीय नियतकालिकें.

आतापर्यंत फक्त शास्त्रीय ग्रंथनिर्मितीबद्दल चर्चा केली. नुसत्या ग्रंथनिर्मितीनें वाङ्मयाची सर्वांगीण सिद्धता होत नाही, हा जो नियम इतर विषयाना लागू आहे त्याला शास्त्रीय विषय अपवाद नाहीत शास्त्रातली मूलतत्त्वें पुष्कळाशी अबाधित राहत असल्यामुळे व शास्त्रीय प्रमाणग्रंथ मौल्यवान असल्यामुळें ते वरचेवर प्रसिद्ध होत नाहीत, या दोन्ही गोष्टी खऱ्या असल्या तरी शास्त्रीय विषय निरनिराळ्या प्रकारानी लिहिणें अवश्य असतें. एकाच विषयावरील कित्येक ग्रंथ प्रसिद्ध होण्याचे जें कारण इतर विषयाना असतें तेंच शास्त्रीय विषयाना लागू पडते. काही पुस्तकें क्रमिक पद्धतीची असून फक्त शालोपयोगी असू शकतात काहीत शुद्ध शास्त्रीय विषयाची बालबोध व सुलभ भाषेंत चर्चा केलेली असते काही ग्रंथ फक्त तज्ज्ञासाठीच लिहिलेले असतात. लेखकाची भाषा, विषय समजावून सागण्याची शैली, वाचकाची ज्ञानमर्यादा, व तात्कालिक सामाजिक परिस्थिति विचारात घेता एकाच विषयावरील ग्रंथलेखन कितीतरी निरनिराळ्या प्रकारानी करता येण्यासारखें असतें

ग्रंथाना जें कार्य करता येणे शक्य होत नाही तेंच नियतकालिकामार्फत सहजपणे घडवून आणता येतें यात एकाच अंकात विविध विषयावर लेख प्रसिद्ध करता येत असून त्याची फोडही निरनिराळ्या वाचकाच्या ग्राहकबुद्धीस अनुसरून करता येणें शक्य असतें जागतिक शास्त्रीय प्रगतीतील कित्येक नवीन नवीन विचारसरणीचा व व्यावहारिक योजनाचा त्यात उल्लेख करता येऊन वेळेनुसार त्याचें स्पष्टीकरणही देता येतें त्यामुळें वाचकाची शास्त्रीय विषयाबद्दलची जागृत झालेली आवड पुष्कळ प्रमाणात तृप्त करता येते नियतकालिकाचें हें विशेष कार्य संपूर्ण ग्रंथांचे मार्फत होण्यासारखें नाही मराठी भाषेंतील नियतकालिकाचा गेल्या शंभर वर्षातील इतिहास मननीय आहे. त्यावरून आपली शास्त्रीय विषयक वाङ्मयाबद्दलची अनास्था दिसून येते.

अगदी प्रारंभकाली म्हणजे शंभर वर्षापूर्वी मराठी विद्वान् व भाषासेवक शास्त्रीय विषयातील ज्ञानप्रसाराचें कार्य उत्साहानें बजावीत होते काव्य, संगीत, कला, इत्यादिवर त्या वेळचे वाङ्मयाभिमानी परिस्थितीनुरूप शुद्ध प्रेम करीत होते तरी त्यांनी शास्त्रीय विषयाची उपेक्षा केली नाही

इसवी सन १८०८ ते १८५७ सालापर्यंत जी एकदर तेरा मासिकें सुरू झाली त्यांत तीन केवळ शास्त्रीय विषयांस वाहिलेली होती त्यापैकी "ज्ञानप्रसारक" नांवाचें एक मासिक एल्फिन्स्टन कालेजांतील कांही महाराष्ट्री उत्साही विद्वानांनी चालविलेलें होतें. हें मासिक १७ वष चालल्यावर १८६७ सालीं रामचंद्र भिकाजी गुंजीकर यांनीं त्याचें " विविधज्ञानविस्तारांत " रूपांतर केलें. त्यात वासुदेव बापू वगैरे तज्ज्ञ रसा-

यनशास्त्रविषयक माहिती सुंदर मराठीत देत असत. दुसरें " दिग्दर्शन " नांवाचें मासिक बाळशास्त्री जाभेकर यानी चालविलें होतें.

प्रारंभीच्या पन्नास वर्षांतील शास्त्रीय व इतर मासिकाचे १ : ३ असलेलें प्रमाण १८५७–१८८५ मध्यें १ : ४ वर घसरलें. या कालावधीत शास्त्रीय विषयावर १० मासिकें निरनिराळ्या वेळी चालू होती ही सर्व मासिकें जरी सर्वस्वी शास्त्रीय विषयांस वाहिलेली नसली तरी त्यात त्या विषयाना पुष्कळ जागा मिळत असे.

१८८६ ते १९१७ या कालावधीत ८ शास्त्रीय व ३८ इतर मासिकें वेळोवेळी चालू असल्याचें आढळतें त्याचें प्रमाण सुमारें १ : ५ इतके पडतें.

१९१७ ते १९२४ या कालावधीत फक्त नऊ शास्त्रीय मासिकें सुरू झाली. त्याचें त्याच कालातील इतर विषयावरील मासिकांशी १:६ येवढें प्रमाण पडतें. "ज्योतिर्भूषण" व " व्यापार ज्योतिष" याचा शास्त्रीय सदरात समावेश केला आहे, परंतु ती गाळली म्हणजे प्रमाण आहे त्याहीपेक्षा कमी पडेल.

या कालातील मासिकाचा इतिहास फार चमत्कारिक आहे. नऊ शास्त्रीय मासिकापैकीं फक एकदोन टिकाव धरून राहिली, आणि इतर विषयातील ५२ मासिकापैकीं दोन तीनच जीव धरून राहिली यावरून टिकाऊपणात शास्त्रीय मासिकाचा नंबर वर लागतो, आणि ती इतराप्रमाणें अकाली मृत्युमुखी पडत नाहीत असें अनुमान निघतें.

अगदी अलीकडच्या दहा वर्षांत म्हणजे १९२४ ते १९३४ या कालात मराठी वाङ्मयाचा बराच विस्तार झाला आहे असें आपण मानतों. या कालात एकंदर सहा शास्त्रीय मासिकें जन्मास अली. त्यातील फक्त दोनच अद्यापि अस्तित्वात आहेत. बाकीची नामशेष झाली. "**सृष्टिज्ञान**"* १९२८ मध्यें सुरू होऊन शास्त्रीय वाङ्मयवृद्धीला तें हातभार लावीत आहे शास्त्रीय विषयाव्यतिरिक्त ४८ मासिकें निघाली आणि त्यातील निदान २८ लवकरच नद पडल्याचें नमूद आहे.

सामाजिक व औद्योगिक परिस्थितास अनुसरून शिक्षणाची व तदनुषंगिक वाङ्मयाची वाढ व्यवस्थितपणें व हौसेनें झाली असती तर शास्त्रीय वाङ्मयाचें इतर वाङमयाशी असलेले प्रमाण इतक्या वेगानें खाली घसरलें नसतें. लेखक व वाचक यांच्या परस्परसंबंधाचा योग्य विचार करणें अवश्य असतें, नाहीतर कित्येक प्रसंगी दोघाचीही दिशाभूल होण्याचा संभव असतो वाङ्मय हेतुपुरःस्सर निर्माण करावयाचें असतें. लेख वाचले जाऊन वाचकाला त्यात आनंद वाटावा व त्याचे बौद्धिक मनोरंजन व्हावें हा लेखकाचा मुख्य उद्देश असला पाहिजे अशाप्रकारें अत्यत निःस्वार्थीपणानें लिहिलेलें वाङ्मय फारच थोडे, परतु तेंहि जेव्हा उत्सुकतेनें वाचलें जातें तेव्हाच त्याच्या उपयुक्ततेची साक्ष पटते. **लेखकानें वाचकाकरितां लिहावयाचें यांत जितकें सत्य आहे, तितकेंच सत्य वाचकानें लेखकाकडून आपणांस**

---

* १८८० साली एक " सृष्टिज्ञान " नावाचें मासिक चालू होतें.

**इष्ट असेंच वाङ्मय निर्माण करून घेतलें पाहिजे यांत आहे.** वेळोवेळीं कित्येक ग्रंथ प्रसिद्ध होतात, पण ते वाचले जातात किंवा नाहीं याची साक्ष पटविता येत नाही. त्याचप्रमाणें कित्येक प्रसिद्ध झालेली पुस्तकें व मासिकें पुष्कळ प्रमाणात वाचलीं जातात हें जरी खरें असलें तरी त्याचा मनोविकासास इष्ट असाच उपयोग होतो किवा नाही याबद्दल मन संशयित असनें. मासिकातील वाङ्मय जरी तात्कालिक वाचना-पुरतेंच असल्याचा भास झाला तरी त्याला चिरकाल टिकणाऱ्या वाङ्मयाइतकें महत्त्व आहे. ग्रंथाच्या मार्फत लेखकाचा आणि वाचकाचा जितका परस्परसंबध येतो त्यापेक्षा किती तरी जास्त निकट संबंध मासिकातील लेखकाचा आणि वाचकांचा येतो. प्रसिद्ध झालेल्या ग्रंथाची रचना मर्यादित असते। परंतु मासिकाच्या रचनेला व कार्यक्षेत्राला फारशी बधनें नसतात. विषयाची विविधता, त्यांची निरनिराळ्या प्रकारानी केलेली माडणी, त्यात तत्कालीन महत्त्वाच्या व शास्त्रीय शोधाची होणारी चर्चा, या विशेष गुणसमुच्चयामुळें सपूर्ण ग्रंथ मासिकाच्या कार्यविस्ताराची बरोबरी करूं शकत नाहीत कला, काव्य, सगीत, लघुकथा या किंवा इतर अनेक विषयाना वाहिलेली दर महिन्याला एक किंवा दोन नवी मासिकें निर्माण होतात असें म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाही परंतु त्या प्रदेशात जीवनकलह फार तीव्र असल्यामुळें त्या सर्वांना टिकाव धरणे मुष्कील होतें. जन्मास येतात तरी बाल्यावस्थेंतच कित्येक नामशेष होतात. सकाळपासून रात्रीपर्यंत प्रत्येक क्षण आपण शास्त्रिय प्रगतीवर सर्वस्वी अवलबून असताना शास्त्रीय वाङ्मयाची व त्या मार्गानें शास्त्रीय विषयातर्गत बोधामृतसेवनाची संधि आपण एकागी वर्तनानें गमावित आहों. शास्त्रीय मासिकाची फार उणीव आहे, शिवाय ती लोकप्रिय नसतात कोणच्याही मोठ्या गावातील पुस्तकें, वर्तमानपत्रे व मासिकें विकण्याच्या दुकानाकडे नजर टाकल्यास कोणच्या वाङ्मयाला लोकाश्रय आहे तें सहज दिसून येईल.

हिंदुस्तान शेतीप्रधान आहे. हिंदुस्थानात सर्व प्रकारची खनिजे उपलब्ध आहेत. येथें जलौघशक्ति अमर्यादित आहे हिंदुस्थानची सृष्टिजन्य संपत्ति इतकी मोठी आहे की देशात शास्त्रीय सुधारणा केल्यास त्यास दुसऱ्या कोणच्याही देशाकडे पाहाण्याची जरूरी पडणार नाही. या किंवा अशाच तऱ्हेच्या गोष्टीच्या सत्यतेबद्दल बहुतेक सर्व राजकीय, सामाजिक आणि शैक्षणिक सस्थातून एकसारखी आश्वासने मिळत असताना आपण शास्त्रीय ज्ञानाच्या प्रगतीची हेळसाड करीत आलों आहों. आपली शास्त्रीय प्रगति सध्या सर्वस्वी परदेशावर अवलबून आहे त्या शास्त्रीय व औद्योगिक परावलबनातून आपली सुटका होण्यासाठी सर्व देशभर शास्त्रीय ज्ञान वेगाने पसरलें पाहिजे ज्ञानप्रसाराचे मुख्य साधन वाङमय होय, परंतु सुबोध आणि शास्त्रीय वाङ्मय, निर्माण करण्यात व त्याचा योग्य तो परामर्ष घेण्यांत आपण किती निरुत्साही आहोंत याची साक्ष शास्त्रीय वाङ्मयाच्या लोकप्रियतेवरून व प्रसिद्धीवरून पटते।

हजारानें मोजण्याइतक्या प्राथमिक व शेंकड्यानें मोजण्याइतक्या दुय्यम शाळा महाराष्ट्रांत आहेत त्याशिवाय आठ दहा महाविद्यालये आहेत. तेथें सर्व प्रकारचें व दर्जाचें शास्त्रीय शिक्षण दिलें जात प्रत्येक शिक्षणक्रमात मराठी, इंग्रजी, इतिहास इत्यादि विषयाना जें स्थान दिले जातें त्याच्या बरोबरीनें भूगोल, गणित, ज्योतिष, विज्ञान इत्यादि शास्त्रीय विषयाना दिलेलें असते तरीसुद्धा लेखकाची, वाचकांची आणि सर्वसाधारण जिज्ञासु माणसाची शास्त्रीय विषयाचे ज्ञान संपादनाची असावी तेवढी तीव्र इच्छा दिसून येत नाही वस्तुस्थिति अशी आहे, आणि ती उत्पन्न होण्यास आपण स्वतःच पुष्कळाशी कारणीभूत आहोंत. मुद्दाम डोळेझाक करून आपण आपली अशा तऱ्हेची दिशाभूल फार उशीरापर्यंत चालू ठेवू नये. सध्या जी दुरुस्ती करणे शक्य आहे ती पुढें अशक्य होईल, व **शास्त्रीय सुखासाधनांच्या बाबतींतील आपल्या परावलंबनाला आळा बसणार नाहीं.**

शास्त्रीय वाङ्मयाची हेळसांड होण्याची काही योग्य व काही अयोग्य वाटण्यासारखी अनेक कारणें आहेत, तरी विश्वविद्यालयाची शास्त्रीय देशी वाङ्मयाबद्दलची उदासीनता हें अगदी मोठें कारण आहे विश्वविद्यालयानें मातृभाषेंतून शास्त्रीय विषयाचा अभ्यास करण्याला मोकळीक दिली नाही, तोंपर्यंत हेंच कारण मुख्यत्वेंकरून नजरेंत भरण्यासारखें आहे.

शास्त्रीय नियतकालिकाचें वाङ्मयात फार वरचें स्थान असलें पाहिजे एकदर जगातील शास्त्रीय शोधाची व विचाराची माहिती नियतकालिकाच्या मार्फतच व्यवस्थितपणें होऊं शकते शास्त्रज्ञात व संशोधकात परस्पराशीं विचारविनिमय करण्याचें नियतकालिकें हे एक मोठे उत्तम साधन होऊन बसलेलें आहे शास्त्रीय प्रगति सर्वसाधारण समाजात रूढ करण्यास शास्त्रीय बालबोध नियतकालिकाइतकें उत्कृष्ट साधन दुसरें सापडणार नाही.

यदा अखिल जगातील शास्त्रीय नियतकालिकाची माहिती देणारा एक प्रचंड कोश प्रसिद्ध करण्यात आला. त्यात ६०००० वर नियतकालिकाची गणति करण्यात आली आहे एकदर अठरा भाषातून प्रसिद्ध होणारी नियतकालिकें विचारांत घेतली तर प्रमुख भाषांचा खाली दिल्याप्रमाणें अनुक्रम लागतो.

| भाषा | शास्त्रीय नियतकालिकांची संख्या |
|---|---|
| इंग्लिश ( आणि अमेरिकन ) | १३४९३ |
| जर्मन | ६१८६ |
| फ्रेंच | ५०१३ |
| रशिअन | १८३३ |
| इटालिअन | १६६७ |

**शास्त्रीय प्रगतीचा व्यवहारांत उपयोग अवश्य आहे. त्याबाबतींत आपण पर-**

देशावर सदोदित अवलंबून राहणें योग्य नाही यासाठीं मराठी शास्त्रीय वाङ्मयाची वाढ झालीच पाहिजे शास्त्रीयज्ञान आबालवृद्धाना आणि खेड्यापाड्यांतील देशबांधवाना पोंहोचविण्यास नियतकालिकाइतका उत्तम प्रचारक मिळणार नाही. या बाबतीच आपण निरुत्साही राहिलों तर शास्त्रीयज्ञान परदेशीय शास्त्र्याच्या जादूच्या पोतडीतच गुप्त राहून आपला जनसमाज नुसता त्याच्याकडे आश्चर्यानें बघून एकसारखा पैसे फेंकत राहणार व स्वतःची उपासमार करून घेणार यात शंका नाही.

## ( ४ )
## विश्वविद्यालयें व बोधभाषा.

मातृभाषेचा बोधभाषा म्हणून उपयोग करून तिला वरिष्ठ पदावर ठेवण्याचें कार्य हिंदुस्थानातील विश्वविद्यालयापैकीं आंध्र विश्वविद्यालयाने प्रथम अंगिकारलें त्यानतर निजाम सरकारच्या उस्मानिया विश्वविद्यालयात सर्व शिक्षण देशी भाषेंतून ( उर्दूतून) देण्याचें आरंभिलें. मध्यप्रांतातील हायस्कूल बोर्डाने त्या बाबतीत बरेंच पुढें पाऊल टाकले आहे पंजाब व संयुक्तप्रांतातील विश्वविद्यालयांनी बरीच आघाडी मारली आहे बनारसच्या विश्वविद्यालयात हिंदींतून शिकविण्याची व्यवस्था आहे परंतु जुन्या विश्वविद्यालयापैकी कलकत्त्याचे प्रयत्न लक्ष्यात घेण्यासारखे आहेत सर्व काल्पनिक अडचणी झुगारून देऊन १९३८ सालची प्रवेश परीक्षा मातृभाषेंतून—बंगालीतून—घेण्याचें निश्चित झाले आहे

मुंबई विश्वविद्यालयाची मनोरचना कशी आहे याचा थांगच लागत नाही या विश्वविद्यालयाने मराठी भाषेला बोधभाषा म्हणून जें उच्चस्थान द्यावयाचें तें अद्यापि दिलेलें नाही, आणि देण्याची त्याची इच्छाही दिसून येत नाही

दुय्यम प्रतीच्या शिक्षणक्रमात मराठीला बोधभाषा म्हणून वापरली जाण्याची परवानगी मिळविण्यास सुमारें पाऊणशें वर्षे खर्ची पडली. बी ए च्या अभ्यासक्रमात मराठीचा अंतर्भाव करण्यात आला आहे, परंतु **मराठी भाषेमध्यें अनेक शास्त्रीय व कलात्मक प्रमाणग्रंथ निर्माण होण्यास केवळ तिचें अध्ययन उपयोगीं पडणार नसून तिचा जर विश्वविद्यालयांत बोधभाषा म्हणून उपयोग सुरू झाला, तरच निरनिराळ्या शाखांतील व निरनिराळ्या दर्जाचें योग्य तें वाङ्मय उत्पन्न होऊं शकेल** प्रस्तुत मुंबईच्या विश्वविद्यालयाचें कार्यक्षेत्र, त्याची घटना आणि त्यातील कित्येक पुढाऱ्याचा मराठीबद्दलचा अविश्वास व तिच्या योग्यतेसंबधी दूषित पूर्वग्रह ही लक्षात घेतल्यास त्या विश्वविद्यालयात मराठीला व इतर देशी भाषाना बोधभाषाचा दर्जा मिळण्याची फारशी आशा नाही. त्यासाठी भाषावार विश्वविद्यालयाचीच स्थापना व्हावयास पाहिजे. भाषावार विश्वविद्यालयें स्थापण्याच्या या कल्पनेवर अनेक आक्षेप घेण्यात येतात त्यांतील मराठी भाषेची अपूर्णता अर्थात् मराठीत अद्याप पुरेशी ग्रंथरचना झाली नाहीं, हा एक मुख्य आक्षेप

असतो. एका भाषाप्रेमी व प्रसिद्ध गणितज्ञानें या बाबतीत खालीलप्रमाणें स्पष्टीकरण केलें आहेः—

" विश्वविद्यालयीन अभ्यासक्रमास उपयुक्त अशी ग्रंथरचना भाषेंत झाली नाहीं म्हणून तिला विश्वविद्यालयात बोधभाषेचें स्थान देता येत नाही, व तिला विश्वविद्यालयात बोधभाषेचें स्थान दिले नाही म्हणून तिच्यात अभ्यासक्रमास उपयुक्त अशी ग्रंथरचना होत नाही, अशी ही वर्तुळाकार कार्यकारण विचारसरणी आहे. भाषावार विश्वविद्यालयें स्थापण्याचा प्रयत्न केला पाहिजे, आणि तो जरी एकदम यशस्वी होण्यासारखा नसला तरी निष्फळ आणि वर्तुळाकार चर्चा न करता अनेक प्रकारच्या शास्त्रीय, कलात्मक व तात्त्विक विषयावर प्रमाणग्रंथ व तद्‌गभूत सर्व प्रकारचें वाङ्मय निर्माण करण्याच्या खटपटीस ताबडतोब लागले पाहिजे "

वर्तुळाकार कार्यकारण विचारसरणी बहुतेक नेहेमीं निष्फळ असून अत्यंत घातक असते. वर्तुळाबाहेर निघून स्वतंत्र विचार करण्याचा उपक्रम कोणी तरी केलाच पाहिजे. आपली जबाबदारी दुसऱ्यावर ढकलून भागण्यासारखें नाही. प्रत्येक गोष्ट सरकारनेच केली पाहिजे असा आग्रह धरून चालणार नाही. देशातील सर्वांगीण बौद्धिक उन्नति हेंच ध्येय मानणारी मुख्य संस्था जें विश्वविद्यालय त्यानेंच ही जोखीम शिरावर घेणें उचित आहे. हा प्रश्न कलकत्ता विश्वविद्यालयानें अतिशय धैर्यानें सोडविला असून वाङ्मयनिर्मितीकरिता त्यानें आखलेला कार्यक्रम पाहण्यासारखा आहे

मातृभाषेंतून—बंगालीतून—शास्त्रीय शिक्षण देण्याच्या शक्याशक्यतेबद्दल पुन्हा पुन्हा संशय उत्पन्न न करता विश्वविद्यालयाची प्रवेशपरीक्षा १९३८ सालापासून बंगाली भाषेंतून घेतली जाईल या परीक्षेला सरकारी मान्यता मिळणार आहे. शास्त्रीय विषयांत लागणारी क्रमिक पुस्तकें व इतर आवश्यक प्रमाण ग्रंथ दीड वर्षांच्या आत तयार करवून घेण्याची जोखीम विश्वविद्यालयानें पत्करिली आहे. तेथील उपकुलगुरूंचा बंगाली भाषेच्या कार्यक्षमतेवर जबर विश्वास आहे. आपल्या मातृभाषेचा बोधभाषेसाठी उपयोग करता आलाच पाहिजे व त्याकरितां जे जे प्रयत्न करणें अवश्य वाटतील तेवढे करण्याचें त्यानी निश्चित केलें आहे विश्वविद्यालयातील भिन्न भिन्न शास्त्रीय विषयात पारंगत असलेल्या विद्वानाची एक समिति भरवून त्यातील प्रत्येकाला एकेका शाखेचा अधिकार दिला आहे. योग्य त्या तज्ज्ञाची मदत घेऊन आतापर्यंत प्रसिद्ध झालेलें बंगालींतील शास्त्रीय वाङ्मय एकत्र केलें जात आहे निदान दुसऱ्या वर्षाच्या परीक्षेपर्यंत लागणारे विषय शिकविण्यासाठी जरूर वाटणारी ग्रंथरचना व परिभाषा जुन्या साहित्यातून शोधून काढण्याची जारीनें खटपट चालू आहे. याचवेळी हिंदुस्थानांतील इतर भाषांतील शास्त्रीय वाङ्मय व परिभाषा एकत्रित करण्याचीही एक योजना विचारात आहे तज्ज्ञ व विद्वान् यांच्या संमतीनें तात्पुरती परिभाषा आटोक्यांत आल्याबरोबर येत्या वर्षाच्या प्रारंभापासून लेखनास सुरवात करण्यात येईल. सकलित केलेली ही सर्व माहिती

विश्वविद्यालय आपल्या खर्चानें छापून प्रसिद्धीसाठी व अभिप्रायार्थ सर्व संस्थांकडे पाठवून देईल. सध्या ' इंटरमीजीएट ' परीक्षेपर्यंतच प्रयत्न करावयाचा बेत केला आहे. त्यात हेतु असा की मुद्दाम लांबची उडी घेताना येणाऱ्या काही अडचणींनी मुळांतच डोकें वर काढून विरोध करूं नये. एकदा भाषा व प्रघात रूढ झाले म्हणजे वरच्या परीक्षांत शिरकाव करणें सोपें जाईल.

मुंबई विश्वविद्यालय जेव्हा इकडे लक्ष्य पुरवील तो शास्त्रीय मराठी वाङ्मयातील सुदिन समजावा लागेल तोंपर्यंत **शिक्षक, लेखक व विद्यार्थीगण यांनींच आपापल्या परीनें जेवढे स्वतंत्र प्रयत्न करतां येतील तेवढे करीत राहावे. तसें न केल्यास वाङ्मयाची होत असलेली हानि भरून येणार नाहीं.**

## ( ५ )

## शास्त्रीय परिभाषा

### ( ५ ) अ

### प्रचलित एकांगीं प्रयत्न

वाङ्मयवृद्धीला मुख्य अडचण परिभाषेची असते आणि शास्त्रीय वाङ्मयात ती अडचण फारच तीव्र रूपात भासते. ही अडचण फारशी महत्त्वाची नाही असा जरी आतापर्यंतच्या विवेचनांत एकदोन वेळा उल्लेख केला असला तरी सर्वसाधारण जनसमूहाच्या दृष्टीनें पाहिल्यास त्या अडचणीचें उग्र स्वरूप काहीं सौम्य होण्यासारखें नाही कोणत्याही शाखेंतील शास्त्रीय विषयाचें विवेचन किंवा अभ्यास करूं लागणारास पहिला अडथळा परिभाषेचा असतो काही काही प्रसंग तर इतके बिकट असतात की, लेखकास अथवा शिक्षकास त्या क्लिष्ट परिभाषेच्या कोंडाळ्याबाहेर पडता येत नाही; आणि जात्या कितीही हौस असली तरी नवशिक्या आणि अनभिज्ञ माणसाचा त्या शास्त्रीय ज्ञानमंदिरात शिरकाव होणें कठीण जातें. अखेरीस जास्त त्रास व हिरमोड झाला म्हणजे त्याच्या मूळच्या हौसेचा ऱ्हास होतो व शास्त्रीय विषयाचें आकलन करण्याच्या भानगडींत तो पडेनासा होतो.— सर्वसाधारण मनुष्यावर या परिस्थितीचा इतका विपरीत परिणाम झालेला दिसतो की, त्याच्या मतें शास्त्रीय विषयावरील लेख किंवा व्याख्यान म्हणजे दुर्बोध पारिभाषिक शब्दांचें केवळ अवडंबर. ही गोष्ट कित्येक वेळा खरी असली तरी तिच्यात येवढें घाबरून जाण्यासारखें काय आहे? प्रत्येक विषयात परिभाषा असतेच. संगीताची परिभाषा संगीत न जाणणाऱ्या मोठ्या विद्वान् गणितज्ञाला सुद्धा दुर्बोध वाटेल. अर्थशास्त्र, राजनीति, मानसशास्त्र, व्याकरण यांच्या परिभाषा अभ्यास केल्याखेरीज अंगवळणी पडण्यासारख्या नाहीत, मग शास्त्रीय परिभाषेच्या बिकटपणाबद्दलच येवढी हाकाटी कां ऐकूं येते? **शास्त्रीय सुधारणा आत्मसात् करून घेण्याची गोडी**

**जनसमूहाला लागली आहे तरी त्यांतलें इंगित समजावून घेण्याची गोडी लागलेली नाहीं.** टेलिफोन वापरावासा वाटतो पण त्यातलें शास्त्र कळावें अशी उत्सुकता नाही हिंवताप येऊं नये, प्रवासात असताना मोटारचें इंजिन बिघडू नये, लहान मुलानीं विजेचा गडगडाट का होतो असें विचारल्यास समर्पक उत्तर देता यावें, उभ्या शेतांतील पिकावर कीड पडू नये, इत्यादि कित्येक गोष्टी आपल्याला मुळीच अप्रिय नाहीत पण त्या साध्य करून घेण्यास अवश्य असणाऱ्या शास्त्रीय ज्ञानाची प्राप्ति होण्यासाठी झीज सोसण्यास मुळीच तत्परता दाखवित नाही. अर्थात् हा दोष विषय समजावून देणाराचा व घेणाराचा दोघाचाही असू शकतो, पुष्कळ अशी पाहिल्याचाच दोष जास्त प्रमाणात असल्याचें उघडकीस येतें एकच विषय कितीतरी प्रकारानी समजावून देता येतो. सुलभ आणि नित्यपरिचित पारिभाषिक शब्दाचाच उपयोग करून, किंवा शक्य तोंवर अप्रसिद्ध आणि दुर्बोध शब्द मुळातच टाळून विषय समजावून सागण्याची एक कला आहे प्रत्येकाला ती आपोआप येत नाही तिच्यासाठी दीर्घ अभ्यास व परिश्रम करावे लागतात. नुसते जड पारिभाषिक शब्द बालवाचकास किंवा नवशिक्यास पेलत नाहीत. त्यामुळें विषयाची गोडी बिघडते व मनात तिरस्कारयुक्त भीति उत्पन्न होते

जाडा विद्वान् किंवा उच्च दर्जाचा सशोधक शास्त्रीय विषयाचें मनोरजक रीतीनें स्पष्टीकरण करूं शकल असे नाही परतु योग्य अभ्यास केल्यावर त्याला वरील गोष्ट उत्तम साध्य होईल * विषयावरील आणि भाषेवरील प्रभुत्व, त्याचप्रमाणें शिक्षणशैली हे गुण शिक्षकाच्या किंवा लेखकाच्या अगी आल्यावर त्याला भाषेच्या अपूर्णावस्थेची आणि परिभाषेची टचाई यापैकी कोणचीच अडचण तीव्र प्रमाणात भासणार नाही

परिभाषेची अडचण दूर करण्याचे अनेक प्रयत्न झाले आहेत, त्यापैकी काहीना थोडयाबहुत प्रमाणात यशही आलें. यशाची मुख्य खूण म्हणजे वाङ्मय तयार होण्याला या प्रयत्नाची मदत झाली.

प्रथमतः, वगीय साहित्यपरिषद् व नागरी प्रचारिणी सभा यानी कित्येक वर्षा-पूर्वी शास्त्रीय परिभाषा बनविण्यासाठी केलेले प्रयत्न प्रसिद्ध आहेत परतु एकदर शास्त्रीय विषयातील लेखन, वाचन आणि अभ्यास देशी भाषेतून फारच थोड्या प्रमाणात होत असल्यामुळें त्या प्रयत्नाचा तादृश उपयोग न होतां त्याची वाढही तेथेंच खुंटली.

रानडे यांच्या विस्तृत इग्रजी–मराठी कोशाचाच शास्त्रीय विषयावर लेखन-वाचन करणाराला उपयोग होतो, तरी अत्यंत वेगानें वाढत जाणाऱ्या आधुनिक शास्त्राला असल्या वीस पंचवीस वर्षापूर्वीच्या प्रयत्नाचा उपयोग अगदीच मर्यादित स्वरूपात होणार हें खचित ।

---

* *Nature*, 27 th May 1933 "Language in the Service of Science."

सुमारें पंधरा वर्षापूर्वी निरनिराळ्या विषयांवर पारिभाषिक शब्दकोश करण्याची बडोद्यास कांही विद्वानांची खटपट चालूं होती. तेथील सहविचारिणी सभेनें त्यात बराच पुढाकार घेतला असावा असा माझा अंदाज आहे. या प्रयत्नाचें दृश्य फल अशी फक्त एक विद्युत्विषयातील शब्दांची यादी माझ्या नजरेस पडली. त्यापुढें या उद्योगाला कितपत यश आलें तें माहीत नाही.

अलीकडील अगदीं ताजा प्रयत्न म्हणजे महाराष्ट्र शास्त्रीय परिभाषा मंडळाचा. याचें कार्यालय पुणें येथें आहे. मंडळानें निरनिराळ्या शास्त्रात उपमंडळें नेमिली व त्यांच्यांत बराच उहापोह झाला त्यानंतर मंडळाच्या मार्फत निरनिराळ्या आठदहा याद्या प्रसिद्ध झाल्या असून त्याना पारिभाषिक शब्दकोश असें नाव दिलें आहे या प्रयत्नाचा उद्देश व त्याचें कार्यक्षेत्र फार विस्तीर्ण असून त्यात महाराष्ट्रातील कित्येक विद्वानाचें त्याना पूर्ण साहाय्य लाभलें आहे.

मराठीत म्हणण्यासारखें शास्त्रीय वाङ्मय नाही, जे थोडें आहे त्याला हौशी वाचक नाहीत. अशा विलक्षण परिस्थितीत या पारिभाषिक शब्दकोशरूप विस्तृत याद्याचा व्हावा तितका उपयोग होत नाही किंवा होणार नाहीं असें म्हटलें तर मजवर कृतघ्नपणाचा आरोप कोणी करूं नये. मराठीतून शास्त्रीय विषय लिहिणाराची किंवा शिकविणाराची संख्या अगदी अल्प आणि त्याचे विषय एकमेकापासून अगदी भिन्न अशी वस्तुस्थिति आहे. तेव्हा आतापर्यंत तयार झालेल्या कोशाचा व याद्याचा त्याना फारच थोडा उपयोग होतो.

लेखकाची संख्या अल्प आहे याचें खरें कारण परिभाषेचा व कोशाचा अभाव हें नसून लेखकाना व वाचकाना मराठीत शास्त्रीय वाङ्मय वाढविण्याची अद्यापि प्रबळ इच्छाच झालेली नाही आणि नुसत्या शब्दकोशाचा जन्म झाल्यानें ती होणारही नाही! असो. यात वर्तुळाकार विचारसरणी होण्याची भीति असल्यामुळें व या क्षणीं त्यासबधी चर्चा करावयाची नसल्यामुळें तो मुद्दा येथेच सोडून द्यावा हें बरें पुढे योग्य स्थानीं त्याचा विचार केला जाइलच (पा. ).

लिहिणाराला पारिभाषिक कोशाचा फार अल्प प्रमाणात उपयोग होतो, ही अनुभवाची गोष्ट आहे लिहिताना कोशात शब्द धुंडाळू म्हटलें तर तो तेथे सापडत नाही. आणि सापडला तरी त्याचा संदर्भाला धरून नीट उपयोग होईलच अशी खात्री वाटत नाही. परभाषेतील शब्द परिचयामुळें सोपा आणि सुटसुटीत वाटतो. लिहिणाऱ्याचे हाल नुसता शब्दकोश रचणाराला काय कळणार? अनेक वेळा कोशातील किंवा प्रचारातील शब्द टाकून लेखकाला संदर्भानुसार आणि वाचकाच्या बौद्धिक पूवतयारीला अनुसरून स्वतःची नवीनच परिभाषा तयार करून वापरावी लागते.

शास्त्रीय ज्ञान म्हणजे परिभाषा अवगत करणें नव्हे, ही गोष्ट अगदीं स्पष्ट असून सुद्धा शब्दकोशकाराच्या नजरेतून ती कोणत्या तरी विलक्षण कारणामुळें सुटलेली दिसते.

परिभाषा तयार करण्याचे अगदीं पहिले प्रयत्न केवळ शब्दास प्रतिशब्द मुकर करण्याच्या हेतूनें झाले. मूळ शब्द इंग्रजी, ग्रीक किंवा लॅटिन भाषांतील आणि प्रतिशब्द संस्कृतांतील, असला प्रकार बराच वेळ चालू होता. अजूनही हा दृष्टिकोण फारसा बद-ललेला दिसत नाही. वास्तविकपणें त्यांत गैरवाजवी असें कांहींच नाहीं; कारण नवीन परिभाषा तयार करताना संस्कृत भाषेचाच मुख्यतः आधार घेणें आवश्यक आहे. " संस्कृतांत कधींही संपणार नाही इतकी शब्दसंपत्ति आहे, व प्रत्येक शब्दापासून दुसरे अनेक शब्द तयार करण्याचे रूपविकार, प्रत्यय, उपसर्ग इत्यादि त्यात आहेत तितके आपल्या देशांतील कोणच्याही चालू भाषेंत नाहीत. शिवाय हिंदुस्थानातील तीन चतुर्थांश लोक ज्या भाषा बोलतात त्या संस्कृतोद्भव आहेत व काही तशा नसल्या तरी संस्कृतशब्दप्रचुर आहेत. " संस्कृत भाषेचा परिभाषारचनेला जितका उपयोग होईल तितका अर्थात् दुसऱ्या कोणत्याही देशी भाषेचा होणार नाही.

भाषेविषयी साधारण एकमत झालें तरी शब्द तयार करावयाचे कोणी आणि निश्चित झाल्यावर ते योग्य रीतीनें वापरले जातात किंवा नाही, आणि जात नसल्यास त्याचा प्रसार होण्यास कोणत्या दिशेनें प्रयत्न केले पाहिजेत याबद्दलचा विचार करताना आपल्यात एकमत झालेलें दिसत नाही ही मोठी दुःखाची गोष्ट आहे. परिभाषा एकत्रित करण्याचे पहिले प्रयत्न संस्कृत पंडिताच्या मदतीनें करण्यात आले; त्यांचे शब्द असावे तितके सुबोध नसत. उच्चार अवघड असून अर्थासंबंधी पुष्कळ वेळा गैरसमज उत्पन्न होण्याचा संभव असे. प्रतिशब्द सुचविणारा नुसता तज्ज्ञ असून उपयोगी नाही किंवा नुसता संस्कृत वैयाकरणी असूनही भागणार नाही. एकाच माणसात हे दोन्ही गुण एकत्रित झालेले पाहिजेत आणि त्याशिवाय तो इंग्रजी, मराठी भाषातील चांगला सरावलेला आणि वाचकांचा आवडता लेखक असावा. संस्कृत भाषा व शक्य तर आधुनिक शास्त्रीय वाङ्मय ज्यात भरपूर आहे अशा जर्मन व फ्रेंच भाषा त्याला अवगत असाव्यात. मूळ शब्दाचा आणि सुचविलेल्या शब्दांचा अर्थ व उपयोग अगदी बिनचूकपणें त्याला माहिती असून त्या शब्दाच्या व्यापक अर्थाचीही त्याला दूरदृष्टि आली पाहिजे. सर्वगुणसंपन्न असा शब्द आढळला नाही तर तडजोड करणे जरूर असते. त्यावेळी, म्हणजे तडजोड करताना, कोणच्या गुणाना जास्त महत्त्व द्यावयाचें वगैरे गोष्टी फार दक्षतेनें कराव्या लागतात. तडजोडीसंबंधीं एक दाखला फार सूचक आहे तो असाः—

जर्मनीतील आधुनिक विश्वविद्यालये स्थापन झालीं त्यावेळी—सुमारें शंभर वर्षांपूर्वी—शिक्षकाची निवड करण्यासंबधी तेथील चालकानीं एक नियम घातला होता. शिक्षक पहिल्या प्रतीचा विद्वान् असून त्याला शिक्षणशास्त्राची माहिती असावी. दोन्ही गुण एकाच व्यक्तींत आढळले तर उत्तम, परंतु निदान पहिला गुण अवश्य असला पाहिजे. त्याच्या मतें जो विद्वान् आहे, एखाद्या विषयांत पारगत आहे आणि ज्याचें

संशोधनकार्य अखंड चालूं आहे अशाला जरी प्रारंभीं शिक्षणशास्त्र अवगत नसलें तरी त्यांला तें हस्तगत करून घेणें शक्य आहे; परतु नुसत्या शिक्षणशास्त्रात प्रवीण असलेल्याला विद्वान् आणि सशोधक होणें तितकें शक्य नाहीं.

आपल्या सध्याच्या स्थितीचा विचार करून पहा आपणाला शास्त्रीय ज्ञान पाहिजे आहे. त्यासाठी अवश्य वाङ्मयाचा अजून पत्ता नाहीं परतु शब्दकोशाची मात्र रेलचेल! सर्वसाधारण जनसमूह वाङ्मय आणि शब्दकोश या दोहोंपैकी वाङ्मयाचाच पुरस्कार करील यांत शंका नाही. शास्त्रीय वाङ्मयाव्यतिरिक्त इतर वाङ्मयाचा सध्यांच्या कालात जास्त प्रसार होत आहे त्याला हें एक मुख्य कारण नसेल कशावरून? लेखकांनीं लिहिलेंच नाही तर वाचक वाचणार काय? शास्त्रीय विषयात लिहिण्यास लेखक तयार नसतात. याला काय कारण असेल? **शाळा, कॉलेजांतून सर्व प्रकारचे शास्त्रीय विषय शिकविले जातात, व ते शिकविणारा शिक्षकवर्ग विद्वान् आणि अनुभवी सुशिक्षितांचा असतो, परंतु शास्त्रीय विषयावर लिहिण्यास किंवा बोलण्यास ते कचरतात, निदान त्यांत त्यांना हौस वाटत नाही** माझ्या मतें या विद्वानानी आपली अक्रियता झुगारून द्यावी, आणि आपल्याला सुचेल आणि मानवेल तसें लिहिण्यास सुरुवात करावी याच मार्गानें भाषा वाढू लागेल आणि परिभाषा योग्य किंवा अयोग्य हे ठरविणें शक्य होईल. लेखकानी काहीच लिहिलें नाही तर वाङ्मय तयार होणार कसें? पुष्कळजण परिभाषेच्या अभावी आपणास लिहिता येत नाहीं असें बरेंच दर्शवितात, परंतु खरोखर ज्या भाषेची परिभाषा तयार आहे त्याही भाषेत त्याचे फारसें लेखन नसतें! याचें कारण काय असेल बरे?

ग्वाल्हेर येथून शब्दकोशमंडळाचें जें एक कार्य काही वर्षापूर्वी सुरू करण्यात आलें होतें त्याचा मी एक सदस्य होतों. त्यावेळच्या परिभाषासमितीला मी एक सूचना केली होती तीच सूचना आज आपल्यापुढें पुन्हा माडावीशी वाटते. तिच्यातले दोष अद्यापि कोणी सिद्ध करून दाखविले नाहीत, आणि माझ्या मतें तीच जास्त फलदायक होईल अनेक विद्वानानी एके ठिकाणी बसून काही अद्भुत शब्द रचण्याऐवजी प्रत्येक अधिकारी व्यक्तीनें आपल्या आवडत्या विषयात किंवा शाखेंत निदान दोनचारशें पानाचा एक सविस्तर ग्रथ तयार करावा. त्यात लेखकानें स्वतःच्या मतें उत्तम असलेले पारिभाषिक शब्द खुल्या अंतःकरणाने वापरलेले असावे. अशाप्रकारे रचलेल्या ग्रंथात अर्थात्‌च योजलेल्या शास्त्रीय शब्दाचे स्पष्टीकरण पूर्णपणें दिलेलें असणार, तेव्हा त्यावरून त्या शब्दाची व्युत्पत्ति, अर्थ व व्याप्ति पुष्कळ अंशानें निश्चित होऊं शकेल. एकाच विषयातील दहाबारा उपशाखावर लिहिलेले अधिकारी दर्जाचे ग्रथ पुढें ठेवून जर तज्ज्ञानी एकत्र होऊन त्यावर चर्चा केली तर त्यातून प्रमाणपरिभाषा व प्रमाणग्रथ योग्य प्रकारें निर्माण होतील, व अशा प्रयत्नाना उच्च दर्जाची मान्यता मिळूं शकेल.

माझी ही त्यावेळची सूचना कोशमंडळाच्या अध्यक्षांना पटली होती, परंतु त्या अर्थी पुढें माझ्याशी केव्हाच कसल्याही बाबतींत विचारविनिमय करण्याची कोणी तसदी घेतली नाही त्यावरून माझा अंदाज आहे, की ती कल्पना इतर सहाध्यायाना फारशी रुचली नसावी किंवा अव्यवहार्य म्हणून बाजूस पडली असावी. कल्पनेंतील मुख्य भाग लेखनाचा होता आणि कदाचित् तोच अव्यवहार्य वाटला असण्याचा संभव आहे !

पुणें येथील महाराष्ट्र शास्त्रीय परिभाषा मंडळाची चर्चेवर भिस्त आहे तरी लेखनानें किंवा इतर प्रकारानी परिभाषा रूढ करण्याचा मार्ग त्याना सर्वस्वी पसंत असल्याचें त्याच्या प्रसिद्धीपत्रकात स्पष्ट नमूद केलेलें दिसतें. कोश निर्माण करण्यात जशी त्या मंडळानें परिश्रमपूर्वक कामगिरी केली आहे तशीच वाङ्मयनिर्मितीची कामगिरीही याजकडून व्हावी अशी मी आशा प्रदर्शित करतों. सध्याची परिस्थिति मात्र पुष्कळाशी निराशाजनक आहे.

परिभाषा तयार करावयाची ती वापरून लेखनात उपयोगी पडण्यासाठी अथवा नुसती भाषेंतील शब्दकोशाची संख्या वाढविण्यासाठी ? आधी शब्दकोश आणि नतर वाङ्मय किंवा आधी वाङ्मय आणि नंतर शब्दकोश हा वाद "काल आणि अवकाश यापैकी प्रथम कोणाचें अस्तित्व झालें ?" या बिकट प्रश्नाचें उत्तर शोधण्यासारखा हानिकारक आणि मुख्य मुद्यापासून निष्कारण दूर नेणारा आहे.

## ( ५ ) ब

## परिभाषा कशी असावी ?

परिभाषा वापरणे अवश्य आहे असें लेखकाला खात्रीपूर्वक वाटू लागलें म्हणजे तो बुचकळ्यात पडतो अशा वेळी परिभाषारचनेसबंधी काही मार्गदर्शक सूचना त्याला अवश्य वाटूं लागतात. यासाठी परिभाषा कशी असावी यासबधी काही ठळक मुद्दे आपल्यापुढें माडण्याचा माझा विचार आहे जरी सकृद्दर्शनी ते वादग्रस्त वाटले तरी लेखकानी भावनाप्रधान दुरभिमानास बळी न पडता त्याचा काळजीपूर्वक उपयोग करणें इष्ट आहे.

१. परिभाषा सोपी असावी

२ शक्यतोंवर प्रचारात असलेले आणि त्यामुळेच सोपे वाटणारे शब्द जरी परभाषेतील असले तरी ते तसेच वापरावे. त्यामुळें शास्त्रीय विषय समजावून देण्यात व समजावून घेण्यात काही विलक्षण गोष्ट घडत असल्याचा भास होणार नाही व सर्वांची ज्ञान मिळविण्यासी हौस वाढेल.

३. शास्त्रीय चर्चेतील शक्य तेवढे शब्द स्वभाषेंतले असावे त्यामुळे शास्त्रीय विषय आणि परकी परिभाषा या दोन शत्रूशी एकाच वेळी झटापट करावी लागणार नाहीं.

४. स्वभाषेबाहेरील शब्द वापरणें अपरिहार्य झाल्यास सोप्या आणि उच्चारसुलभ अशा संस्कृत शब्दाची होईल तेवढी मदत घ्यावी.

५ पारिभाषिक शब्द एक अर्थी असावे. निदान प्रचारांत आणि परिभाषेंत एकच शब्द निरनिराळ्या अर्थांनी वापरला जाणार नाही याबद्दल शक्य तितकी खबरदारी घ्यावी. पुष्कळशा युरोपीय भाषातून सुद्धा हा दोष अद्यापही नाहींसा झालेला नाही.

६ परभाषेंतील विशेषनामावरून किंवा काही ऐतिहासिक संदर्भावरून साधलेले शब्द मराठीत तसेच ठेवावे, व त्या विशेषनामाचा उच्चार मूलभाषेंतल्याप्रमाणें करावा. अशा बहुतेक शब्दाना आता सर्व शास्त्रीय जगताची मान्यता मिळालेली असतां आपणच अपवाद होऊन राहणें दुराग्रह धरण्यासारखें होईल व प्रगतीच्या दृष्टीनें तें अगदी गैर आहे.

७. प्रत्येक परदेशी पारिभाषिक शब्दाला मराठी पारिभाषिक शब्द पाहिजेच ही कल्पना चुकीची आहे पुष्कळ पारिभाषिक शब्दाचें काम वर्णनानें करता येतें व जेथें हें शक्य असेल तेथें तसें करावें हें बरें सामान्य वाचकाला असले शास्त्रीय लेख वाचण्यात आल्हाद वाटेल.

८ रसायनशास्त्रातील मूलतत्त्वाची किंवा संयुक्ताची नावें, अगदी जशीच्या तशी म्हणजे युरोपीय भाषात वापरण्यात येतात तशी ठेवणेंच इष्ट आहे त्याना विकृत रूप देऊन वापरणें यात एक ऐतिहासिक दोष येतो, परंतु त्यापेक्षा मोठा दोष म्हणजे नवे बनविलेले शब्द मूळच्या शब्दापेक्षा कितीतरी पटीनें दुर्बोध भासतात, आणि प्रत्यक्ष व्यवहारात त्याचा काडीमात्र उपयोग होत नाही, व तो होईल हें शक्यही दिसत नाहीं; असें वाटण्याचें कारण अगदी उघड आहे. **रासायनिक आणि तत्सम औद्योगिक धंदे एकजात युरोपीय भाषा वापरणारांच्याच हातांत आहेत आणि आपला त्यांच्याशीं येणारा संबंध युरोपीय भाषांतून येतो. या सध्यांच्या कालांत आपणांस शास्त्रीय ज्ञान अवगत करून घ्यावयाचें आहे तें आपल्या औद्योगिक प्रगतीसाठीं असून भाषावृद्धीसाठीं नव्हे** ही स्पष्ट बाब नजरेआड करून चालणार नाही. भाषेची आचाळ झाली तरी चालेल असें मी सुचवीत नाहीं आणि माझी खात्री आहे की, तसा कोणाचा गैरसमज होणार नाही. एकदा सर्व हिंदुस्थानवासीयाना उद्योगधंद्यांची नीट वाढ होऊन पोटभर खावयास मिळूं लागलें म्हणजे सबध ' बाईलस्टाईन ' ( Beilstein ) नावाचा रासायनिक संयुक्तकोश अस्सल मराठींत उतरविण्याची खटपट करणें अशक्य होणार नाही

९. परिभाषा प्रमाण होण्यास बराच कालावधि लागतो, परंतु तो अवधि संक्षिप्त करणें आपल्या हातांतली गोष्ट आहे. मात्र योग्य दिशेनें प्रयत्न केला पाहिजे. प्रथमतः लेखनाची सपाटून वाढ करणें हीच दिशा योग्य दिसते. एकाच वेळी एका शब्दास

पांच किंवा सहा प्रतिशब्द रूढ असले तरी त्यात गैर कांही नाही. सृष्टीतील प्रसिद्ध विकासवादास अनुसरून ते सर्व शब्द केव्हांही टिकाव धरून राहणार नाहीत जसजसा लेखन-व्यवसाय वाढेल व लोकांची ग्राहकशक्ति जसजशी विकास पावेल, तसतसे एकार्थी असलेले बहुतेक शब्द गळून जातील व त्यातील एकच शिल्लक राहील. कदाचित् सगळेच शब्द अयोग्य ठरल्यास नाश पावतील आणि अगदी निराळाच अत्युत्तम शब्द सुचेल व तो टिकून राहील. पारिभाषिक शब्दांच्या चढाओढीत "जें टिकेल तेंच योग्य व जगण्यास लायक" ह्या सृष्टिशास्त्रातील अनुभवसिद्ध नियमावर विश्वास ठेवण्यास हरकत नाही.

१०. पारिभाषिक व इतर शब्द कित्येक निरनिराळ्या कारणानें भाषेंत जमत जातात. काही वस्तुवाचक शब्दास मराठी किंवा संस्कृत प्रतिशब्द हुडकणें फारसें अवघड नसतें, परंतु जेव्हा ते शब्द क्रियावाचक अथवा वर्णनात्मक असतात तेव्हां प्रत्येकाला पारिभाषिक प्रतिशब्द सुचविणें कठीण पडतें. त्यांत बुद्धीची आणि कौशल्याची करामत दाखविण्याची संधि मिळते. काही क्रिया प्रचारात नसल्यामुळें आपल्याला अवगत नसतात त्याना कोणताही प्रतिशब्द सुचविला तरी तो अप्रशस्त वाटतो. अशा प्रसंगी फारशी वाटाघाट न करता सुचेल तो कोणताही शब्द लेखनात वापरावा प्रारंभी जरी विलक्षण वाटला तरी सरावानें त्यातील अर्थ अंगवळणी पडेल आणि शब्द आपोआप रूढ होईल. कांही शब्दांनीं विशेष प्रकारच्या शास्त्रीय कल्पना आणि योजना दर्शविल्या जातात. अशा वेळीं आपल्या परिभाषेंतील शब्द द्व्यर्थी नाहीत किंवा ते शब्द वापरल्यानें गैरसमज उत्पन्न होणार नाही, याबद्दल सावधगिरी बाळगावी लागते. कल्पनादर्शक शब्द सुद्धा आस्ते आस्ते आणि नेहमी डोळ्यासमोर येऊं लागले म्हणजे अर्थपूर्ण वाटू लागतात. युरोपियि भाषात गेल्या दहा वर्षात असे कित्येक शब्द रूढ झाले आहेत की त्याचा असा अर्थ होईल याची कोणाला कल्पनाही झाली नसती.

परिभाषा संकलित करण्याच्या बाबतीत विशेष विचारात घेण्याजोगे म्हणून जे कांहीं मुद्दे वर दिले त्यातील प्रत्येकाची उदाहरणें देऊन फोड करता येईल, परंतु विषयांतर व कालव्यय टाळण्यासाठी तसे करीत नाही. कलकत्ता विश्वविद्यालयात शास्त्रीय विषयाची मातृभाषेंतून परीक्षा घेण्याची योजना अंमलात आल्याचा मागें उल्लेख केला आहे त्या योजनेला यश येण्यासाठी अवश्य लागणारी सामुग्री म्हणजे विद्वानाचें साहचर्य, हौशी भाषाप्रेमी लेखकाची मेहनत, ग्रंथसंग्रहालय, प्रमाणपरिभाषा आणि प्रमाणग्रंथ या सर्व गोष्टी सारख्याच महत्त्वाच्या आहेत ह्या गोष्टीकडे कलकत्ता विश्वविद्यालयानें दुर्लक्ष्य केलेले नाही.

आपल्या मुंबई विश्वविद्यालयाची देशी भाषाच्या, विशेषतः मराठी भाषेच्या, बाबतीतील उदासीनता प्रसिद्ध आहे. तेव्हा महाराष्ट्रातील अनेक शिक्षणसंस्थानीं आणि वाङ्मयसेवामंडळानीच हें कार्य नेटानें अंगावर घेतल्यास जी गोष्ट बंगाल्यात शक्य होते ती आपल्याकडे निःसंशय शक्य होईल

# ( ६ )

# शास्त्रीय वाङ्मय–लेखन, प्रकाशन आणि वाचन.

## ( ६ ) अ

## लेखक व प्रकाशक.

मराठी शास्त्रीय वाङ्मयाचा उत्कर्ष व्हावा ही आपणां सर्वांचीच इच्छा आहे असें आपण नेहमी गृहीत धरतों, परंतु वस्तुस्थिति तशी नाही असा संशय येण्यासारखीं कित्येक कारणें दृष्टीस पडतात व मन साशंक होतें. शास्त्रीय लेखक*, प्रकाशक आणि वाचक याचे परस्परसंबंध कसे असावेत याबद्दल तीव्र मतभेद आढळून येतात. सबंध प्रेमाचे आणि सहकाराचे असावेत याबद्दल मतभेद नसतात, परंतु संबंध तसे होण्यासाठी कोणच्या मार्गांचे अवलंबन करणे योग्य, या बाबतीत असतात. सध्याच्या सामाजिक व्यवस्थेंत लेखक व प्रकाशक सर्वस्वी एकमेकावर अवलंबून असतात, कारण त्यात दोघाच्याही पोटापाण्याचा पुष्कळ किंवा सर्वस्वी संबंध येतो दोघाचें एकमेकावाचून अडतें हें माहीत असून ते एकमेकावर चढाई करू पाहतात. वास्तविक यात गैर असें काही नाही परंतु वाङ्मयवृद्धीत केवळ व्यावहारिक आणि आर्थिक बाबीनाच महत्त्व देऊन भागत नाही दोघानी, निदान एकानें, दूरदृष्टि ठेवली पाहिजे, परंतु तसें होत नाही.

प्रकाशक लेखकाला शक्य तेवढे कमी वेतन देण्याची खटपट करीत राहणार तर लेखक प्रकाशकाकडून जें काय निघेल तेवढें काढू पाहणार, अर्थात् एकाची दृष्टि दुसऱ्याला नसते लेखकाला वाटतें प्रकाशकाची मधली अडगळ बाजूला सारून वाचकाना एकदमच सरळ गाठावें. या प्रयत्नात–जर लेखक यशस्वी झाले तर–त्यांचा आर्थिक फायदा निःसशय पुष्कळ होतो, परंतु इतर बरेंच नुकसान पदरात पडतें. वाचकाना आपले ग्रंथ नेऊन दाखविण्यात, त्याचें महत्त्व त्यांना पटवून देण्यात आणि सरतेशेवटी व्यापारी पेशा पत्करून आपली पुस्तकें विकत घेण्याची वाचकाना भीड घालण्यात लेखकाला किती मानहानि सहन करावी लागते अमूल्य कालाचा व त्याच्या अंगातील गुणाचा कितीतरी अपव्यय होतो आपले इच्छित विचार समाजापुढें लेखनरूपानें माडावे, मोठमोठाली मननीय तत्त्वें त्यांच्यापुढें विशद करून दाखवावी, किंवा नेहेमीच्या विषयाबाहेर असलेल्या एकाद्या उपयुक्त शास्त्रीय कल्पनेची सुबोध पद्धतीनें चर्चा करावी, अशी जरी लेखकाची प्रारंभी उमेद असली तरी ग्रंथद्वारा ती तो तडीस नेऊं शकेलच अशी त्याला खात्री वाटत नाही. एकतर वाचकाच्या मर्जीविरुद्ध वागण्याचे मनोधैर्य त्यान्या अगी असावे लागतें किंवा आपले उदात्त हेतु आखडते घेऊन

---

* 'शास्त्रीय विषयावरील लेखक' याच्या ऐवजी शास्त्रीय लेखक असा शब्दप्रयोग सोईखातर केला आहे.

वाचकांची मर्जी संपादणें त्याला अवश्य वाटूं लागतें. काव्य, ललितकला. लघुकथा, नाटकें, मनोविकाराना अनेक प्रकारें चालन देणारें शाब्दिक किंवा सचित्र वाङ्मय सर्व साधारणपणें आधुनिक वाचकाच्या आवडीचें आहे. तेव्हा होतकरू लेखक जर या उपरिनिर्दिष्ट विषयाबाहेर काही लिहिण्याचा उपक्रम करील तर तो वाचकवर्गाला मुकण्याची भीति उत्पन्न होते. आधुनिक वाचक असला शास्त्रीय कचरा हातात धरूं इच्छित नाही. अशा परिस्थितीत सापडल्यावर मूळचा ध्येयवादी लेखक, द्रव्य-लोभानें किंवा शत्रु निर्माण न करण्याच्या हेतूनें आपली बरीचशी तत्त्वें व पहिली ध्येयवादी भूमिका झुगारून देऊन वाचकाच्या आहारी पडतो तो असें न करील तर फक्त त्याचें ध्येयच त्याचेजवळ शिल्लक राहील आणि शिवाय त्याच्या खिशाला खार लागेल सामाजिक, शास्त्रीय व सर्वांगीण प्रगतीच्या दृष्टीनें होनकरू लेखकाची अशी आबाळ होणें इष्ट नाही. त्याच्या हातून चागलें वाङ्मय निर्माण व्हावें म्हणून आपण योग्य ते सर्व इलाज केले पाहिजेत. लेखनव्यवसाय करण्यास लेखकांना पूर्ण मानसिक स्वास्थ्य आणि अवश्य ती फुरसद मिळवून देणें हें आपलें कर्तव्य आहे. असें झाल्याखेरीज लेखनव्यवसायाकडे कोणी लक्ष्य देणार नाही. शास्त्रीय विषया-तील लेखकाची ही स्थिति ललितकलाविषयक व इतर वाङ्मयातील लेखकाच्या स्थितीपेक्षां फारच वाईट असते, कारण त्याना मुळातच कोणी वाचक नसतात.

प्रकाशन ही वाङ्मयातील केवळ अपरिहार्य नव्हे तर अत्यत इष्ट अशी एक महत्त्वाची सस्था आहे लेखकानी वाचकाकडे जाऊन वैयक्तिक याचना करण्यापेक्षां प्रकाशकाची अवश्य मदत घ्यावी आपल्या ग्रंथाची उपयुक्तता व त्याचें वैशिष्ट्य प्रकाशकाना पटवून दिल्यावर लेखक आपलें अगिकृत कार्य तडीस नेण्यास सर्वस्वी मोकळा राहील व प्रकाशक आपल्या नेहमीच्या सरावातल्या युक्त्या लढवून गिऱ्हा-इकाच्या गळ्यात पुस्तकें बाधतील व त्याना वाचनाचें—निदान ग्रथखरेदीचें—पुण्य मिळवून देतील.

स्वतः लेखकच दारात येऊन याचना करू लागले म्हणजे कोणाला नाही म्हण-वत नाही. अशा रीतीनें केवळ भिडेखातर विकत घेतलेले ग्रंथ—कसेही असले तरी—घरोघर दृष्टीस पडतात. त्याच्या उलट कित्येक वाचनीय ग्रथ मोठमोठ्या भाषाप्रेमी, साहित्यसेवक किंवा सुखवस्तु वाचकाच्या घरी आढळत नाहीत. कारण, त्या वाच-नीय ग्रंथाच्या लेखकानी सध्याच्या पद्धत्यनुसार वाचकाचे उंबरे झिजविण्याची तसदी घेतलेली नसते। एकादा ग्रथ खरेदी करण्यालायक ठरतो तो त्याचें अंतरंग उत्तम व वाचनीय असतें म्हणून नव्हे तर त्या लेखकानें काही तरी करून गिऱ्हाइकाला गळ घातली म्हणून, असाच प्रकार बहुतेक सर्वत्र दिसतो. **लेखकाची जितकी बुद्धि ग्रंथ निर्माण करण्यांत खर्च होते त्यापेक्षां ग्रंथ विकण्यासाठीं तऱ्हतऱ्हेच्या युक्त्या योजण्यांत जास्त बुद्धि खर्ची पडते! ही परिस्थिति अतिशय हानिकारक आहे.**

अशा वेळी लेखकाला दोष देण्याची आपल्यांत प्रवृत्ति दिसून येते ज्या लेख-काला प्रकाशक मिळाला नाही त्याचे फार हाल होतात त्याचें लिखाण निरुपयोगी आहे असा समज फैलावतो. या भीतीमुळेंच कित्येक कर्तृत्ववान लेखक लेखणी उचलण्यास कचरतात. लेखकाचें दुर्दैव! अशा लेखकाचें कौशल्य वाचकांच्या दृष्टीस पडण्यास दुसरा मार्ग शिल्लक रहात नाही

ज्या लेखकाचे ग्रंथ खपू शकत नाहीत ते प्रकाशकाना दोष देतात प्रकाशकाच्या तावडीत सापडण्याची लेखकाची इच्छा नसते प्रकाशक बुडवे असतात लुटारूपणा करण्यास सापडावा म्हणून ते लेखकाला भलभलत्या अशक्य अटी घालतात मिळेल तेवढा नफा आपल्या एकट्याच्याच खिशात उतरविण्याची त्याची हावरी दृष्टि असते. मग त्यात एका बाजूनें लेखक व दुसऱ्या बाजूनें वाचक दोघेही पिळून निघाले तरी त्याची प्रकाशकाना फिकीर नसते या किंवा असल्या प्रकारच्या कित्येक तक्रारी प्रका-शकाविरुद्ध ऐकूं येतात त्यांत सत्याचा अंश कितपत आहे तें शोधण्यास स्वतंत्र (!) कमिशन नेमलें तरी समाधानकारक निकाल लागावयाचा नाही. प्रकाशक व लेखक यांचे कितीहि निकट हितसंबंध असले तरी प्रत्येकाचा दृष्टिकोन भिन्न असल्यामुळें ते बरेच वेळा अहितसंबंध असल्याचा भास होतो आपल्याकडच्या विद्यार्थी व परीक्ष-काचे परस्परसंबंध अशाच विलक्षण प्रकारचे असतात. भावनाप्रचुर विचारसरणीला फाटा देऊन सत्यसंशोधन केल्यास असें आढळून येईल की, प्रकाशकाना प्रकाशन हेंच उपजीविकेचें मुख्य साधन असतें सुदैवानें लेखकाची अशी स्थिति नसते. बहुतेक चांगले लेखक-निदान आपल्या सध्याच्या परिस्थितीतील लेखक-उदरनिर्वाहाकरिता सर्वस्वी लेखनविक्रीवर अवलंबून नाहीत अर्थात् यालाही थोडे अपवाद आहेत, परंतु पाश्चात्य देशात रूढ असलेला लेखनविक्रीचा व्यवसाय आपल्याकडे फारसा रूढ नाही. तो रूढ व्हावा अशी प्रत्येक वाङ्मयसेवकाची इच्छा आहे, परतु लोभी वृत्तीला शक्य तों जागा मिळू नये प्रकाशकाला द्रव्यलोभ असतो तसा तो लेखकालाही असणें अशक्य नाही. परतु वर सांगितलेल्या आपल्याकडील सध्याच्या परिस्थितीत वाङ्मयसेवक म्हणविणाऱ्या लेखकाला तो साजणारा नाही यानंतर पुढें केव्हा परिस्थिति बदलेल तेव्हाची गोष्ट निराळी होईल मग एकट्या प्रकाशकालाच कां दोष देण्यात येतो? लेखकाचा वाङ्मयकार्यातला दर्जा चांगला असल्यावर प्रकाशक त्याची विनाकारण छळणूक करील अशी मुळातच कल्पना करणें ज़रा धाडसाचें आहे. दोषाचें खापर प्रकाशकाच्या डोक्यावर फोडून पुष्कळ लेखक मोठ्या खुबीनें आपला बचाव करूं शकतात. पण प्रकाशकाना तें जमण्यासारखें नसतें. लेखक लिहूं शकतात. त्यांच्या स्वतंत्र विचाराना निरनिराळ्या मार्गांनी पुष्कळ प्रसिद्धि मिळते. कित्येक वेळां त्यांनी प्रकाशकावर केलेल्या आरोपाचा निषेध केला जात नाही. प्रकाशक लेखकाच्या विरुद्ध कागाळ्या कोठें करणार? आणि तो तसें करूं लागल्यास

धंद्याच्या दृष्टीनें तें हितकर होणार नाहीं. आपल्याच पायावर तो स्वतः धोंडा कां म्हणून पाडून घेईल ?

लेखकांनी मोबदला घेतल्याखेरिज आपले ग्रंथ प्रकाशकाच्या हवाली करूं नयेत म्हणजे त्याचे डोळे आपोआप उघडतील असें विधान पुष्कळ वेळां करण्यांत येतें. हें विधान अगदी सत्य आहे परतु लेखकांनीही मग वाचकांच्या घरोघर हिंडून स्वत च प्रकाशनाचा व्यापार करण्यांत आपल्या अमूल्य बुद्धीचा आणि कालाचा आपव्यय करू नये.

**ग्रंथलेखन आणि प्रकाशन या दोन्ही क्रिया अगदीं निरनिराळ्या आहेत. जो एक क्रिया उत्तम करूं शकतो तो दुसरी उत्तम करीलच असें नाहीं. ज्या देशांत वाङ्मयप्रसार जारीनें होत आहे तेथें लेखन व प्रकाशन या क्रिया परस्परापासून अलग ठेवण्यांत येतात.** आपल्याकडील लेखक स्वतःच छापखानदार आणि प्रकाशक होण्याची हाव धरतात हें शुद्ध वाङ्मयप्रेम असेलसें वाटत नाही कारण तसें असेल तर हा केवळ आत्मघातकीपणाचा व्यवहार जाणूनबजून कोण करील ?

वाङ्मयातील सर्व प्रकारच्या लेखकाची व प्रकाशकाची हकीगत अशीच आहे. त्यांतल्या त्यात शास्त्रीय वाङ्मयाची कहाणी अतिशय निराशाजनक आहे मोठमोठ्या प्रकाशकानी वाङ्मयलेखकाना योग्य प्रकारें साहाय्य करून प्रोत्साहन दिलें म्हणूनच आपल्याकडे असलेलें बरेचसें शास्त्रीय वाङ्मय प्रसिद्ध होऊ शकलें, नाहीतर त्याला हें जग दिसलें नसतें

## ( ६ ) ब
## वाचक

योग्य प्रकारें वाङ्मयवृद्धि करण्याची जबाबदारी लेखक व प्रकाशक यावर ज्या प्रमाणात असते त्याच प्रमाणात ती वाचकावरही असते लघुकथा, नाटकें, काव्यें, निर्भीड टीकात्मक स्फुटें शेंकड्यावारी लिहिली जातात आणि हजारावारी खपतात. असल्या प्रकारच्या लेखकाना प्रकाशक सापडतात आणि त्या प्रकाशकाना वाचकाची उणीव भासत नसावीसें वाटतें. वाचकाचा गिन्हाईक हा गुणधर्म या वाङ्मयप्रगतीच्या बुडाशी असावा वाचकाच्या मनाचा वाङ्मयद्वारा विकास करण्याची कल्पना मुळात असेलही, परतु व्यापारी दृष्टीला तिच्याशी काहीएक कर्तव्य नसावेसें दिसतें. शाळेची फी देण्यास जवळ दिडक्या नसल्या, किंवा घरी दूधवाल्याची बाकी थकली, तरी दरएक नाक्यावर प्रसिद्धी ( विक्री ) करिता माडलेल्या चटोर गोष्टी, कलेच्या नावाखाली विकली जाणारी शृंगारिक चित्रें, व इतर आधुनिक वाङ्मय (!) खरेदी करण्यांत गरीब विद्यार्थ्याची किंवा कामाच्या ओझ्याखाली दडपलेल्या सुशिक्षित कारकुनाची कसलीच हरकत येत नाही. अशा चमत्कारिक परिस्थितीत स्वतःचें

वाङ्मय लोभीपणानें व प्रकाशकाचें साहाय्य न घेतल्यामुळें खपत नसलें म्हणजे वाचकांच्या ओसरलेल्या ज्ञानलालसेवर व त्यांच्या चिक्कूपणावर टीका करण्यास बऱ्याच लेखक–प्रकाशकाना सोपी संधि मिळते. द्रव्याच्या अभावामुळें गरिब व द्रव्यलोभामुळें श्रीमान वाचक होत नाहीत असे आरोप नेहमी चालावयाचेच. पण याच्या मुळाशी काय कारण असेल त्याचा कोणी स्वतंत्रपणें शोध केल्यास 'स्वार्थ' हेंच कारण बरेच वेळां दिसून येईल मात्र त्या स्वार्थानें वाङ्मयाचा सुंदर पेहेराव केलेला असतो. ग्रंथांच्या अंतरंगाशी आणि वाचकाच्या मानसिक उन्नतीशी याचा कोठेंच संबंध येत नाही काय ?

लेखक, प्रकाशक व वाचक हे तिघे त्रिकोणाच्या तीन कोंपऱ्यावर बसून एकमेकांवर संशयग्रस्त नजरेनें आरोप करीत राहतील तोंवर वाङ्मयवृद्धीत–अर्थात् योग्य प्रकारच्या वाङ्मयवृद्धीत–फारशी वाढ होऊ शकणार नाही. आपापले संशय बाजूला सारून सर्वजण जुटीनें व सात्विक प्रेरणेनें हालचाल करू लागतील तर आधुनिक वाङ्मयाचा कोचदारपणा जाऊन त्याचा वर्तुळाकार अमर्याद विस्तार होईल **प्रत्येक सुशिक्षित म्हणविणाऱ्या व्यक्तीनें आपल्याला परवडेल तेवढें वाङ्मय खरेदी करून आपल्या संग्रहीं ठेवावें, म्हणजे लेखकांना व प्रकाशकांना खरें प्रोत्साहन मिळेल.**

पुष्कळ वेळा आधुनिक पिढीला वाचनाची हौसच राहिली नाही असा सरसकट आरोप करण्यात येतो परतु तोही दिसतो तितका खरा नाही. सध्यांच्या पिढीला कसल्याच प्रकारच्या वाचनाची हौस नाही असा एकजात आक्षेप न घेता, फक्त उच्च दर्जाचे व ज्यामुळे मानसिक प्रगतीला मदत होईल असें वाङ्मय वाचण्याची ह्या पिढीला हौस वाटत नाही, असा मर्यादित आक्षेप घेतल्यास तो गैरवाजवी दिसणार नाही पाश्चात्य देशात हरतऱ्हेची पुस्तकें विकत घेऊन वाचण्याची पद्धति सर्वसामान्य असल्यामुळेच तिकडे पुस्तकाचा एवढा खप होतो, व अनेक नियतकालिकें चालूं शकतात. शास्त्रीय साहित्याची वाढ करण्याची जबाबदारी होतकरू व अनुभवी लेखक आणि धाडशी व अभूदार प्रकाशक याच्यावर आहे, त्याप्रमाणेंच ती हौशी वाचकवर्गावरही आहे ही गोष्ट दृष्टीआड करण्यासारखी नाही शास्त्रीय विषयाला वाहिलेल्या पुस्तकांचा व नियतकालिकाचा खप अधिक होईल तरच लेखकाना व प्रकाशकाना उत्तेजन मिळेल ग्राहक बनून ग्रथप्रसाराला मदत करणे हें आपल्या मातृभाषेसबधी पवित्र कर्तव्य आहे अशी साक्ष प्रत्येक वाचकाला पटली पाहिजे. प्रकाशकानीही योग्य तेच ग्रंथ प्रसिद्ध करावे, म्हणजे वाचकाची दिशाभूल होणार नाही.

शास्त्राय ग्रंथ मराठीत झालेले नाहीत म्हणून ते आम्ही आमच्या मुलांना वाचण्यास देऊं शकत नाही असे म्हणणारे काही भाषाप्रेमी व शास्त्रप्रेमी आढळतात, तर आमच्या मुलाना हायस्कूलमध्यें गेल्यानंतर इंग्रजी भाषेवर पुरेसें प्रभुत्व मिळालें म्हणजे

सर्व शास्त्रीय विषय आपोआपच इंग्रजी पुस्तकांतून वाचावयास मिळतील असें सांगणारे शिक्षणप्रेमी पुष्कळ सापडतात मराठी भाषेंत योग्य प्रकारचें शास्त्रीय वाङ्मय उत्पन्न होऊन त्याची सतत वाढ होण्यास ह्या दोन्ही प्रकारच्या विचारसरणी निरुपयोगी ठरतात, असें खेदानें म्हणावें लागतें

लेखक, प्रकाशक आणि वाचक या त्रयींत पहिल्या दोघाचा एकमेकांशी निकट संबंध येतो परतु त्याचे हितसबंध पुष्कळ प्रमाणात परस्परविरोधी असतात. तिसऱ्याची तशी स्थिति नाही वाचकवर्गाला, त्यानें मनात आणल्यास, त्रिकोणी मर्यादेंतून सुटून जाऊन स्वतत्रपणें वाङ्मयक्षेत्रात कोठेंही उभें राहणें शक्य आहे त्याच्या मर्जीला लागेल तो ग्रंथरूपी माल विकत घेण्याची त्याची परिस्थिति हेवा वाटण्यासारखी असते. वाचकाच्या भिन्न इच्छा तृप्त करण्यासाठी वाटेल तें करण्याची पुष्कळ लेखकाची व प्रकाशकाचा अहमहमिका लागलेली आपण सद्यःस्थितीत पाहात आहोंत. पण त्याचा परिणाम काय होतो तो पहा.

## ( ६ ) क

## वाङ्मयाची एकांगी वाढ

वाचक एका बाजूला, लेखक–प्रकाशक दुसऱ्या बाजूला आणि शिक्षणकार्य व वाङ्मयसेवा हें दुहेरी ध्येय नजरेसमोर, अशा विलक्षण त्रिधारी पेचात सापडल्यामुळें शास्त्रीय लेखकाची मोठी अडवणूक होते होतकरू लेखकाना प्रथम हौस असते. प्रकाशक, कधी आढेवेढे घेत तर कधी उत्साहानें, त्याचे लेख स्वीकारून प्रसिद्ध करतात पण बहुतेक सुशिक्षित आणि वाङ्मयप्रेमी वाचक त्या लेखाना स्पर्श करित नाहीत किंवा त्यांच्याकडे सहानुभूतीनें बघत नाहीत ज्याला दहा मुलें आहेत त्यानें एकाद्याकडे तितक्या कौतुकपूर्ण नजरेनें पाहिलें नाही तर त्याचें वर्तन अमानुष वाटणार नाही, परंतु आपल्या अल्पशा मराठी वाङ्मयात शास्त्रीय वाचनीय ग्रथ किंवा नियतकालिकें अगदी दुर्मिळ. त्यात एकादें वाङ्मयरूपी मूल मोठ्या मेहनतीनें पुढें येण्याची हाव धरील तर त्याबद्दलही वाचकाला कौतुक वाटू नये ! शास्त्रीय विषयाबद्दल त्याचें मन विटलेलें असतें. **ज्यावर आपलें आधुनिक सामाजिक जीवन सर्वस्वीं अवलंबून आहे त्या शास्त्रीय ज्ञानामृताची वाचकवर्गाकडून अशा प्रकारे होणारी हेटाळणी फार खेदप्रद वाटते.** आणि हें शास्त्रीय ज्ञानाचें अमृतमंथन करण्यासाठी लेखकाला किती सायास पडलेले असतात ! लेखन मराठींत केलेलें असतें हेंच वाचकाच्या तिरस्काराचें कारण असेल काय ? खरें असल्यास मातृभाषेची निःसंशय अवहेलना होत आहे.

चौरंगी सामन्याचा देखावा पाहण्यात, निदान निकाल ऐकण्यात, सुंदर "तारका"ची चित्रें व चरित्रें संग्रही बाळगण्यांत, शास्त्रीय शारीरिक शिक्षणाच्या नांवाखाली शृंगाररस परिपोषक चोपड्या हस्तगत करून घेण्यात, सज्जनांची कुत्सितपणें नालस्ती

करणारी स्वतंत्र बाण्याची वर्तमानपत्रें पुनः पुनः वाचण्यांत-मग तें वाङ्मय खरेदी करण्यासाठी बराच खर्च पडला तरी-आधुनिक वाचकवर्ग फार उत्सुक असतो परंतु कांही विषयात तो पूर्ण उदासीन असतो हिंदी राज्यव्यवस्थेतील नवीन घटनेबद्दल जॉइट पार्लमेंटरी कमिटीने आपल्या रिपोर्टात काय सूचना केल्या आहेत, किंवा सभों-वताली विषमज्वराची साथ पसरत असता तिचा प्रतिकार करण्यासाठी कोणचे उपाय योजिता येतील ते नीटपणे समजावून घेण्यात सध्याच्या तरुण पिढीला फारच थोडा उत्साह वाटतो.

शुद्ध ललित वाङ्मयाचा जर कोणी मोठ्या मनोभावानें पुरस्कार करीत नाहीं, तर नीरस वाटणाऱ्या शास्त्रीय वाङ्मयमार्गात इच्छेविरुद्ध लाबवर नजर टाकण्याची कोण तसदी घेतो ? त्यात तात्कालिक फायदा किंवा इंद्रियसुख काहीच नसते.

वाङ्मयवृद्धीच्या व शास्त्रीय प्रगतीच्या बाबतीत आधुनिक तरुणपिढी किती निरुत्साही बनत चालली आहे याची साधारण कल्पना येण्यासाठीं आणि माझ्यावर अतिशयोक्ति केल्याचा आरोप होऊ नये म्हणून दोन "सत्यकथा" सागाव्याशा वाट-तात. केवळ तुटक उदाहरणें देऊन कोणचीही गोष्ट पूर्णपणे सिद्ध करून दाखविणें अशास्त्रीय असतें, हें मला माहीत आहे. आधुनिक शैक्षणिक व सामाजिक परि-स्थिति किती निराशाजनक आहे व शास्त्रीय वाङमयवृद्धीला केवढाले अडथळे येतात याचा आपणाला अदाज यावा म्हणूनच उदाहरणे देत आहें. त्यात व्यक्तीचा उप-मर्द करण्याचा माझा हेतु नाही.

१ ज्या संस्थेंत मी अध्यापकाचे काम करतों ती सर्वस्वी शास्त्रीय शिक्ष-णाला वाहिलेली आहे तेथील निम्यापेक्षा जास्त विद्यार्थीगण महाराष्ट्रीय व मोठा बुद्धिवान् आहे बहुतेक प्रत्येक कॉलेजात एक महाराष्ट्र वाङ्मयमंडळ असते तसे आमच्याकडेही स्थापन करावें अशी आमच्या येथील विद्यार्थ्यांना साहजिकच इच्छा झाली व या बाबतीत काय करता येईल असा त्यानी माझा सल्ला घेतला केवळ शास्त्रीय विषयाचा आबालवृद्धात प्रसार करण्यासाठी चालविलेल्या मासिकातून लेखन-द्वारा तुम्ही उत्तमप्रकारें वाङ्मयसेवा करू शकाल असे माझे मत मी त्याना सांगितलें. पण ते त्याना रुचलें नाही. निरनिराळ्या दर्जाच्या लहानमोठ्या देशबाधवासाठीं सोप्या मनोरंजक भाषेत उपयुक्त शास्त्रीय विषयाची माहिती करून देण्याच्या इराद्यानें लेख तयार केल्यानें आमच्या शास्त्रीय विद्यालयातील विद्यार्थ्यांना जितकी उत्तम काम-गिरी करता येईल तितकी इतरासारखें नुसते वाङ्मयमंडळ काढून जमणार नाही. शिवाय ज्याना पुढे शिक्षक, आणि प्रागतिक समाजसेवक होण्याची इच्छा असते त्याना ही उत्तम पूर्वतयारी होऊन विशेष फायदा होईल पण वस्तुस्थिति निराळीच आहे. **शास्त्रीय शिक्षण संस्थेतील विद्यार्थीवर्गाला शास्त्रीयविषयप्रसाराचें उत्कृष्ट साधन जें लेखनचातुर्य तें अवगत करून घेण्यांत हौस वाटत नाहीं.**

मंडळ स्थापून सभा, संमेलनें अथवा जलसे करणें सुखावह असतें आणि शास्त्रीय विषयाचा गाढ अभ्यास करून आपल्या बांधवासाठी वाङ्मय तयार करण्यांत सक्रिय सहानुभूति दाखविणें मेहनतीचें वाटतें, असेंही असण्याचा संभव आहे। माझ्या मतें लेखनव्यवसायाबद्दल अनास्था हेंच मुख्य कारण असावें.

९. हिंदुस्थानातील एका प्रचंड उद्योगधंद्याच्या गांवी आपले महाराष्ट्रीय पुष्कळ आहेत, आणि त्यानी तेथें एक महाराष्ट्रमडळ चालविलें आहे तेथील कित्येक तरुण कारखान्यातील तज्ज्ञ आणि वाकबगार आहेत. त्याना असलेली कारखान्यासंबंधीची शास्त्रीय माहिती त्यानी आपल्या इतर महाराष्ट्रबंधूंना वेळोवेळी करून दिली तर ती निःसंशय अमूल्य होईल. एकदां मी त्या गावी गेलों असता तेथील मंडळानें माझा मोठा गौरव केला व नेहमीच्या रिवाजाप्रमाणें देणगीची विनति केली अर्थात् मी एका अटीवर कबूल झालों. शास्त्रीय विषयाच्या प्रचारासाठी आपल्याइकडे चाललेल्या मासिकांकरिता तेथील महाराष्ट्रीय विद्वानानी निदान पाच शास्त्रीय बालबोध लेख लिहावे व प्रत्येक लेख प्रसिद्ध झाला म्हणजे तेथील महाराष्ट्र मंडळाला माझी एकरचमाश देणगी मिळावी. वरील गोष्ट घडल्याला पुष्कळ वर्षे लोटली परतु अद्यापि एकही लेख मासिकात प्रसिद्धीसाठी आला नाही हें सागण्यात मला अतिशय दुःख होत आहे.

शिक्षणसंस्थेतील विद्यार्थी व शिक्षक याना लेखनकलेचा अभ्यास व व्यवसाय करावयास नको उद्योगधंद्यात पडलेल्या तज्ज्ञाना आपल्या शास्त्रीय अनुभवाचा फायदा इतर बाधवाना देण्यात काही उत्साह वाटत नाही अतिशय निराशामय परिस्थितीत आपण गुरफटलो आहों. काही लेखकानी व '**उद्यमा**' सारख्या प्रकाशकानीं यांतूनही क्वचित् वर मान करून उपयुक्त शास्त्रीय वाङ्मयनिर्मितीकरिता थोडी हालचाल केली असता त्याचें अभिनदन आपण मनःपूर्वक करणे जरूर आहे.

लेखक आपल्या अधिकाराबाहेर लिहितात, प्रकाशक त्याच त्याच विषयाला वाहिलेली निरनिराळी पुस्तकें किंवा नियतकालिकें प्रसिद्ध करून धद्यात-वाङ्मयात-विनाकारण चढाओढ सुरू करून दुसऱ्याचे मार्गात अडथळे आणतात, किंवा स्वतःच्याच पायावर धोंडा पाडून घेतात वाचक भलत्याच वाङ्मयाला प्रमाणाबाहेर उत्तेजन देतात. या प्रकारचे अनेक ठळक दोष आहेत, परतु याला उपाय काय? उपाय एकच आणि तोही आपल्याच हातात आहे. काही झाले तरी योग्य शास्त्रीय वाङ्मय निर्माण करणें आपलें कर्तव्य आहे व आपण तें उत्साहानें आणि निरपेक्ष बुद्धीनें करीत राहिलें पाहिजे हाच तो उपाय!

## ( ६ ) ड

## सुबोध शास्त्रीय प्रकाशन.

शास्त्रीय वाङ्मयाची व त्याच्या प्रकाशनाची परिस्थिति आतांपर्यंत निवेदन केली. प्रसारासाठी एक उपायही सुचविला. ललित वाङ्मयाची आता प्रगति झाली

आहे. वाचक तें मुद्दाम हौसेनें विकत घेतात. शास्त्रीय वाङ्मयप्रचाराला कांहीं प्रेरणा मिळाली तर फायदेशीर होईल.

एकंदर शास्त्रीय वाङ्मय बऱ्याच प्रकारचें असतें:

१. **शालोपयोगी वाङ्मय** अगोदर बरेंचसें अस्तित्वात आहे आणि नवें तयार होत आहे. लेखकाना व प्रकाशकाना या वाङ्मयात बिनधोक द्रव्यलाभ होण्यासारखा असतो. त्याला निराळे प्रोत्साहन देण्याची जरूरी नाही.

२. शास्त्रीय **पारिभाषिक कोश** करण्यासाठी निरनिराळ्या संस्थांनी अगोदरच तयारी ठेवली आहे. वाङ्मय अस्तित्वात नसलें तरी शब्दकोशाची वाण पडणार नाहीं।

३ केवळ तज्ज्ञासाठी लिहिलेलें **उच्च वाङ्मय**, रासायनिक कारखानदारासाठी लिहिलेली विशेष पत्रकें, खास शेतकऱ्याकरिता अनुभवी संशोधकानी लिहिलेले प्रमाणग्रंथ, हे वाङ्मयाचे प्रकार खास व निवडक लोकाकरताच असतात.

४. **सुबोध शास्त्रीय वाङ्मय.** हा अत्यत महत्त्वाचा भाग असून त्याकडे अजूनपर्यंत फारच थोड्या व्यक्तींचें लक्ष्य गेलें आहे या वाङ्मयाला फार मोठा वाचकवर्ग मिळू शकेल, परतु असलें वाङ्मय अस्तित्वातच नाही तेव्हा खरोखर तें कितपत उपयुक्त होतें याचा अदाज करता येत नाही. असल्या वाङ्मयाचा प्रसार करण्यासाठीं निरनिराळी कमी किमतीची पुस्तकें, माला, नियतकालिकें शहरात आणि खेड्यापाड्यात घरोघर दिसू लागली पाहिजेत त्याची भाषा साधी असून माडणी मनोरंजक असावी त्यात परिभाषेला स्थान नसावें असला दीर्घ उद्योग सिद्धीस जाण्यास लायक विद्वानाचा व संस्थाचा पाठिबा पाहिजे पैशाचें बळ अतिशय मोठ्या प्रमाणात लागेल. विश्वविद्यालयाची उदासीनता गेली तर ही अडचण बऱ्याच प्रमाणात नाहीशी होईल. परतु तोंवर निराळाच मार्ग काढावा लागेल वर सांगितलेलें चवथ्या प्रकारचें शास्त्रीय वाङ्मय प्रसार करण्याचें कार्य साहित्य परिषदेला करता येण्यासारखें आहे. अधिकार आणि द्रव्य या दोन्ही गोष्टी परिषदेजवळ आहेत. मराठीतील शास्त्रीय विषयाव्यतिरिक्त वाङ्मयाची वाढ स्वतत्रपणें जोराने चालू आहे. त्याचप्रमाणे शास्त्रीय विषयातील आताच दर्शविलेल्या पहिल्या तीन प्रकारच्या वाङ्मयवृद्धीसाठी विशेष खंत बाळगण्याचें कारण नाही. शेवटचा बालबोध वाङ्मयाचा प्रकार विशेष आश्रयाच्या अभावीं कधीच जोरात येणार नाही. आपल्या चार मुलापैकी तीन मोठी, सुशिक्षित आणि मिळवती झाली म्हणजे आपण फक्त धाकट्याचीच डोळ्यात तेल घालून जोपासना करतों. बाकींच्यात थोडाफार हलगरजीपणा झाला तरी ते आपलें संरक्षण करण्यास समर्थ असतात परंतु अगदी लहान बालकाला हातात धरूनच न्यावें लागतें. असल्या प्रकाराला कोणी लाड करणें म्हणेल परतु इतर भावंडें दक्ष असताना एकाचे अवास्तव लाड होणेंच संभवत नाहीं.

**प्रचलित मराठी वर्तमानपत्रांत शास्त्रीय विषयांना मुळींच स्थान असतें. असलें तरी केवळ अपवाद टाळण्यासाठींच. आधुनिक जीवन शास्त्रीय प्रगतीशीं अगदीं निगडित झालेलें आहे, तरी सामाजिक आणि राजकीय प्रभाव्यतिरिक्त दुसऱ्या वाङ्मयास, विशेषतः शास्त्रीय वाङ्मयास, कोणी महत्त्व देत नाहींत.** अर्थात् अशा परिस्थितीची कारणें पुष्कळ आहेत पहिलें, असल्या वाङ्मयाला खप नाही. दुसरें, शुद्ध व बालबोध भाषेंत शास्त्रीय रहस्यें उलगडून दाखविणाऱ्या लेखकाची संख्या अगदी अपुरी पडते.

थोडीशी झिज सोसून दैनिक किंवा साप्ताहिक वृत्तपत्रांना ही गोष्ट अशक्य नाहीं. त्यासाठी त्याचा दृष्टिकोन बदलला पाहिजे शास्त्रिय बाबतीत लोकशिक्षिण देण्याचें त्यांचें कार्यक्षेत्र फारच विस्तीर्ण असल्यामुळें त्यांनी या बाबतींत पुढाकार घेण्यासारखी परिस्थिति आहे. त्यांना खात्रीनें यश येईल खेड्यापाड्यातल्या माणसांना सुद्धा या मार्गानें हळू हळू शास्त्रीय ज्ञानामृत पाजता येईल.

## ( ७ )

## सारांश

( १ ) शास्त्रीय वाङ्मयाच्या वाढीस मातृभाषा हीच बोधभाषा असणें अत्यावश्यक आहे

( २ ) शंभर वर्षांतलि मराठी शास्त्रीय वाङ्मयाचा इतिहासच वरील मुद्याचें पुष्टीकरण करू शकतो सर्व प्रकारचे शास्त्रीय विषय सुंदर मराठींत लिहिता येतात, मात्र लेखक साजेसा, अनुभवी आणि हौशी असला पाहिजे दिवसेंदिवस शास्त्र वाढत आहे, परतु लेखनवृद्धि व वाङ्मयप्रसार या प्रगतीच्या मुख्य अंगाकडे दुर्लक्ष्य होत आहे. प्रमाण ग्रंथ व सुबोध ग्रंथ या दोहोंची उणीव फार तीव्रतेनें भासते शालोपयोगी वाङ्मय थोडें थोडें तयार होत आहे शास्त्रीय विषयाचा प्रचार करणाऱ्या ज्ञानप्रसारक संस्था आजमितीला अस्तित्वात नाहींत एक दोन नियतकालिकें प्रयत्न करीत आहेत, परंतु सर्वसाधारण माणसाची शास्त्रीय ज्ञानाची भूक येवढ्याशा सामुग्रीनें कशी भागणार ?

( ३ ) विश्वविद्यालयात मराठीला बोधभाषेचा मान मिळलाच पाहिजे. तोंपर्यंत शास्त्रीय विषयांतील प्रगतीच्या कल्पना नुसती मनोराज्यें ठरतलि जोंपर्यंत असे झालें नाही तोंपर्यंत अध्यापकवर्ग व प्रौढ शिष्यवर्ग दोघेही शास्त्रीय ज्ञानप्रसाराच्या पवित्र कार्यांत उदासीन राहणार आणि सर्वसाधारण माणसाची व संबंध महाराष्ट्राची त्या मार्गानें अतिशय हानि होत राहील यात शंका नाही.

( ४ ) शास्त्रीय वाङ्मयात परिभाषा अवश्य असली तरी त्याच्या कित्येक प्रकारात ती अपरिहार्य नाही. उत्तम लेखक आपले विचार समजावून देण्यासाठी मनोरंजक पद्धतीचें अवलंबन करून परिभाषा टाळण्याचाच प्रयत्न करील असें झालें तरच शास्त्रीय विषयांतील लोकशिक्षण नीटपणें तडीस जाण्याचा संभव आहे. आजमितीस परिभाषा कोश रचनेला विशेष महत्त्व देण्यात येतें. कुंपण दिसूं लागायच्या अगोदरच उडी मारण्याचा हा प्रयत्न लांब ठेवून संघशक्तीचा उपयोग सुबोध वाङ्मयप्रचार जोरानें करण्याकडे करावा

( ५ ) उच्च दर्जाच्या प्रमाण वाङ्मयासाठी परिभाषा अवश्य वाटते तेव्हां तिच्या रचनेसंबधी काही महत्त्वाच्या सूचना केल्या आहेत त्यात भावनेपेक्षा उपयुक्ततेकडे विशेष लक्ष दिलें आहे.

( ६ ) शास्त्रीय लेखन, प्रकाशन व वाचन या त्रयीच परस्परसंबध कितीही निकट आणि विरोधी असले तरी त्रयीतील प्रत्येक व्यक्तीनें स्वतंत्रपणें सामुदायिक हितासाठी काय करता येण्यासारखें आहे त्याची रूपरेषा दाखविली आहे

( ७ ) समाजातील सर्वसाधारण व्यक्तीचे शास्त्रीय ज्ञान वाढविण्याची बरीचशी जबाबदारी वृत्तपत्रकारावर पडते, तेव्हा त्यानी तात्कालिक फायद्याकडेच नजर देऊन आपलें कर्तव्य करण्यात दिरंगाई करूं नये योग्य लेखकाची त्यांना अतिशय अडचण भासेल परंतु परिश्रमाने तीही नाहीशी होण्यासारखी आहे. आधुनिक शास्त्रीय विषयाचे शिक्षक व विद्यार्थ्यांची नवी पिढी यांनी अभ्यास करण्याचें मनात आणल्यास त्याच्याच हातून लेखनकार्य उत्तम होऊ शकेल.

( ८ ) तरूण पिढीची लेखन-वाचनाची सध्याची दिशा बदलली पाहिजे. तीत गंभीरपणा मुळीच राहिला नाही. तात्पुरत्या सुखाकरता तरूण पिढी सर्व शास्त्रीय प्रगतीला हरताळ फासीत आहे. हा मार्ग सोडला तरच शास्त्रीय वाङ्मय वाढीला लागेल व देशाची खरी औद्योगिक आणि सांपत्तिक सुधारणा होईल. केवळ ललितकलात्मक एकांगी वाङ्मय या कामीं खास उपयोगी पडणार नाही.

( ९ ) बालबोध शास्त्रीय वाङ्मयवृद्धीकडेच सर्वांनी प्रथमत: जास्त लक्ष्य पुरविल्याशिवाय त्याची केव्हाही वाढ होणार नाही. धनिकांनीं द्रव्यसाहाय्य, विद्वानानीं सक्रिय सहानुभूति, देशबांधवानीं आश्रय आणि सर्वांनी मंगलाशिर्वाद दिल्याखेरीज शास्त्रीय वाङ्मयाची धडगत नाहा.

( १० ) परिषदा, सभा, मंडळें यांत शास्त्रीय विषयाना स्वतंत्र जागा मिळूं लागली हें चिन्ह आशाजनक आहे. त्यामुळें शास्त्रीय वाङ्मयवृक्ष सशक्त व जोमदार होऊन देशाची हीन अवस्था दूर करण्यास लायक असा कल्पतरु तो बनेल अशी उमेद वाटते.

( ८ )

आता एकच काम राहिलें, आणि तें करण्यात मला फार आनंद वाटत आहे. आपल्या आज्ञेला मान देऊन मी आज माझे विचार विशेष स्पष्टपणें आपल्यापुढें ठेवले आहेत. आपली कृपा झाल्यामुळेंच हें शक्य झालें

परिषदेच्या यापुढच्या कामांत आपण मला योग्य तें सहाय्य कराल अशी खात्री आहे म्हणून मी आतांच आपले मनःपूर्वक आभार मानतों.

---

श्री.

# मराठी साहित्य संमेलन, बडोदें.

## अधिवेशन १९ वें,

---

सन १९३४.

---

विभाग :

तत्त्वज्ञान आणि समाजशास्त्र

अध्यक्ष

## श्री. विठ्ठल रामजी शिंदे

## यांचें भाषण.

---

**सन्मान्य अध्यक्ष व थोर सभाजन हो,**

तत्त्वज्ञान व समाजशास्त्र ह्या दोन विषयाचा प्रस्तुत संमेलनाच्या चालकानीं हा जो एक विभाग कल्पिला आहे, त्या दोन्ही विषयावर मराठीत स्वतंत्र वाङ्मय फारच थोडे, किंबहुना गणनेत घेण्याइतके नाहीं म्हटले तरी चालेल, इतकें अल्प आहे समाजशास्त्रावर अगदी अलीकडे जे थोडे वाङ्मय होऊं लागले आहे ते अद्यापि बाल्यावस्थेच आहे तत्त्वज्ञानात आमच्या देशाचा दर्जा फारच उच्च, जवळजवळ पहिला म्हटला तरी चालेल, पण तो काळ मागचा चालू कोणत्याहि प्राकृत भाषातून त्या मूळ तात्त्विक ग्रंथावर नुमती भाष्ये व रुपातरें झालीं आहेत अद्याप तोच प्रकार चालू आहे. भरती नाही या भाष्याची प्रथा प्रत्यक्ष तत्त्वसिद्धाताचे मेरुमणी आद्य शंकराचार्य यानींच घालून दिली ही त्यातल्यात्यात मोठी आश्चर्याची गोष्ट ! स्वामी रामतीर्थ या आधुनिक द्रष्ट्याने या प्रथेबद्दल आद्य-शंकराचार्याचा निषेध सौम्य भाषेत का होईना पण धैर्याने केला आहे, पहिल्या आचार्यानीच असे केल्यामुळे त्यानतरच्या संस्कृत आचार्यानी व चालू भाषेतून ग्रंथ लिहणाऱ्या ज्ञानेश्वर एकनाथ इत्यादि तत्त्ववेत्त्याना आपल्या लिखाणांतून हाच गौण मार्ग पत्करवा लागला आहे पुढे पुढे तर एका गीतेच्या घाण्याभोवती समग्र मराठी तात्त्विक विचारचक्र फिरूं लागले ज्ञानेश्वराची भावार्थगीता ह्या भाष्यात केवल भक्तीचेच स्तोत्र माजविले आहे, गीतेची खरी अर्थसिद्धि झाली नाही असा जोराचा आक्षेप घेणाऱ्या वामन पंडितानें तरी आपल्या यथार्थ दीपिकेत अव्यभिचरित कृष्णभक्तीच्याबाहेर फारसा स्वतंत्र ज्ञानमार्ग शोधला काय ? त्यानंतर लोकमान्यानी कर्मयोग चोखळला तो तरी गीतेतच गुरफटून मूळ गीताच आधी एक स्वतत्र दृष्टि नसून तो एक दृष्टिसमन्वयाचा प्रयत्न आहे. तिचा अर्थ सरळ व सोपा असूनही मागून झालेल्या पडितानी व आचार्यानी अर्थवादाचे भारुढ मात्र माजविले, नव्हे तर काय ? ह्या भारुढाचे महत्व फार आहे हे मी आदरपूर्वक कबूल करतो पण ते वाङ्मय दृष्टीने आहे तत्त्वज्ञानाच्या दृष्टीने, स्वतत्र विचारनिर्मिति नाही असेच म्हणावे लागते, अमृतानुभवासारखे काहीं ग्रंथ आहेत पण ते प्रत्यक्ष भाष्य नसले तरी जुन्या दृष्टीचे अनुवादच ठरतात

## साक्षात्कारी वाङ्मय

येथवर थोडक्यात विचार झाला मराठीतील स्वतंत्र विचाराचा किंवा मूळग्रंथनिर्मितीचा, पण यावरून जवळजवळ एकहजार वर्षांच्या मराठी वाङ्मयाने

अगर महाराष्ट्राच्या प्रामादिक वाग्भक्तानी महाराष्ट्राच्या मानसिक भांडवलात काहीच भरीव शिल्लक टाकली नाही असे म्हणण्याला मात्र मी तयार नाहीं. पण ह्या मुद्द्यावर अधिक चर्चा करण्यापूर्वी मानसिक भांडवल आणि तत्त्वज्ञान ह्मणजेच काय त्याचे किंचित स्पष्टीकरण होणे अवश्य आहे.

द्वे विद्ये वेदितव्ये इति ह स्म
यद्ब्रह्मविदो वदन्ति परा चैवापराच ॥ ४ ॥
तत्रपरा ऋग्वेदो यजुर्वेद सामवेदोऽथर्ववेद शिक्षा
कल्प व्याकरण निरुक्त छन्दो ज्योतिषमिति ॥
अथ परा यया तदक्षरमधिगम्यते ॥ ५ ॥

मुडकोपनिष्पद्–१ मुडक १ खड

वरील उताऱ्यावरून अस्सल तत्त्वज्ञानाची गणना श्रौतवाङ्मयात देखील होत नसे असें दिसते पराविद्या उर्फ तत्त्वज्ञान हे अतिवाङ्मय असते हेच खरें।

यतो वाचो निवर्तते अप्राप्यमनसासह। असे प्रत्यक्ष ब्रम्हतत्त्वाचे लक्षण प्रसिद्धच आहे त्या तत्त्वाचे ज्ञानही अतिवाक् आहे असे मुंडकोपनिषद् म्हणते पण तें ज्ञान अतिमानस आहे असें मुडक म्हणत नाही ते शब्दज्ञानाचें पलीकडे असले तरी मानवी हृदय आणि सकल्प याच्यापलीकडे नाही. ते साक्षात्कारगम्य आहे हे खास.

मनोवाचातीत तुझे हे स्वरुप।
म्हणूनि माप भक्ति केली ॥ १ ॥

भक्तिचिया मापे मोजितो अनंता।
इतराने तत्त्वता न मोजवे ॥ २ ॥

या उद्गारांत तुकारामानें साक्षात्काराचे वर्णन केले आहे. टाळ कुटणारे म्हणून ज्या वारकऱ्याची निंदा होते–आणि अशा निंदकामध्येच वामनपंडित, सारख्या धेंडाचीहि भर पडत आली आहे–त्या साक्षात्कारी काहीं टाळकुट्यानीं महाराष्ट्राच्या मानसिक भांडवलातच नव्हे तर इतर पुरुषार्थामध्येही जी भर टाकली आहे ती पंडितंमन्य शाब्दिकाच्या हातून झाली नाही, ह्या भाविकाच्या अमूल्य कारागिरीची गणना तत्त्वज्ञानाच्या काव्यवाङ्मयांतच करणे जरूर आहे.

## आधुनिक रुपांतरें

इतके सांगितल्यावर महाराष्ट्रीय आधुनिक मानसिक भांडवलाचा ठाव घेऊं या प्रत्येक वेळीं प्रत्येक देशीं स्वतंत्रच विचार चालू असतात, किंबहुना असावयाला पाहिजे असे नाहीं पृथ्वीचे पाठीवर केव्हांना केव्हा कोठेना कोठे तरी स्वतंत्र विचार, स्वतंत्र काव्य आणि स्वतंत्र कृति चालू असतेच. वाहतुक आणि दळणवळणाचीं साधनें असतील त्या मानानें ह्या स्वतंत्र पैदाशीचे स्थलांतर आणि कालांतर भाषांतराचे व रुपांतराचे द्वारें होणारच. ह्या न्यायानें पाहतां मध्ययुगीन इस्लामी संस्कृतीचें संकर्षणानें महाराष्ट्राच्या आचाराविचारावर जो परिणाम झाला, त्याच्या शतपट परिणाम प्रस्तुत पाश्चात्यसंस्कृतीचा झाला आहे, व ह्याहून पुढे अधिकच होणार. पाश्चात्य देशांत भौतिक शोध आणि आधुनिक विज्ञानाच्या प्रगतीमुळे प्रत्यक्ष धर्माच्या निष्ठास्थानावर हल्ले चढून त्याची शिखरें आणि गाभारे डळमळूं लागली तो चित्कंप सर्व सुसंस्कृत जगाला अद्यापि भोवत आहे. ह्यातून प्रागतिक महाराष्ट्रच तेवढा कसा अलग राहणार ? मुंबई विश्वविद्यालय सुरू होऊन एक पिढी उलटते न उलटते तोंच डार्विन सारखे शोधक आणि स्पेन्सर सारखे तार्किक ह्यांच्या विचारांनी तत्कालीन महाराष्ट्रीय लेखकांना व वाचकांना भारून टाकलें. आम्ही कॉलेजांत जाण्यापूर्वीच मराठी वाङ्मयावर ह्या नूतन पाश्चात्य विचाराची, भाषांतराच्या आणि रुपांतराच्या द्वारें इतकी छाप बसलेली दिसली कीं तितकी छाप ब्रम्हसूत्रें, शांकरभाष्य किंबहुना गीता भागवत ह्या संस्कृत ग्रंथांचीहि महाराष्ट्रांतील वाचकवर्गावर, निदान श्री एकनाथाचे काळीं तरी बसली नव्हती असती तर श्री एकनाथांना अवघ्या अडीचशें वर्षांपूर्वीची ज्ञानेश्वरी धुंडाळून शुद्ध करून नवी कां नटवावी लागली असती ? आणि श्री नामदेवांनी अमुक एक अभंग लिहीन म्हणून केलेली प्रतिज्ञा पूर्ण करावयाला पुन: त्याच्या मागून तीनशें वर्षांनी श्री तुकारामांना कां ह्या मर्त्य लोकाची यात्रा करावी लागली असती ? असो, संस्कृत वाङ्मयाचे स्वदेशी प्राकृतांत कालांतर होण्याला जो काळ लागला त्याच्या शतांशानेंहि काळ पाश्चात्य विचाराचे महाराष्ट्रांत स्थलांतर व्हावयाला लागला नाहीं कारण संस्कृतीचा प्रवास, तो बरा असो वा कसाहि असो, गणितश्रेढीनें नव्हे तर ह्या पुढे भूमितिश्रेढीहून अधिक वेगानें होणार आहे.

आमचा देश तूर्त तरी बिचारा विचारसंपत्तीची नुसती उतारपेठ होऊन राहिला आहे. पण हल्लीं जेथें पिकतें तेथेंच विचाराची कशी क्रांतीची धुनी पेटली

आहे पहा ! पृथ्वीवरील सृष्टीच्या इतिहासाचे अवलोकन करून–विशेषत प्राणिशास्त्राच्या व भूगर्भशास्त्राच्या अभ्यासाच्या जोरावर पाश्चात्य तार्किक उत्क्राति वादासारखे अतिव्याप्त सिद्धात काढूं लागले होते पण सर्व शास्त्रात अधिक निश्चित शास्त्र जें गणित त्यातच आता युगातर करणारे शोध होऊं लागले आहेत त्यामुळे न्यूटनला शिळे ठरविणारे वैज्ञानिक आइनस्टाईन सारखे निर्माण होऊ लागले आहेत आइनस्टाइनने विज्ञानजगात जी एक अपूर्व क्राति चालविली आहे, तिचा एक ढोबळ परिणाम जागतिक विचारावर किंबहुना वाङ्मयावरहि कदाचित् होईल असें वाटते, तो हा की यापुढे निवळ तार्किक अथवा काल्पनिक ( Deductive or Apriori ) विचार पद्धतीला आळा बसून तदनुसार गंभिर वाङ्मय, ललित नव्हे, अधिकाअधिक अनुभविक आणि निश्चित पद्धतीचा ( Inductive or Aposteriori ) अवलब करील प्रस्तुत सारे जगच वैज्ञानिक क्रातीमुळे आणि त्याहूनहि अधिक तीव्र ज्या राजकीय, सामाजिक, आर्थिक क्रातीनी हादरू लागलें आहे, त्यामुळे ह्यापुढे नुसत्या तार्किक अर्थवादाचा खप कमी होइल मग त्याची निपजहि कमीच झाली तर कोणाला फारसे वाईट वाटण्याचे कारण नाही ह्या दृष्टीने पाहता अमक्याचे तत्त्वज्ञान किंवा तमक्याचा तत्त्वज्ञानाचा इतिहास वगैरे आकाशाला गवसणी घालण्याचा आव आणणारीं पुस्तके मराठीत न झाली तरी चालेल, त्यात काही नाविन्य अगर गाभीर्य नसणार ह्या पेक्षा जास्त स्वतंत्र आणि सुटसुटित ग्रथ तयार करावयाचे नसल्यास आमच्यातील काही कॉलेजातल्या प्रोफेसराप्रमाणे आधुनिक विद्याविशारदानी लघुकथाभावगीतें, फार तर विनोदी कादबऱ्या लिहिलेल्या बऱ्या त्याहि खपत नसल्या तर परीक्षेचे कागद तपासण्यात अधिक किफायत मिळेल तर पहावी, मग उगाच वाचकाचा वेळ घेणारी तत्त्वज्ञानें कशाला ? ह्या बाबतींत जबलपूर कॉलेजचे प्रोफेसर श्री. द गो. मटंगे M. Sc. ह्यानी नुकतेच लिहिलेल्या " अपेक्षावाद " ह्या चोपड्याची मला साभिमान आठवण होत आहे ह्या चोपड्याचा आकार एकाद्या बेकार तरुण कवीच्या कविता संग्रताहूनही लहान आहे, आणि त्याचा विषय पहावा तर " जगता व्यापून दशागुले उरला ". सापेक्षतावाद सिद्ध असो वा नसो, जाड्या विद्वानाला बारके पुस्तक लिहिता येणे शक्य आहे ही अपूर्व गोष्ट ह्या प्रोफेसरानी सिद्ध केली म्हणून मी त्याचे अभिनंदन करतो अशी क्षुद्र पुस्तके आमच्या पुण्यात कोणी प्रसिद्ध करीत नाहीत तें काम आपण केलें म्हणून बडोदावासियाचेंहि अभिनंदन करतो. आमचे पुण्यातले मीमासक आणि वेदाती प्रत्यक्ष आइनस्टीनचीच थट्टा करतील ते म्हणतील ह्या जर्मनानें

आमच्या आद्य शंकराचार्यांचा मायावाद चोरला तें कसेंही असो, आमच्याइकडील प्रोफेसरानीं नवीन शोध लावले नाही तरी परकीयाच्या खऱ्या शोधाची साध्या भाषेत रुपांतरें करून आम्हा अडाणी मराठ्याना त्याची ओळख करुन दिली तरी पुरे नागपूरच्या नवभारत ग्रंथमालाकारानीं ह्याच आकर्षक विषयावर ' सापेक्षता दर्शन " नावाच्या एका होऊं घातलेल्या ग्रंथाची जाहिरात प्रसिद्ध केली आहे. दुर्बोध विषयाचें सुबोध विवरण होणार अशी जाहिरात आहे ती लवकर खरी ठरो ! असो. तत्त्वज्ञानावर झाले तेच चऱ्हाट माझ्या इच्छेपलीकडे लाबले. आता अधिक लोकप्रिय नसलें तरी खात्रीने लोकोपयोगी अशा समाजशास्त्राकडे वळू या

## समाजशास्त्र

तत्त्वज्ञान म्हणजे व्यक्तीला जे चालू व्यवहाराचे अनुभव आलेले असतात त्याना तिच्या आध्यात्मिक भावना म्हणजे श्रद्धा, सहानुभूति, प्रेम इत्यादिकाचे माप लावून केलेला हिशेब अथवा अनुमान समाजशास्त्र म्हणजे समाजाला जे संकलित अनुभव येतात, त्याच्या जोरावर समाजाच्या वेळोवेळी अधिकाधिक मिश्र आणि व्यापक ज्या घटना होतात त्या ज्या नियमाने होतात त्याचे सम्यक् ज्ञान ह्या व्याख्येंत ध्यानात ठेवण्यासारखा विशेष हा की समाज म्हणजे केवळ व्यक्तीचा समुदाय नव्हे तर त्या समुदायाचे काही विशिष्ट हेतूने बनलेले सावयव संघ किंवा गट. हे गट ज्या व्यक्तीचे असतात ते फार थोड्या अशाने त्या व्यक्तींना कळून बनतात व त्यातून फारच थोड्या अशानें त्यानीं जाणूनबुजून बनविले असतात बहुताशीं ज्या व्यक्तींचे हे गट बनतात, त्याना नकळतच ते बनत असतात. कुटुंब, जाती, खेडी, शहरें, देश, किंबहुना धर्माचे पंथ आणि व्यापाऱ्याच्या पेठा देखील बहुताशी व्यक्तीना नकळतच बनत असतात इतकेंच नव्हे, त्याचा ऱ्हास आणि पुनर्घटनाहि अशीच नकळत होत असतात. ही बनावट व्यक्तीना न कळत होते म्हणून ती कोणत्याहि कारणाशिवाय अगर नियमाशिवाय होते असे मुळीच नव्हें. हीं कारणें व नियम नीट शोधून काढणे व त्याचा परस्पर संबंध लावणें हाच समाजशास्त्राचा हेतु आहे. तत्त्वज्ञान कितीहि निरपेक्ष असलें तरी त्यात उच्च आत्मिक भावनाच्या व्यापाऱ्याला जागा आहे पण समाजशास्त्राच्या अध्ययनात अशा कोणत्याच उच्चनीच भावनाना जागा नसते व नसावी. समाजशास्त्र्यानीं आधीं भावनामुक्त झाले पाहिजे.

समाजशास्त्राचे अध्ययन वाटतें तितके नवें किंवा आधुनिक नाही प्राचीन-काळीं ज्याना समाजाचे शासन अथवा नियंत्रण करावयाचे होतें तेच अपवादक

थोर द्रष्टे पुरुष ह्या शास्त्राच्या अध्ययनाची खटाटोप करीत असत म्हणजे विवेचनाचें व निर्णयाचे (Legislative) काम आणि शासनाचे आणि नियंत्रणाचे (Executive) काम ही दोन्ही खाती एकाच व्यक्तीच्या अगर समितीचे हातात असत जसजसा कार्याचा व्याप आणि अनुभव वाढला तसतशी ह्या दोन्ही खात्याची फारकत होत आली आहे आता पाश्चात्य जगात समाजशास्त्र हे केवळ संशोधक आणि विवेचक जगात म्हणजे केवळ शुद्ध विद्याव्यासंगातच मर्यादित झाले आहे. राजकारभार मग तो कायदे करण्याचा, न्याय देण्याचा किंवा अमलबजावणीचा असो, त्याच्या ससर्गापासून समाजशास्त्र हे आता अगदी दूर आणि अस्पृष्ट ठेवण्यात येत आहे ह्या मर्यादेमुळे समाजशास्त्राच्या अध्ययनाला स्वतंत्रता आणि मोकळेपणा मिळून, त्याला आधुनिक स्वरूप प्राप्त झाले आहे.

आमचे प्राचीन स्मृतिकार आणि नीतिकार हे समाजशास्त्रीच होते. फार तर काय, आमचे धर्मशास्त्र, वेदात अगर षट्दर्शनें नव्हत, हे जुने समाजशास्त्रच होते म्हटलें तरी चालेल. आमचा हल्लीचा स्वदेशी राज्यकारभार उर्फ स्वराज्य हं ज्या प्रमाणे जुन्या रामराज्याच्या नावावरच अजून विकते त्याचप्रमाणे आताच्या परकीय ब्रिटिशसत्तेची आणि आमच्या सस्थानाची न्यायदानाची चक्रे देखील जुन्या स्मृति आणि त्याची जुनी भाष्ये ह्याच्या वाऱ्यावरच अझुनी हालत आहेत. अशा पुराणप्रिय स्थितिस्थापक परिस्थितीत आमच्या वाङ्मयात ह्या नवीन समाज-शास्त्र्याच्या अध्ययनाला वाव मिळत नाही, ह्यात नवल काय ? आताचे वतनी शंकराचार्य आणि फुकटे धर्ममार्तंड ह्याचा जरी चालू राजवटीशी प्रत्यक्ष देवघेव सबध तुटला आहे तरी दोरी तुटलेल्या पतगाप्रमाणे त्याच्या परिषदा, आज्ञापत्रें, ठराव आणि प्रायश्चित्ते, सामाजिक वातावरणात अद्यापि तरंगत आहेतच, नाहीत काय ? त्याना तोंड देऊन आमच्यातील आधुनिक सुधारक मंडळी समाजाला नवें वळण देण्याचा प्रयत्न गेल्या तीन पिढ्या करून राहिली आहे पण हे दोन्ही विरोधी पक्ष जें कार्य करीत आहेत ते आधुनिक समाजशास्त्राचे कार्य म्हणता येत नाही. कारण त्या दोघाचेही कार्य शुद्ध आणि निरपेक्ष संशोधनाचे आणि विवेचनाचे नसून बऱ्या वाईट कार्यकारित्वाचा त्याला विटाळ होत आहे. उलटपक्षी आधुनिक समाजशास्त्री हा आपल्या केवळ विवेचनासाठी ऐतिहासिक व चालू सामाजिक अनुभवाची व प्रयोगाची सामुग्री गोळा करण्यात गुतला आहे तो आपल्या विवेचनाला नुसतें निर्णायक स्वरूप देण्यालाहि धजत नाही. तर मग तो समाजाचे नियंत्रण व शासन करण्याचे मोहाला कसा बळी पडेल ?

येथवर ह्या नव्या दृष्टीचें सामान्य संक्षिप्त अवलोकन झालें आता आमच्या मराठी वाङ्मयात ह्या दृष्टीने गेल्या शतकात काय घडामोडी झाल्या च आता काय प्रकार चालू आहे, तें पाहूं महाराष्ट्रात मुंबईचे विद्यापीठ इ स १८५७ सालच्या सुमारास सुरू झालें परंतु सामाजिक बंडाची ढगें महाराष्ट्राच्या आकाशात पूर्वीच जवळ जवळ वीस वर्षे दिसू लागली होती "परतु तिसरा जो वर्ग, ज्यास व्यवस्थित रीतीने शिक्षणाचा लाभ झालेला होता, तो जागृत होऊं लागला होता. आपली घडी बिघडली आहे ह्या विषयी त्यातील लोकात जागृति उत्पन्न झाली होती. आपल्या समाजातील अनेक दुष्ट चाली, अन्यायमूलक रीति, रिवाज ह्यानी आपल्या समाजाचे किती नुकसान होत आहे हे दिसू लागले होते......पडित ईश्वरचंद्र विद्यासागर कलकत्त्याच्या महर्षि देवेन्द्रनाथाच्या तत्त्वबोधिनी सभेचे सभासद होते (मुंबईच्या) परमहस मंडळीत त्याचे त्यावेळीं ब्राह्मसमाजासंबधी संभाषण झाले असावे शेवटी कलकत्त्याप्रमाणे चळवळ सुरू न करता अल्पप्रमाणावर येथे चळवळ सुरू करण्याचा निश्चय होऊन इ. स १८४० सुमारास परमहस मडळीची स्थापना झाली" (द्वा गो वैद्यकृत प्रार्थना समाजाचा इतिहास पान ८ ते ९) इतर बडखोराप्रमाणे अर्थात् ही मंडळी गुप्तच राहिली तिचे कार्य वीस वर्षे पुढे गुप्तच चालले ह्या मडळीचे मुख्य संस्थापक दादोबा पाडुरग ह्यानी "पारमहसिक ब्राह्मधर्म" हा पहिला सुधारकी ग्रथ, ह्या मंडळीचा धर्मग्रथ रचला, पण तो गुप्तच ठेविला इ स १८६० साली ही परमहस मडळी बद पडली. पुढे १८६७ साली मुंबईचा प्रार्थना समाज ह्या रूपाने पुन अवतरली, पुढचे सुधारणेचे कार्य उघड चाललेले प्रसिद्ध आहे ह्या सामाजिक कार्याचा पाया धर्मसुधारणेचा होता तो न पटल्यामुळे लोकहितवादी देशमुख आणि राजारामशास्त्री भागवत, कृष्णशास्त्री चिपळुणकर वगैरे तत्कालीन सुशिक्षित पाढरपेशाचे पुढारी मडळीनी धर्माचा व श्रद्धेचा भाग वगळून शुद्ध सामाजिक चालीरीती सुधारण्याची वाङ्मयीन चळवळ चालविली हे सर्व शाब्दिक सत्र खुशालचेंडू नागरिकाकरताच चाललेले न खपून महात्मा ज्योतीबा फुले ह्या माळी गृहस्थाने बहुजन समाजाच्या जागृतीसाठी प्राकृत भाषेत आणि व्यावहारिक पद्धतीने स्वतंत्र प्रयत्न चालविले, शेवटी त्यानेही इ स १८७३ साली आपल्या कार्याला धार्मिक स्वरूप देऊन सत्यशोधक समाजाची स्थापना केली. इतक्या अवधीत पुण्यासारख्या शिक्षणाच्या केंद्रस्थानी इंग्रेजी दुय्यम व उच्च शिक्षणाच्या सस्थाचा व लोकजागृतीसाठी वर्तमानपत्राचा उठाव झाला. आगरकर, टिळक, आपटे नामजोशी प्रभृति स्फूर्तिमान पाढरपेशाचा पुढाकार या कार्याला लाभला

येणेप्रमाणे सतत ४० वर्षे एकाच दिशेने चळवळ झाल्यावर तिच्या उलट प्रतिक्रियेचा वेळ येऊन ठेपला जीर्ण मताची घटना होणे क्रमप्राप्तच झाले. विष्णुशास्त्री चिपळुणकर हे ह्या घटनेचे वाङ्मयीन अध्वर्यु झाले नवमताचा मोठा प्रतिभावान् मोहरा टिळक हा जीर्ण पक्षाला फितूर होऊन त्या सर्वच घटनेचा विष्णुशास्त्र्याच्या मागे आपण आचार्य झाला पुढील चाळीस वर्षांत ह्या जीर्णोद्धारक पक्षाचे कार्य अद्यापि कलेकलेने वाढतच आहे

ह्या दोन नितात विरोधी पक्षाचा जो मी उल्लेख केला आहे तो ते दोघे किंवा त्यातून एकतरी समाजशास्त्राच्या अध्ययनाचे किंवा प्रतिष्ठेचे कार्य करीत आहे अशा समजुतीने नव्हे. ह्या पक्षकाराचे हेतु आणि कार्ये त्या अध्ययनाचे विषय होऊं शकतील पण ह्यापेक्षा प्रत्यक्ष अध्ययनाशी ह्या दोन्ही पक्षाचा संबध नाही व तो कोणीहि अभ्यासू तसा बळेच आणू पाहील तर तो अभ्यासक्षेत्रातून भ्रष्ट झाला असेच समजावे ह्या दोन्हीं पक्षातील काही वीराना भावी इतिहासात कदाचित् अग्रपूजेचे स्थान मिळेल पण त्याना केवळ ह्या जगबहादुरीमुळे. समाजशास्त्राच्या अध्यापकामध्ये जागा मिळेल अशी जर कोणाला अद्यापि आशा वाटत असेल तर त्याना ह्या नूतन दृष्टीची निरपेक्षताच कळली नाही असे म्हणावे लागेल फार तर काय ह्या रणसग्रामाची शस्त्रास्त्रें शोधून गोळा करण्यासाठीं दोन्हीकडचे योद्धे आणि मुत्सद्दी या नवीन शास्त्राचा आश्रय अलीकडे करू लागले आहेत व पुढे करतील. पण ते त्या शास्त्राचें केवळ बरे वाईट योजकच होत अध्यापक किंवा आचार्य नव्हत मुळीच नव्हत ! असे काही धाडसी योजक-विशेषत जीर्णोद्धारक पक्षाची प्रसिद्ध किंवा प्रच्छन्न बाजू उचलून इतिहाससशोधनाचे निर्विकार आणि तटस्थ मुलुखात मुलुखगिऱ्या करू लागले आहेत. अशा शिलेदारात मरहूम सशोधक राजवाडे ह्यानी बरेच काम आणि कीर्ति संपादन केली आहे प्रस्तुत काळी ह्या सामाजिक वाङ्मयीन युद्धाला राजकीय स्वरूप येऊ लागल्यामुळे तर ह्या शिलेदारी सप्रदायाला ऊतच येऊं लागला आहे ह्या धाडसाचा कळस म्हणून एक अगदी ताजें उदाहरण द्यावयाचें झाल्यास गेल्या जुलै महिन्यात प्रसिद्ध झालेला श्री गो. म जोशीकृत "हिदूसमाजरचनाशास्त्र" हा साप्रदायिक ग्रथ होय ह्या शिलेदाराने प्रत्यक्ष समाजशास्त्राच्या अंगणात शिरून लुट मारामारी चालविली आहे ती पाहून आद्यप्रवर्तक चिपळूणकर आणि मध्यमेरू राजवाडे ह्यानाहि आश्चर्याचा धक्का बसला असता ! हा राजकारणाचा महिमा आणि समाजशास्त्राची विडंबना !

वरील कळस ही एक प्रतिक्रियाच होय सुधारक राजाराम शास्त्री भागवत हे इतिहास संशोधनाच्या क्षेत्राभोवती घिरट्या घालू लागले तर मग सनातनी राजवाड्यानी त्या क्षेत्रावरच आपला जबरदस्त पजा का ठेवू नये? सक्रीय सुधारक प्रो गो. चि भाटे ह्यांनी "समाजशास्त्र" ह्या नाव खाली एक निबंधवजा ग्रंथ लिहून प्रत्यक्ष निशाणालाच हात घातल्यावर, सनातनी पक्ष इतकी वर्षे स्वस्थ राहिला, हेच आश्चर्य. उशीरा का होईना गो म जोशी ह्यानीं आपला प्रतिध्वनी गाजविला ह्यात काय आश्चर्य! पण ह्या सर्व झटापटीत सनातनी पक्ष केवळ प्रतिक्रियेची वाट पहात आहे, असे का? आणि तीहि हिंदूंची प्राचीन वर्णव्यवस्था आणि साप्रत जातिभेद ह्याच एका किल्यात बसून त्याने मैदानात का उतरू नये?

महात्मा गांधीनी गेल्यावर्षा अस्पृश्यता निवारणाची, विशेषत मंदीर प्रवेशाची वावटळ उठविली तीत हिंदू मंदिरे जणू जमीनदोस्त होतील अशी दहशत घेऊन सनातन्याची एक अपूर्व प्रतिक्रिया सुरू झाली तिचे "हिंदुसमाजरचनाशास्त्र" हे एक प्रत्यक्ष चिन्ह आहे ह्या हल्ल्यात सुधारक पक्षाला उभे राहावयाला सुईच्या अग्राएवढीहि जागा ठेवलेली नाही बालविवाह, विधवाविवाह, प्रीतिविवाह, स्त्रीशिक्षण, अस्पृश्यतानिवारण वगैरे मोर्चावर तर कठोर मारा चालविला आहे इतकेच नव्हे तर मुरळ्या सोडण्याच्या चालीला कायद्याचा प्रतिबंध असणे, किंबहुना हिंदुसमाजाने परदेशात वस्ती करणे अगर स्वदेशातील संतानवृद्धीवर आळा घालणे हेही मुद्दे केवळ अशास्त्रीय आणि घातुक ठरविले आहेत फार तर काय क्षत्रियकुलावतंस श्री शिवाजी महाराजाचे घराणे आणि पेशवे भट घराण्याचाही नि पात झाला, पण इतर भटाची व भोसल्याची घराणी अद्यापि सुखात नांदत आहेत असे सागून क्षात्रवृत्ती कशी विषारी आणि आत्मघातकी आहे हे श्रीयुत जोशी ह्यानी निर्विवाद सिद्ध केले आहे. "राज्याती नरक" हा शाप हिंदुसमाजरचनाशास्त्राचा दुसऱ्या बाजीलाच नव्हे तर पहिल्या शिवाजीलाहि कायमचा बाधलाच म्हणावयाचा (पान १६१) "कोणी कितीहि हाकाटी केली तरी ब्राम्हण शेकडो वारींने पाहिले तर इतर वर्गापेक्षा जास्त लायक प्रजा उत्पन्न करितो, ह्यात काही शंका नाहीं" असे श्री जोशी ह्यानी बिनचूक विधान करून पुढे डीन इंग, गॅाल्टन, हॅवलॅाक एलिस वगैरे पाश्चात्य विद्वानाचे उतारे देऊन स्पष्ट सिद्ध केले आहे कीं, 'ब्राम्हणानी प्रथमत घराण्याची निवड चांगली करून घेतली, पुढे ते वंश विभक्त करुन घेतले, सुप्रजाजननशास्त्राचे दृष्टीने उत्तम परंतु अर्थशास्त्राचे दृष्टीने हीन असे धंदे त्याना लावून दिले, सर्व नाशाची आद्य कारणे जी द्रव्य आणि सत्ता ह्या दोन्हींची झळ त्याना लागूं दिली नाही, म्हणूनच हे वंश निदान

८००० वर्षे तरी पिढ्यानपिढ्या सृष्टीच्या घडामोडीत टिकाव धरून राहिले आहेत नहीतर ते केव्हाच नाहीसे होऊन गेले असते " (पान २४६ पृ ४६)

सनातन कपूने पुण्यास एक परवा वाङ्मय परिषद् भरविली तींत ह्या साहित्य समेलनाच्या निषेधाचा एक ठरावहि पास करून घेतला. का तर ह्या संमेलनाने अश्लील वाङ्मयाचा निषेध केला नाही म्हणून पण ज्या सनातन्याना ललित वाङ्मयातील अश्लीलता खपत नाहीं त्याना स्वत च्या समाजशास्त्रासारख्या गंभीर विषयावरील ग्रथात शिमग्याचे जे सोहाळे साजरे झाले आहेत ते कसे रुचतात बरें? श्री जोशी ह्याचा बीभत्स रसास्वादनात कोणीच हात धरूं शकणार नाहीं. हे खालील एकाच उताऱ्यावरून सिद्ध होत आहे " खरोखर पाहिलें तर कुत्रा ही जाति अत्यंत सुधारली आहे, आणि आमचे सुधारक बधु मागे- त्याच्या फारच मागे-आहेत. कुत्रा जातीत स्त्रियाना समान हक्क आहेत, स्त्रीला नारद स्मृतींत सागितल्याप्रमाणें पुनर्विवाहाचा हक्क आहे स्त्रियाना डॉ हरिसिंग ह्यानीं कायदे-मडळात बिल आणण्याचें पूर्वीच घटस्फोटाचा हक्क मिळाला आहे ! ह्या जाती-वरून सुधारलेल्या अमेरिकनानी अनिर्बंध संभोगाचे ( Free Love ) तत्त्व उचललें असें त्यातील काही कुत्र्याचे म्हणणे आहे ह्या समाजामध्ये भाडवल-वाला वर्ग नाही. कार्ल मार्क्स आपले अर्थशास्त्र देवशुनी जी सरमा तिच्या पुत्रा जवळ शिकला असा प्रवाद ऐकिवात आहे. सर्व दृष्ट्या इतकी सुधारलेली जात असून देखील ह्या जातींत सततिरक्षणाचा भार स्त्रीजातीवर पडतो म्हणून त्यातील महिला परिषदेंत संततिनियमनाचा ठराव नुकताच पास झाल्याचें ऐकिले आहे ह्या जातींत प्रियाराधन असल्यामुळे प्रीतिविवाह सर्रास चालू आहेत. एकंदरीत पाहिले तर कुत्रा ही जात अत्यत सुधारलेली आहे असें म्हणण्यास मुळीच हरकत नाहीं, असे अम्हास वाटते "

महाराष्ट्रात सामाजिक सुधारणेचा जेव्हा प्रभातकाळ होता तेव्हा लोकहितवादी राजाराम शास्त्री, आगरकर ह्या प्रागतिकाच्या वाङ्मयाला तोड द्यावयाला चिपळूणकराची निबंधमाला, गोळे ह्याचे " ब्राम्हण आणि त्याची विद्या " " हिंदू-धर्म आणि सुधारणा " हे ग्रथ निर्माण झाले. ह्या प्रभातकालच्या वाग्युद्धात प्रातःकालची तरतरी आणि जोर होता पण आताच्या ह्या मध्यान्ह काळच्या युद्धात जडता, बेजबाबदारी आणि अश्लीलता ही दिसू लागली आहेत कोणतेहि युद्ध लाबत गेल्यास लढाऊ शक्ति जरी कमी कमी होत गेली तरी रुग्ण मनोविकार अधिकाधिक बळावत जाणे क्रमप्राप्तच होतें हे साहजिकच आहे. असो.

मराठी सामाजिक वाङ्मयामध्यें वरील रणसंग्रामाने अगदी वाजवीपेक्षा जास्त जागा अडविली आहे, हे दाखविण्यासाठीच केवळ मी ह्या पक्षात्मक वादाचा उल्लेख केला आहे ह्या अध्यक्षीय स्थानावर बसून कोणत्या तरी एका पक्षाला भाळून समाजशास्त्राची माळ त्याच्या गळयात घालण्याचा अधिकार मला नाही हें मी जाणून आहे, मी तर वर सांगितल्या प्रमाणे ह्या दोन्ही पक्षापासून खऱ्या समाजशास्त्राची दिल्ली अजूनी फार दूर आहे असेच म्हणत असतो, परतु अगदी अलीकडे गेल्या दोन चार वर्षात ह्या विषयावर अगदी तटस्थ आणि अभ्यासू वाङ्मय थोडे थोडे निर्माण होऊ लागले आहे हे एक सुचिन्ह आहे, नागपूर येथील नवभारतग्रथमालेतल्या सारखे निरपेक्ष, सुटसुटीत लहान लहान ग्रथ अधिकाधिक प्रमाणावर प्रसिद्ध होतील, तरच वरील वाक्संग्रामातून उडालेली धूळ बरीच खाली बसेल. प्रस्तुत समेलनाचे मुख्य अध्यक्ष श्री ना गो चाफेकर ह्यानी गेल्याच वर्षी बदलापुर ( आमचा गाव ) हे पुस्तक प्रसिद्ध करुन नवीनच उपक्रम मराठीत सुरू केला हे केवळ अभिनदनीय आहे. ह्यात प्रत्यक्ष समाजशास्त्र नाही. तरी त्याची विश्वसनीय सामुग्री अत्यंत श्रमाने आणि नि पक्षपाताने गोळा केली आहे इ स १९३२ साली त्यानी आपला " समाजनियत्रण " हा निबध प्रसिद्ध केला. पण त्यातहि पक्षात्मकवादा पासून आपल्याला किती सुरक्षित ठेवले आहे हे ध्यानात घेण्यासारखे आहे अशीच तटस्थ आणि अभ्यासवृत्ति इतरानी राखली तर मराठी वाङमय भूमीत ज्या समाजशास्त्राला अद्याप मूळ धरिता येईना त्याच्या अध्ययनाला पुढे वाव मिळेल, एरवी नाही.

परंतु मराठी लेखक वर्गात वरील तटस्थवृत्ति उदय पावते न पावते तोच मला एक धोक्याची सूचना ह्याच टप्प्यावर देणें अवश्य झाले आहे सुधारक, सनातनी याच्या कटकटीने आमचे कान किटले आहेत, त्याच्या युद्धाला अद्यापि उतार लागला नाहीं तोच, तेच युद्ध आता आपले आगण (Theatre of war) बदलत असल्याची चिन्हे स्पष्ट दिसू लागली आहेत इ. स १८४० पासून ९० वर्षे महाराष्ट्रात जो सामाजिक वादचालला होता तो नुसता धर्मशास्त्राच्या भावनामय आगणांत चालला होता इ. स १८३० पासून हा वाद अर्थशास्त्राच्या वेदनामय आंगणात सुरू झाला आहे तो ह्या पुढे किती वर्षे आणि कोणत्या थराला जाईल, हें तूर्त काहीच सांगवत नाहीं. एका बाजूला नूतन समाजवाद (Socialism) व्यक्तिस्वातंत्र्य ( Individualism ) समतावाद बहुहितवाद ( Utilitarianism ) वगैरे तत्त्वाच्या आरोळया ऐकू येतात, तर उलट दिशेनें सामाजिक

मक्तेगिरी ( Priveleges ) साम्राज्यवाद, राष्ट्रीयता ( Nationalism ) जातिनिष्ठा ( Communalism ) वंशशुद्धि ( Pedigree ) इत्यादि रूढ भावनावर प्रवचनाचा, उपदेशाचा आणि धमक्याचा अट्टाहास चालू आहे. आणि मागील युद्धाने नुसते अगणच बदलले नसून त्याचा जोर अ णि वेगही फारच तीव्र होत आहे. धार्मिक सुधारकाना व त्याना विरोध करणाराना जी घटना-सिद्धि करावयाला जवळ जवळ गेली १०० वर्षे लागली ती घटना ह्या आर्थिक सुधारकानीं गेल्या चारपाच वर्षात पुरी केली आहे हिदुस्थानातील मोठ्यातली मोठी राजकीय विरोधी घटना म्हणजे काग्रेस तिला काबीज करावयाला जुन्या सुधारकाना कमीत कमी गेली २० वर्षे लागली पण पुढील ६ वर्षे तरी या नव्या आर्थिक सुधारकापुढे किंवा त्याच विरोधी ज्ञातिनिष्ठ उद्धारकापुढे काग्रेसला टिकाव धरिता येईल की नाहीं, कोण सागू शकेल ? लखनो पॅक्ट नतर लोकमान्य तिरोभूत झाले, आणि पुणे पॅक्ट नतर महात्म्याला सन्यास घ्यावा लागत आहे. मला सागावयाचा मुद्दा हा की ह्या नव्या दगलीमुळें समाजशास्त्राची दिल्ली आणखी शभर योजने दूरच राहील ! माझे असे म्हणणे नाही की ही व अशीच सामाजिक युद्ध आणि वाद समाजशास्त्राला बाधक आहेत. मुळीच नाहीं,उलट आम्ही वर म्हटलेच की हा विरोध समाजशास्त्राच्या निरीक्षणाचा मोठा विषय आहे ही युद्धे आणि वाद ह्या शास्त्राच्या निरीक्षणमदिरातील उमटणारे देखावे ( Phenomena ) आणि प्रयोग आहेत प्रत्यक्ष अभ्ययनाला ह्यामुळे किंचित विलंब लागला तरी अप्रत्यक्ष अध्ययनाला अशा घडामोडीमुळे मोठी स्फूर्ति येते समाजशास्त्राच्या अभ्यासातले हे अलभ्य वस्तूपाठच होत. प्रसिद्ध जर्मन तत्त्ववेत्ता हेगल म्हणतो " समाजाच्या उन्नतीची बीजे विरोधविकासात आहेत. कार्ल मार्क्स त्याचा शिष्य त्याने ह्या विरोधविकासावर आपली सर्व शिकवण रचिली. महात्मा गाधी सागतात " आपली पद्धत झजावाताची आहे " शातीचा प्रत्यक्ष पुतळा श्री ख्रिस्त म्हणतो " मी विरोधाची भुते उठवावयाला आलो आहे, शातीची थडगी बाधावयाला नव्हे. " तर मग वर जी मी धोक्याची सूचना म्हटली ते वाक्य दुरुस्त करून त्याऐवजी आता मंगलाचरण असे म्हणतो । हे मगलाचरण श्री पा बा गाडगीळ ह्यानीं " सोशॅलिझम् " अथवा " **समाजवादाचा ओनामा** " हे आपले पुस्तक गेल्या ऑक्टोबरमध्ये प्रसिद्ध केले आहे, जे कार्य आगरकरानी धर्मशास्त्रात केले, ते गाडगीळ व त्याचे अनुयायानीं अर्थशास्त्रात आरभले आहे, त्याना सनातनी पक्ष कसे तोड देईल, तें पहावे

## उपसंहार

येथपर्यंत मराठी वाङ्मयाचा जुन्या नव्या काळातील वरील दोन महत्त्वाच्या विषयासबधी ग्रंथाचा आणि घटामोडीचा विचार झाला आता पुढे काय करावयाला पाहिजे ह्या विषयी उपसहारादाखल एकदोन मुद्यासबधी विचार करून हें भाषण पुरें करितों तत्वज्ञानाचा जो साक्षात्कारी भाग आहे त्या संबधी कोणी कोणाला शिकवून तो होण्यासारखा नाही जो दुसरा तार्किक भाग आहे त्यात खरी भरीव ग्रथ निर्मिति व्हावयाची तर तिच्या पूर्वी निरनिराळ्या विषयावर प्रायोगिक वैज्ञानिक अभ्ययन पुरेसे झाले पाहिजे पण ह्या बाबतीत आमची विद्वान मडळी आणखी किती काळ पाश्चात्याच्या श्रमावर हात टेकून राहणार हे कळत नाही बगाल्यातील जगदीशचद्र बसू , पी सी रॉय, मद्रासे कडील रामन, ह्याची उदाहरणे महाराष्ट्रापुढे आहेतच प्रत्यक्ष तत्वज्ञानातच प्रो. राधाकृष्णन् यानी स्वदेशी व परदेशी बरीच कीर्ति मिळवीली आहे पण ती सुद्धा पौरस्त्य तत्वज्ञानाचे नुसते समर्थन ( Apologio ) म्हणूनच मिळविली आहे अलीकडे मराठीतून त्याच्या ग्रथाचा अनुवाद होत आहे Hindu view of life ह्या त्याच्या चार सुदर ' हिबर्ट लेक्चर्सचा ' मराठीत अनुवाद श्रीयुत बाळूभाइ मेहता ह्या गुजराथी गृहस्थाने नुकताच प्रसिद्ध केला आहे श्रीयुत नरसिह चितामण केळकर ह्यानी आपला ' भारतीय तत्त्वज्ञान " हा ग्रथ त्याच वर्षी प्रसिद्ध केला आहे पण तो केवळ ' संकलनात्मक आणि सक्षिप्तच झाला आहे " प्रसिद्ध षड्दर्शना शिवाय आणखी सहा सातच दर्शनाचे दिग्दर्शन केळकरानी केले आहे पण ब्रह्मजाल सुत्तात श्री गौतमबुद्धानी आपले दर्शन सागण्यापूर्वी त्यावेळी भारतात निदान ६४ तरी भिन्न भिन्न दर्शने होतीं, असे स्पष्ट म्हटले आहे. तात्यासाहेबानीं ह्या प्रदेशावर काही प्रकाश पाडला असता तर त्याच्या पुस्तकात काही नाविन्य आलें असतें. मराठीत स्वतंत्र दर्शनाचा योग केव्हा येईल तेव्हा येवो, तो पर्यंत विश्वविद्यालयातील विद्वानानी भारतीय तत्वज्ञानाचे शास्त्रीय शोधन करून काळानुक्रम आणि विषयानुक्रम निर्विकारपणाने जुळवून, एक नवीन इतिहास तरी लिहणे फार अगत्याचे आहे. नवी दृष्टी नसली तरी पुढील अध्ययनाला एक नवीन दिशा दाखविल्याचे श्रेय ह्या प्रयत्नाने मिळेल.

समाजशास्त्राच्या बाबतीत, मुंबई विद्यापीठानें बरीच वर्षे एक संस्था रडत कढत चालविली आहे. पण तिचें दृष्य फळ काही दिसत नाही निदान मराठी वाचकाना तरी काही लाभ झालेला दिसत नाहीं. स्वतंत्रपणानें काम करणाऱ्यापैकीं

श्रीयुत ना. गो चाफेकराच्या " बदलापूर ग्रथाचा " उल्लेख वर झालाच आहे. ते म्हणतात त्या प्रमाणे हे बदलापूर गॅझेटच तयार झाले आहे त्याचे मन पूर्वक अभिनंदन करून मला आमच्यातील तरुण विद्वानाना एक नम्र सूचना करावयाची आहे कीं अशा प्रकारची अखिल भारतातून विषयवार आणि आकडेवार कसोशीची माहिती ब्रिटीश सरकार आणि संस्थाने ह्यानी आज ५-६ दशवार्षिक खानेसुमारी तून अगदी पुरून उरण्या सारखी मिळवून ठेवली आहे.

Ethnographical Survey, Philological Survey द्वारे आज ५०-६० वर्षे अलोट खर्च आणि श्रम करून सामुग्री मिळविण्याचे काम चालले असून त्याचे साह्याने पाकसिद्धीचे कामाला मात्र अद्याप कोणीच पुढे येत नाही, हे कसे? भरतखड म्हणजे एक अपरूप मानवी म्यूझियम आहे. मराठ्याना महाराष्ट्रात ही विपुल सामुग्री हाताशी तयार आहे. ह्या बाबर्नत माझे मित्र श्री दिवेकर शास्त्री आणि श्री. म माटे ह्यानी जे श्रम केले आहेत त्याचा उल्लेख करणे जरूर आहे. विशेषत श्री. माटे याचा " अस्पृष्टाचा प्रश्न " हा ग्रथ सुदर असून समतोल आहे ह्या बद्दल त्याचे मी अभिनदन करितो. महाराष्ट्रातील ग्रामसंस्था महाराष्ट्राची वसाहत, जमीनवारा पद्धती असा एक एक सुटसूटीत विषय घेऊन त्यातच आयुष्य वेचणाराला पुरेशी सामुग्री वाट पाहात आहे.

महाराष्ट्रातील रामाजरचनेवर लिहिणारानी ह्यातील ग्रामसंस्थेपेक्षा जातीसस्थेकडेच अधिक नजर पुरविली आहे आणि तीहि माझी जात थोर, तुझी जात नीच या अशास्त्रीय भावनेने. यातील कित्येक जाती अथवा जमाती आपआपल्या अतर्बाह्य आचारात किती स्वयनिर्णित होत्या हे कुणाच्या लक्ष्यात यावे तितके येत नाहीं वैयक्तिक किंवा सामाजिक गुन्हे अथवा दोष घडल्यास त्याच्या निवाड्यासाठी किवा बदोबस्तासाठी ह्या जाती सरकारी न्यायखात्याकडे जात नसत अशी पंचाइत जातगंगाच करी, किंवा क्षेत्राच्या ठिकाणी ग्रामाधिकारी जोशी असत त्याच्याकडूनहि हा मनसुबा होत असे. पण त्या जोश्याची निवड गावच्या गोताकडून होत असे. ते गोत म्हणजे गावच्या सर्व जातीच्या प्रमुखाचे पार्लमेंट असें. कज्जे अलीकडे शंकराचार्याच्याकडे जातात पण शंकराचार्यांचे ह्या ग्रामाधिकाऱ्याच्या अधिकारावर हे अतिक्रमण आहे आणि ते ग्रामाधिकारी दोनशें वर्षा पूर्वी चालवूं देत नसत, हें धुळयाचे वकील श्री भास्कर वामन भट ह्यानी भा. इ स. मंडळाचे त्रैमासिक वर्ष १३ अक ३ यात सप्रमाण दाखविले आहे. मंडळाचे संशोधक श्री. शंकरराव जोशी याच्याकडे अशा कज्जाची दोषपत्रे आणि

शुद्धिपत्रे बरीच पाहावयास मिळतील तसेच गांवपाटील आणि जातपाटील याचे अधिकार आणि कार्यक्षेत्रें कशी भिन्न होती हेहि श्री. जोशी ह्यांनीं स्पष्ट दाखविलेलें आहे. त्रैमासिक वर्ष २ पृष्ठ १३४-३५ ह्यात म्हटलें आहे "न्यायमनसुबी सरकारात न्यावयाचे प्रयोजन नाही. सरपाटील यादी करावा. बदअमल कोळी लोकामधें जाला तरी त्याचा न्याये दिवानात न आणावा. अलीकडे दिवाणात नेनात ते न न्यावे" हे पत्र समस्त अष्टागर प्रातातील कोळी ज्ञातिबद्दलचे आहे. मी स्वतः कर्नूल जिल्ह्यात हिंडत असताना, तेथील धनगर जातीमध्ये अद्यापि ह्याच स्वयंनिर्णयाचा प्रकार पाहिला.

महाराष्ट्रातील जातिसस्था आणि ग्रामसस्था ह्याचा कारभार मध्ययुगातदेखील लोकमत्तात्मक होता

राज्यक्रानी झाली तरी या लोकसत्तेवर परिणाम होत नसे. हल्लीच्या इंग्रजशाहीने मात्र ही सत्ता नामशेष करून टाकली आहे. विद्याखाते, कायदे करणारे विधिमंडळ, निवाडा करणारें न्यायखातें आणि अमल बजावणी करणारे प्रधान मडळ हे वस्तुत परस्परापासून भिन्न व स्वतत्र असावयाला पाहिजेत, पोलीसखाते व लष्करखाते एवढेच काय ते सरकाराकडे असावे, असे प्रसिद्ध समाजशास्त्री हर्बर्ट स्पेन्सर ह्यानी आपल्या "Proper Functions of the State" या निबधात कंठरवाने सागितले आहे, तरी पाश्चात्य राज्यसस्थेने लोकांचे सर्वच हक्क आपल्या मुठीत वळले आहेत. आणि हेंच अतिक्रमण सर्वत्र चालू आहे. नवभारत ग्रथमालेंतील "महाराष्ट्राचा सास्कृतिक इतिहास" चे लेखक प्रो. पेडसे ह्यानी ह्या विषयाचे विवेचन केले असते तर बरें झाले असते. मराठ्याचे आणि पेशव्याचे दफ्तर आणि ठिकठिकाणी अद्यापि सापडणारी कागदपत्रे ह्याचा उपयोग करून न घेता, श्रुति, स्मृति आणि बारकऱ्याचे भारूड ह्यातच हे प्रोफेसर गुरफटलेले आहेत. कोळी जसा आपल्या जाळ्यातच गुंतून मेलेला आढळतो, तशी महाराष्ट्राच्या इतिहासाची गत या ग्रथप्रिय लोकानी केलेली दिसते. समाजशास्त्राच्या भावी अभ्यासूंनी ह्या कत्रचाच्या बाहेर यावें तेव्हाच खरा इतिहास कळेल, आणि नवीन समाजशास्त्र बनेल.

मोगलाई नंतर श्री शिवछत्रपतीने हिंदुपदपादशाही स्थापन केली तेव्हापासून सामाजिक स्वातंत्र्यावर राज्याचे आक्रमण सुरू झाले आपल्या घराण्यातील लग्नापुरतें त्यांनी पाच कुळी निर्माण केली. शेवटच्या प्रतापसिंह महाराजानीं मराठा ज्ञातीवर नियंत्रण घालण्यासाठी एक शिरस्तापत्र तयार केले त्यावर भोसले, महा-

डीक, शिरके, मोहिते आणि गुजर त्या पाच कुळांतील ४३ प्रमुख मराठयाच्या मध्या आहेत त्याची अस्मल प्रत भा. इ. संशोधन मंडळांत आहे मराठयान आपमातच शरीरसबंध करावा मध्यंतरी पेशवाईमुळे मराठा ज्ञातीतील शिरस्ते विस्कळीत झाले होते ते सुरळीत चालावेत, ही दोन कलमे स्पष्ट उल्लेखिली आहेत आश्रित ब्राह्मणानी मराठयांचे पौरोहित्य ते मागतील त्या प्रमाणे करावे, न वे त्यास दुसऱ्या ब्राह्मणाची नेमणूक व्हावी आणि त्या बाबत शेवटचे अपील छत्रपतीकडे यावे असा निर्बंध आहे.

अस्पृश्यतेचा छडा लावण्यात-निवारणाचा भाग तर राहूद्या-मला स्वतःला जो जन्मभर अनुभव आला आणि आनंद झाला, तो लक्षात घेता मला आणखी जन्म मिळाले तरी, ते त्याच शोधनात, आणि सेवाशुश्रूषेत खर्चावे अशी उमेद वाटत आहे एकच इशारा द्यावासा वाटतो. अशी कामे पूर्वग्रह अजिबात टाकून दिल्या शिवाय कोणी केव्हांही हाती घेऊ नयेत ३६ वर्षांपूर्वी "हिंदूधर्म आणि सुधारणा" त्या ग्रंथाच्या विद्वान कर्त्यांनी आपल्या ग्रंथाच्या शेवटच्या प्रकरणात असा निष्कर्ष काढिला की ब्राह्मणजातीनें हजारो वर्षे विद्या व्यासंगाचे अतिश्रम केले, इतकेच नव्हेतर कनिष्टजातीचा उद्धार सतत स्वार्थत्याग करून चालविला, त्यामुळे त्याच्या बुद्धीला वैक्लव्य प्राप्त झाले आहे, आणि त्याच्या संख्येचाच नव्हे तर गुणाचाही झपाट्यानें ऱ्हास होत आहे. त्यानंतर ३६ वर्षांनी आज पहावे तो श्री गो. म. जोशी यानी आपल्या "हिंदू समाजरचनाशास्त्र" ग्रंथात अगदी उलट प्रकारचा छातीठोक सिद्धांत काढला आहे तो असा की सृष्टीच्या घडामोडीत ब्राह्मण जात एकच आज ४ हजार वर्षे टिकून राहिली आहे तीच जात सुप्रजाजनन करण्यास व जगण्यास लायक आहे. गोळे मागे म्हणून गेले की कनिष्ट जातीवर विद्याव्यासंगाची आणि लोकसेवेची सारी जबाबदारी सोपवून ब्राह्मणानी आपलीच संख्या शक्य तितकी वाढवावी आणि कनिष्टाची शक्य तितकी घटवावी आम्ही कोणाचे ऐकावे? आपल्या मते पिसे। परि ते आहे जैसे तैसे ॥ तुका म्हणे वादे। वाया गेली ब्रह्मवृंदे ॥ हा खरा प्रकार आहे, असे समजून दोघाकडे ही दुर्लक्ष्य करावे झाले!

माझी तरुणाना हात जोडूनपुन विनंती आहे की बाबानो, तुम्ही आपले सर्व पूर्वग्रह मोडून द्या आणि तुमच्यासाठी आधीच मिळवून ठेविलेल्या माहितीला तुमची स्वतःचे स्थानिक निर्विकार अनुभवाची जोड देऊन, अशी कांही नवीन दिशा दाखवा की जेणे करून आमचे सर्व पूर्व ग्रह नाहीसे होतील, आणि नवीन आशा उत्पन्न होईल परमेश्वर करो आणि हे मराठी वाङ्मयाचे पाग फिटोत!

---

श्री

# मराठी साहित्य संमेलन, बडोदें.

## अधिवेशन १९ वें,

---

सन १९३४.

---

विभाग :

इतिहास.

अध्यक्ष :

## प्रो. दत्तो वामन पोतदार

## यांचें भाषण.

---

**सर्व इतिहासप्रेमी सज्जन हो,**

प्रथम मी बडोदे मराठी साहित्यसमेलनाच्या स्वागतमंडळाचे इतिहासविभागाध्यक्ष ह्मणून माझी निवड करून बहुमान केल्याबद्दल आभार मानतो. या निवडीची जबाबदारी स्वागतमडळावर आणि स्वीकाराची जबाबदारी मजवर आहे माझा अधिकार इतिहासविषयात केवळ अल्प आहे सतवाङ्मयेतिहास, अथवा मराठी रियासतेतिहास, अथवा शिवचरित्रकार्य असे प्रचड उद्योग हाती घेऊन तदर्थ ज्यानी आपले देह झिजविले आहेत असे थोर कर्मवीर वगळून स्वागतमडळाने मजसारख्या पाइकालाच आधिपत्य स्वीकारण्याची आज्ञा केली ती पाइकधर्माला अनुसरून पाळण्याचा प्रयत्न करणें एवढेच आपले काम असें समजून मीं स्वीकारली आहे. माझा हा गौरव म्हणजे मी ज्या संस्थेचा कार्यवाह आहे व ज्या गुरूचे मी स्मरण सतत करतो त्याचाच गौरव आहे असें समजतो

मला स्वागतमडळाच्या इच्छेप्रमाणे हे आजचे भाषण आगाऊ लिहून काढून त्याचे हाती देता आले नाही यामुळे आलेल्या गैरसोयीबद्दल मी स्वागतमडळाची व आपली सर्वांची क्षमा मागतो.

आता आपण सर्व सज्जनानी मजला सर्व प्रकारें साहाय्य करून उद्दिष्ट कार्य सिद्धीस न्यावें अशी माझी प्रार्थना आहे.

## मित्रांचे मृत्यु.

इतिहासकार्यात रमलेले असे कित्येक मित्र या सालात मृत्युमुखी पडले त्याचा येथे सखेद उल्लेख करणे आपले कर्तव्य आहे असे मला वाटते (१) रा मुकुंदरावजी बर्वे, इंदूर हे निरलस असे इतिहासप्रेमी लेखक होते त्यानं हौशीने बरींच इंग्रजी मराठी पुस्तके लिहून प्रसिद्ध केली होती (२) श्री सरदार ख चि मेहेंदळे याच्यासारख्या बहुपठित विद्वान आता विरळाच आढळेल राजवाड्यानी त्याच्याच साहाय्यानें पुण्यास भारतइतिहास संशोधक मडळाची स्थापना केली. (३) रा कृष्णराव केळुसकर याचे छत्रपति शिवाजी महाराज याचे चरित्र व गौतमबुद्धाचे चरित्र हे दोन्ही ग्रथ मराठी वाङ्मयात उच्च दर्जाचे प्रौढ ग्रंथ म्हणून मान्यता पावलेले होते (४) चवथा मृत्यु भारतीय साम्राज्यकर्ते नाना पावगी याचा. हे साठी उलटलेले पक्के पंडित होते. (५) पांचवा मृत्यु

इंदूरचे रा अनंत नारायण भागवत यांचा पारसनिसांच्या नंतर पुणेंदप्तरांत प्रवेश मिळावा म्हणून यांची खटपट तीसपस्तीस वर्षांपासून चालू होती त्यावेळ त्यास यश आले नाही. तरी त्यांनी आपली या क्षेत्रांत काम करण्याची हौस टाकिली नाही फलटण, आंध, भोर, व इंदूर या संस्थानांत आश्रय मिळवून त्यांनी बरेंच उपयुक्त कार्य केले होळकरशाहीची साधनें प्रसिद्ध करण्याचें कार्य त्यांनीं आरंभिलें होते, ते आता आमच्या इंदूरकर मित्रमंडळाने पुढें चालविले पाहिजे हे मीं सुच-वावयास पाहिजे असें नाहीं वरील गतविद्वानांनी परिश्रमपूर्वक वाङ्मयेतिहासेवा करण्याचें जे उदाहरण आपणापुढे ठेविले आहे तें काळलाहि हिरावून नेता येणार नाहीं एवढेच या दुखांत समाधान आहे ! !

## क्षेत्रमर्यादा.

या संमेलनातील हा 'इतिहास' विभाग होय नुसते 'इतिहास' म्हटलें तर आपले कार्यक्षेत्र फार अफाट होईल. परंतु हे मराठी साहित्यसंमेलन आहे हे लक्ष्यात घेतले म्हणजे मराठी शब्दाने काहीं क्षेत्रमर्यादा आपोआप सूचित होण्या-सारखी आहे. मराठ्याविषयीं अथवा मराठी भाषेत ग्रथित होणारे अथवा मराठ्यांनी चालविलेले इतिहासविषयक परिश्रम असे काही स्वरूप त्या मर्यादेचे निश्चित करिता येईल. वरील तीन पर्यायांतील तिसरा प्रर्यायही या संमेलनाच्या कक्षेबाहेर ठेवणे बरें असे मला वाटते. राहिले दोन पर्याय या मर्यादा असे आपण समजू. स्वागतमंडळानें या विभागाच्या निबंधासाठी विषय सुचवितानाहि इतिहास व साहित्य अशा जोडसंबंधाची मर्यादा कल्पिली आहे, तीहि यासंबंधी काहीं अंशीं मार्गदर्शक होईल.

## कालमर्यादा

आपण 'ऐतिहासिक' आहोत. आपणास कालमर्यादा समजावी लागते निबंधकार किंवा चर्चिक यांना तशी मर्यादा काहीं आगाऊ संकल्पिलेली नाहीं प्रसंगानुसार सभेच्या संमतीने ठरविता येईल.

तूर्त या भाषणातील सिंहावलोकावनाच्या आवश्यक भागापुरती ती मर्यादा गतवर्षाची म्हणजे संमेलनीय वर्षाची अशी मी निश्चित केली आहे.

## स्थूल सिंहावलोकन.

गतवर्षी नागपुर संमेलनातच आमचे मित्र रा. आबा चांदोरकर व जोशी यानीं संपादिलेला '**लेखनालंकार**' हा संग्राह्य ग्रंथ प्रसिद्ध झाला. पेशवे दप्त-रांचीं दारें उघडूं लागल्यामुळे या ग्रंथाची रचना रा चांदोरकर यास सुलभतेनें

करिता आली. बरींचशीं हस्ताक्षरें दप्तर संपादकानीं निवडलीं होतीं व आणखी आपण स्वत आपल्या दृष्टीनें शोध करून व बाहेरीलहि भर त्यात यथावकाश घालून मराठी राजवटींतील अनेक लहानथोर सेवकाची हस्ताक्षरें रा. चादोरकर यानी छायाचित्ररूपाने आपणास दर्शनसुलभ करून या लेखनालंकारात आपल्या हातीं दिली आहेत. लेखनालकार हा शब्द द्व्यर्थी आहे. त्याचा ऐतिहासिक अर्थ लेखन ' अल ' म्हणजे पर्याप्त झाले असा आहे. अनेकाच्या लेखनाचे अलंकार जेथे एकत्र केलेले आहेत असा त्याचा दुसरा अर्थ होतो. पैकी पहिल्या अर्थानं सूचित होणारी ' पर्याप्ति ' आपणास मान्य करिता यावयाची नाही याचे कारण उघड आहे आपणास कितीतरी आणखी हस्ताक्षरें पाहिजे आहेत, आपले पोट भरून ' अलं ' म्हणजे ' पुरे झाले ' अशी पावती देण्यास आपण केव्हाच तयार होणार नाही अशी माझी खात्री आहे

रा. चादोरकर–जोशाच्या–या लेखनालकाराच्या सपादकाच्या–मताप्रमाणे सर्वांत बहुमोल अलकार म्हटला म्हणजे श्री छत्रपति शिवाजीमहाराज याचे म्हणून संपादकानीं ठरविलेले हस्ताक्षर होय श्री छत्रपति शिवाजी महाराज याना लिहिता येत होते ही गोष्ट आता सर जदुनाथ यानींहि मान्य केली आहे ! असें आहे तरी **श्री छत्रपतींचें हस्ताक्षर** अमुकच असें निश्चित सागण्याइतका पुरावा आपणापुढं आमचे मते नाही. शिवाजी महाराजाचे नावें सुटलेलीं सुमारें १०००/१२०० पत्रे आता आपणास उपलब्ध होण्यासारखीं आहेत तीं व इतर छत्रपतीचीहि पत्रे मुकाबल्यास घेऊन उलटसुलट परीक्षेनेंच हा मुद्दा कायम करतां आला पाहिजे म्हणजे पत्रावरून नियम व नियमाप्रमाणें पत्रे असा मेळ घालता आला पाहिजे. या कोडीतच छत्रपतींचें अक्षर धरता आले म्हणजे मनास कसलाहि सशय राहणार नाहीं म्हणून सपादकाची जरी आशंका फिटली तरी तशी सर्वांची फिटल्याशिवाय या बाबतींत कायमपणा येणार नाहीं या ग्रंथातील इतर कित्येक हस्ताक्षराबद्दलहि खात्री देता येणार नाही. अगदी भिन्न वळणाची दोन हस्ताक्षरें संपादकानीं एकाचींच म्हणून दिलीं आहेत आणि दोन व्यक्तीना मिळून लिहिलेल्या पत्रातील अल्याक्षर एकाच व्यक्तीचे म्हणून दिले आहे. अशा **संशयित बाबींची चर्चाच** व्हावयास पाहिजे, आणि ती ' जाणिक ' मडळीत बसून सर्व जिज्ञासूंसमक्ष झाली पाहिजे तसेंच प्रसिद्ध पुरुषाची जितकी विस्तृत लेखनें स्वहस्ताक्षरांकित अशीं मिळतील तितकी मिळवून त्याच्या छायाछबी घेऊन त्या प्रसिद्ध व्हावयास पाहिजेत तसा उपक्रम करण्यास साधने पुष्कळ मिळण्याजोगी आहेत, हे दर्शविण्यासाठी आज मी आपणासमोर विठ्ठल शिवदेव,

भाऊसाहेब, नाना फडणवीस, नानासाहेब पेशवे, मोरोपंत कवि, हरिपंत फडके, गवाई माधवराव, जानोजी भोसलेप्रभृतींची मूळ हस्ताक्षरें ठेवीत आहे ती आपण पाहावी असो रा चांदोरकर-जोशी यांनी आपणास ऋणी केले आहे एवढे मात्र नि संशय !

कालक्रमानेच बोलावयाचे म्हटले तर संमेलन संपताच नागपूर मुक्कामी एक

## वाङ्मयेतिहाससंशोधकमंडळ

स्थापन करण्याचा जो उद्योग झाला त्याचा उल्लेख आता केला पाहिजे आजपर्यंतच्या या मंडळाच्या उद्योगावरून हे बी रुजत चालले आहे असे म्हणण्यास चिंता वाटत नाही लवकर या बीजाचा वृक्ष होवो ! नागपुरास विद्या-पीठ आणि त्यात मराठीच्या मायेचीं माणसे आहेत यास्तव ही आशा बरीच साधार आहे असे आपणहि म्हणाल.

## महाराष्ट्राचे वैशिष्ट्य

अर्वाचीन इतिहासोपयोगी साधने छापण्याचा महदुद्योग जो गेल्या पन्नाससाठ वर्षांत सतत वाढत्या जोमाने महाराष्ट्रात फोफावत आहे तसा तो इतर कोणत्याही भारतीय प्रांतात फोफावलेला नाही **हा उद्योग हे महाराष्ट्राचे या शतकांतील संस्मरणीय वैशिष्ट्य** म्हणून सांगता येईल, किंबहुना अखिल भारतालाहि मार्गदर्शक होईल असे वाङ्मय प्रांतात महाराष्ट्राचे **एवढेच काम** दाखविता येईल कोशरचनेची जी प्रचंड परंपरा डॉ केतकरांच्या ज्ञान-कोशापासून सुरू झाली ती याच योग्यतेची असली तरी व्यापकपणें विचार केला असता ती इतिहासप्रांताशींच अधिक संलग्न आहे ! अर्वाचीन इतिहासविरचनेचा विषय घेतला तरीहि नुसती मराठी रियासतमाला घेतली तर तिच्या तोडीची ग्रंथ-माला दुसऱ्या देशी भाषांत दाखविणे कठिण जाईल

### १ साधनात्मक कार्याचा आढावा.

आता साधनग्रंथांत या सालांत काय भर पडली ते थोडक्यांत पाहू

साधनांत सतत भर टाकणारीं तीन मासिकें म्हटली म्हणजे भा इ. सं मंडळाचे त्रैमासिक. राजवाडे संशोधन मंडळाचे त्रैमासिक व सत्कार्योत्तेजक सभेचे रामदास आणि रामदासी मासिक. याशिवाय यवतमाळच्या शारदाश्रमाची वार्षिकें निघूं लागली आहेत, परंतु तीं साधनात्मक म्हणण्यापेक्षा संकलनात्मक किंवा विवेचक सदरांतच जास्त शोभतील.

भा इ म मंडळाजवळील **चंद्रचूड दप्तराच्या प्रचंड संग्रहांतून** शिंदेशाही इतिहासाला उपयोगी पडणारे कागद निवडण्याचें काम ग्वाल्हेर दरबार मार्फत होऊन त्याचा **पहिला खंड** दरबारनें प्रसिद्ध केला आहे, परंतु त्याचें संपादन श्री फाळके याचा नमुना पुढे ठेवून किंवा राजवाडे खंड १ चा नमुना पुढे ठेवून केले असते तर त्याची शास्त्रशुद्धता व दर्जाही वाढला असता. परंतु ग्वाल्हेर दरबारने या कामीं लक्ष घातलें आणि दरबारचें त्यावेळचे सरदप्तरदार (Inspector General of Records) रा. केशवराव डोंगरे यानी व त्यावेळचे गृहमंत्री (सुमत) श्री खासेसाहेब पवार यानीं या कामी उत्तेजन दिले त्यामुळें एवढे तरी पाऊल पुढे पडलें आशा आहे की, ग्वाल्हेर दरबार मराठी इतिहासाबद्दल आपले कर्तव्य यथान्याय उत्साहानें बजावण्यास नूतन श्रीमन्त महाराजाचे अमदानींत सरसावून पुढे येईल.

कै रा. ब. पारसनीस याच्या अविश्रांत परिश्रमानें सातारा शहरीं जे ऐतिहासिक संग्रहालय स्थापन झालें आहे त्यांतील निवडक कागद-पत्राचा एक खंड नुकताच **सातारा इतिहास मंडळानें** प्रसिद्ध केला आहे. हाहि उपक्रम अभिनंदनीयच होय आणि हा असाच पुढे चालविण्यात येईल अशी उमेद बाळगण्यास काहीं हरकत दिसत नाही.

## पेशवे दप्तर.

परंतु साधनग्रंथसंग्रहात सर्वांत मोठी भर घालण्याचा अलीकडील प्रयत्न म्हटला म्हणजे **पेशवे दप्तरांतील निवडक पत्रांचे ४५ खंड** हा होय. असें स्पष्ट म्हणण्यास चिंता नाही कीं, आजपर्यंत मराठी इतिहासासंबंधीं एवढी मोठी महत्वाची भर कधींच पडली नव्हती. अगोदर पेशवे दप्तर म्हणजे साधनाचा केवळ अद्वितीय साठा आहे. दुर्दैवानें त्याचें महत्त्व दर्शविलें असताहि काहं गैर-समजानें, काहीं अज्ञानामुळें, आजवर सरकारनें या संबधीचें कर्तव्य जसें करावें तसें केलें नव्हतें. पूर्वी कै. न्या. रानडे भांडारकरप्रभृतीनीं प्रयत्न केले त्यावेळीं वाड मावजी व पारसनीसप्रभृतींच्या साहाय्याने सुमारें १५/१६ खंड उपयुक्त माहितीने भरलेले असे प्रसिद्ध झाले हे खंड स्वत प्रसिद्ध करण्याची सरकारची इच्छा होती, परंतु लोकांकडूनच हें काम होणें बरें असे वाटून रानडेप्रभृति आमच्या पुढाऱ्यांनीं हे काम आपल्याकडेच मागून घेतले आणि पुढे अक्षम्य दिरंगाई होऊन १५/१६ खंड प्रसिद्ध होण्यास १५/१६ वर्षे लागलीं ! तथापि पारसनीस यांनीं खुषीच्या वागणुकीमुळें पेशवे दप्तरांत आपला राबता चालू ठेविला होता व त्यांतील

सुमारें ८ ते १० हजार कागद आपण निवडून नक्कल करून ठेवल्याचे ते सांगत. त्यांतलेच कांहीं इतिहाससंग्रहांत त्यांनीं प्रसिद्ध केले.

अधूनमधून साने, भानू व भा. इ. सं. मंडळ यांनीं या विषयाकडे क्वचित् लक्ष पुरविलें असले तरी सर जदुनाथ सरकार यांनीं हा विषय १९२१ त मुंबई मुक्कामीं नेटानें सरकारी दप्तरखानासभेपुढें ठेविला. इ. स. १९१९ सालीं हिंदुस्थान सरकारनें सरकारी दप्तरखाने ऐतिहासिकांस खुले करण्याविषयीचें आपलें धोरण जाहीर करून वर उल्लेखिलेलें तज्ज्ञ मंडळ नेमिले आणि या मंडळाच्या पहिल्याच बैठकीपासून पेशवे दप्तराकडे प्रत्यक्षअप्रत्यक्ष लक्ष पोंचूं लागल्याचे आपणांस दिसेल. पण सर जदुनाथ यांनीं १९२१ सालापासून या प्रश्नास जोराची चालना दिली. या अवाढव्य दप्तरखान्याचें ओटखत ( hand list ) तयार करण्याचें काम प्रचंड खर्चाचें होतें; या खर्चामुळेंहि सरकार कचरत होतें, पण खरें म्हटलें तर सरकारला योग्य व सच्चा सल्लाच या कामीं मिळत नव्हता! १९२५ सालीं दप्तरसभेची सरकारी बैठक पुण्यासच झाली व तेथें या प्रश्नाचा ऊहापोह अधिक झाला! सर जदुनाथ यांना आपले रियासतकार रावसाहेब गोविंदराव सरदेसाई यांची आंतून निकड होती हे सर्वश्रुतच आहे. अजूनहि सरकारची गैरसमजूत गेलेली नव्हती पण सरकार तपासणीची भाषा बोलूं लागलें. इ. स. १९२१ त सरकारनें विचारणा केल्यावरून भा. इ. सं. मं. तर्फे पेशवे दप्तराचें तपासणीचें काम मोफत करण्याचें लेखी आश्वासन आम्हीं सरकारास दिलें. त्यावेळीं आजच्या आपल्या संमेलनाचे अध्यक्ष रा. नानासाहेब चापेकर यांनीं आमच्या विनंतीवरून हे काम अंगीकारण्याचें मान्य केलें होतें. आणखी एकदोन सरकारी बडे नोकर आमच्या विनंतीस मान देऊन या कामीं साहाय्य देणार होते. शिवाय बिनसरकारी आम्ही मंडळी होतोंच!! परंतु पुढें एकाएकीं तें सर्व प्रकरण दप्तरी लागलें! आम्हींहि कांहीं त्याचा पिच्छा पुरवावा तो पुरविला नाहीं!

## दफ्तरनवीस नेमा.

पुढें पारसनीस यांचे मृत्यूनंतर सरकारनें पेशवे दप्तराच्या तपासणीचें काम करण्यास रावसा. सरदेसाई यांची नेमणूक द. म. रु. ६०० वर केली. वास्तविक एवढ्या प्रचंड दप्तराची निवड व त्यांतील उपयुक्त संग्रहाचें मुद्रण हें खरोखरच फार प्रचंड खर्चाचें, जिकिरीचें व कालावधीचें काम होतें. म्हणूनच प्रथम **दप्तराची एखादी संशोधकोपयोगी यादी** किंवा एखादी उपयुक्तशी

मार्गदर्शिका प्रसिद्ध करावयास पाहिजे होती. किंबहुना तसाच संकल्पही सरकारचा होता असें आम्हांस वाटतें परंतु पत्राची निवड, नकलण व प्रसिद्धीकरण या कामावरच रावसा सरदेसाई यांनी भर दिला यामुळे असे झाले कीं ज्या दृष्टीने संपादकांनी निवड केली तेवढीच सामुग्री जनतेपुढे आली, परंतु खुद्द पेशवे-दप्तराची लांबीरुंदी-खोली तपासून अतपार ठाव घेण्याची संशोधकास लागणारी सोय मात्र पाहिजे होती त्याच्या **दशांशहि झाली नाहीं.** वास्तविक असे बहुमोल भांडार हे **तज्ज्ञ दप्तरनवीसाच्याच ताब्यांत** यावें, म्हणजे कागदाचे आयुष्य वाचविण्याचें शास्त्र तो जाणत असल्यामुळें अवश्य त्या योजना तो करील आज एक दगडी इमारत व तेथें अग्निबाधानिवारणाची उत्तम व्यवस्था आणि रक्षकवर्ग एवढी सोय म्हणावी तशी आहे परंतु दप्तरशास्त्रदृष्ट्या जशी योजना बडोद्यासहि आज सुरू आहे तिचा मागमूसहि या अपूर्व दप्तरखान्यांत नाही कदाचित रावसा सरदेसाई यांनी लक्ष दिले नसेल, कदाचित सरकारनें त्याचा सल्ला मानला नसेल परंतु आम्ही वर सुचविलेली तजवीज ताबडतोब झाली पाहिजे दप्तरसभेच्या बैठकीत पाटण्यास आम्ही हा मुद्दा पुढे मांडला होता परंतु अध्यक्ष सर जदुनाथ यांना मुंबई सरकारच्या खालावलेल्या आर्थिक परिस्थितीची कळ येऊन त्यांनी तो मागे ठेवला ! ! मात्र ४५ खंड संपादून छापण्यासाठी एक लक्ष रुपयेपावेतों जो व्यय झाला असेल त्यासाठी मुबलक पैसा मुंबई सरकाराजवळ होता ! ! नावडतीचें मीठ आळणी ! दुसरे काय ?

हे कसेंहि असले तरी छापून प्रसिद्ध झालेले पंचेचाळीस खंड पाहिले आणि अवघ्या तीन चार वर्षांत हे काम पुरे झाले हेंहि लक्ष्यात घेतले म्हणजे संपादक रावसा सरदेसाई व त्यांचे मदतनीस आणि मुंबई सरकार यांचे आभार मानावे तेवढे थोडेच होतील हा उद्योग म्हणजे रावसा नानासाहेब सरदेसाई यांच्या अविश्रांत उद्योगाचें वंदनीय स्मारकच होय यांत शंका नाही आज सत्तरीच्या घरांत गेलेल्या नानासाहेबांचा निरलसपणा व कार्यनिष्ठा खरोखरच अपूर्व आहे आणि या त्यांच्या गुणामुळेच एकजात पचेचाळीस मावनग्रंथ एवढ्या तडफेनें प्रसिद्ध होऊं शकले ! जेथें सरकारी खात्याचे अहवाल कैक वर्षे मागसतात तेथे या प्राचीन पेशवे दप्तराच्या कामाचा उठाव एवढ्या त्वरेनें होऊन यावा याचें मुख्य श्रेय नानासाहेब यांसच देणें वाजवी होईल

या पंचेचाळीस खंडांत पुष्कळच महत्त्वाचा मजकूर प्रसिद्ध झालेला आहे इतिहास व साहित्य या जोडविषयांबाबत देखील पुष्कळ उपयुक्त माहितीचा

संग्रह या ग्रंथावळींत आढळेल किंबहुना पेशवाईच्या इतिहासातील अनेक प्रकरणाचे किती तरी तपशील आपणाला या ग्रंथावलीवरून समजून घेता येतील.

अशा या उपयुक्त ग्रंथावळींत **कांहीं वैगुण्यें** दाखविता आलीं तरी तीं इतकीं थोडीं आहेत कीं, तिकडे दुर्लक्ष करणेंच युक्त होईल. तथापि ग्रंथावलीला जोडलेल्या **सूचि फारच त्रोटक** असल्यामुळें शास्त्रीय दृष्टीच्या अभ्यासकास त्या असून नसल्या प्रमाणेंच आहेत छापील **पेशवे दप्तराची नवी विस्तृत एकीकृत व प्रमाणसूचि** प्रसिद्ध करणे अगत्याचे आहे.

सूचीकरणाप्रमाणेच इंग्रजी साराशाचें कामहि सदोष झाले आहे विराम-चिन्हाची योजना सामान्य वाचकाला उपयुक्त होण्यासारखी असली तरी त्यामुळ विपरीतार्थ होण्याची भीति काही अशी तरी वाढते, हे नाकारता येणार नाहीं. असो, निर्दोष असें या जगात काय आहे ? ग्रंथावळींतील या पुस्तकाच्या किमतीही सरकारनें फार जबर ठेविल्या आहेत तरी त्या उतरविण्याविषयी आपण ठराव करून सरकारास विनंति केल्यास कदाचित् सवलती मिळतीलहि.

## इतर मोठीं दप्तरें.

पेशवे दप्तरातच जो **इंग्रजी रेसिडेन्सी दप्तराचा भाग** सुमारें एकंदरीच्या तिसऱ्या हिशाएवढा आहे त्याचें काम यापुढे सरदेसाई व सरकार हातीं घेणार आहेत याबद्दल त्याचे आभार मानले पाहिजेत. **निजाम दप्तर** पेशवे दप्तराएवढेच प्रचंड आहे. ते लावून, खुले व्हावें व त्यातील निवडक माहिती प्रसिद्ध व्हावी हें कामहि पेशवे दप्तराइतकेच अगत्याचे आहे **पणजी गोवा दप्तरची** उपयुक्तता व महत्वहि वरील दोन दप्तरासारखेच आहे

## बडोदें येथेंहि दप्तरखाना

आहे. त्यात १६०० शकेचे पुढीलपासूनचे कागद आहेत बडोदे सरकारामार्फत काहीं साधनग्रंथ प्रसिद्ध होण्याचें काम चालू आहे. एक भाग नुकताच प्रसिद्ध झाला आहे परंतु हें काम जरा जलदीनें व्हावे असें सुचविल्यास बडोदे सरकार आम्हावर फाजील उतावीळपणाचा दोष ठेवणार नाहीं अशी आम्हास आशा आहे

इंदूर येथील दप्तर जळालें असलें तरी श्रीमंत तुकोजीराव महाराजाचे कारकीर्दींत विलायत वगैरे ठिकाणाहून होळकरशाहीच्या उपयोगाचा पुष्कळ पत्र-व्यवहार वगैरे नकलून आणण्यात आलेला दरबाराचे संग्रही आहे. परंतु त्याचे प्रसिद्धीची वगैरे काही योजना चालू असल्याचें दिसत नाहीं; तरी या कामी होळकर दरबारानें जागृत होणें अवश्य आहे

धार दरबाराने नुकताच एक महत्त्वाचा ग्रंथ प्रसिद्ध केला आहे तेथील हिस्टरी ऑफिसचे **श्री काशिनाथ कृष्ण लेले** हे ऐंशी वर्षाच्या वयोमानांत शरीर कुंडलाकृति झालें असताहि आपले काम नेटानें चालवित आहेत ही अभिमानाची गोष्ट आहे

ग्वाल्हेर दरबारचे माजी सरदफ्तरदार रा के ब. डोंगरे यांच्या प्रयत्नामुळे उज्जयिनी येथें **'प्राचीन संग्रहालया'** ची स्थापना करण्यात आली आहे. नवाच प्रारंभ आहे परंतु अभिनंदनीय आहे हा पुष्कळ वाढला पाहिजे रावब मुळे विद्याधिकारी यांची हि देखरेख यावर आहे यात कागदपत्राचा संग्रह नाहीं तो कांहीं ग्वाल्हेरीसच सुरू आहे.

इतर पुष्कळ संस्थानिकांनी आपापल्या संस्थानासंबंधी व एकंदर मराठी इतिहासासंबंधाने आस्था दाखविली पाहिजे इचलकरंजी, औंध व मुधोळ या संस्थानाच्या अधिपतींनी आपल्या संस्थानापुरते बरेंच अभिनंदनीय काम केले आहे. भोर, जत, अक्कलकोट वगैरे अनेक संस्थानांनी पुष्कळ करण्यासारखें शिल्लक आहे पटवर्धन दप्तराची शास्त्रीय व्यवस्था पटवर्धन संस्थानिकांनी तांबडतोब केली पाहिजे.

## घराण्यांचे इतिहास

हा एका दृष्टीने मोठ्या राष्ट्रीय किंवा सामाजिक इतिहासाचा पाया होय. असे घराण्याचे इतिहास जुळविण्याविषयीं बरेच प्रयत्न आपल्याकडे झालेले आहेत त्यात अलीकडे पडलेली भर म्हणजे पराजपे घराण्याचा इतिहास व मुधोळ घोरपडे घराण्याचा इतिहास ही होय दोन्हीं ग्रंथाच्या संपादनाशी आमचे प्रसिद्ध इतिहास विमर्शी संशोधक मित्र **दत्तोपंत आपटे** यांचा निकट संबंध आहे. किंबहुना मुधोळ घोरपडे इतिहासाचे तेच संपादक आहेत. हे दोन्ही ग्रंथ महत्वाचे आहेत. दोन्ही ग्रंथास जोडलेल्या विवेचक प्रस्तावनातून आपटे यांनी जे सिद्धान्त प्रतिपादन केले आहेत ते एकदम मान्य करता येण्यासारखे नाहीत मात्र आपटे यांनी आपले प्रतिपादन विद्वत्तापरिपूर्ण व तर्ककर्कश पद्धतीनें केले आहे. परंतु त्यांनी सिद्धान्ताच्या उभारणीला घेतलेला **पाया निरुंद आहे** आणि त्याचे मानाने सिद्धान्ताची इमारत जास्त रुंदावलेली वा उंचावलेली आहे एखाददुसरें घराणे किंवा एखाद दुसरी जाति घेऊन त्यावरून पराक्रम, व्यवसायातर वगैरे बाबत नियम बांधणे धोक्याचे ठरेल. पण असे असलें तरीं आपटे यांची बुद्धि कमावलेली आहे आणि त्यांच्या स्वभावाला संयमाची ओळख चांगली दाट असून

लिहिणें राजवेतील असल्यामुळे हा धोका फारसा बाधक होत नाही. साधन-संस्काराच्या दृष्टीनें

## मुधोळ साधनांची सजावट

फार काळजीनें व शास्त्रशुद्ध झालेली आहे खुद्द श्री. मुधोळकर महाराज हे जातीने या विषयात लक्ष पुरविणारे आहेत, आणि आपल्यासारख्याची योजना आपल्या घराण्याचा इतिहास लिहवून घेणेचे कामीं करून ' योजकस्तत्र दुर्लभ ' ही म्हण सार्थ असल्याचें त्यानीं पुन सिद्ध केले आहे.

**भाऊंच्या वीरकथा** या नावाचा एक छोटा ग्रंथ रा. जोशी यानीं लिहिलेला राजवाडे संशोधक मडळानें प्रसिद्ध केला आहे. रा. जोशी यानी पानिपत-भूमि स्वत पायानें हिंडून तेथे अजून जें गाण्याच्या, म्हणीच्या किंवा आख्यायिकाच्या रूपाने पानिपतविषयक वा मराठेविषयक अवशेष हाती लागले ते या पुस्तकात एकत्रित केले आहेत. रा जोशी काही इतिहाससंशोधक नाहीत किंवा पंडित नाहींत असे असताहि पूर्वजाच्या इतिहासाच्या अभिमानाच्या बळावर त्यानी जी ही सेवा केली आहे ती कौतुक करण्यासारखीच म्हटली पाहिजे

## भा इ सं मडळाचा प्रयत्न

खुद्द आमच्या भारतइतिहास संशोधक मंडळाकडून जे काही अल्पस्वल्प प्रयत्न सालगु ।। झाले त्याचा उल्लेख अखेरीस करतो.

श्रीसभाजी चरित्राचा व्यासग करणारे आमचे सूक्ष्मदृष्टि चिकित्सक संशोधक रा वासुदेवराव बेंद्रे यान ' गोवळकोंड्याची कुतुबशाही ' या नावाचा सपादन केलेला ग्रथ मडळानें स्वीयमालेत प्रसिद्ध केला या ग्रथाला जोडलेली कुतुबशाही सनावळी ही रा बेंद्रे याच्या परिश्रमाची उत्तम साक्ष होय कालाची एक मेख अगोदर पक्की ठोकली गेली म्हणजे तीवर इतर साधनाचे दीप उजळणे सोपे होते. त्या दृष्टीने रा. बेंद्रे याचा प्रयत्न वाखाणण्यासारखा आहे आपले म्हणणे पसरून न माडता, आवरून माडण्याची कला रा बेंद्रे जर हस्तगत करून घेतील तर त्याच्या परिश्रमाचे अधिक चीज होईल

तसे म्हटले तर भा. इ. स सभाचे द्वारा दर पधरवड्याला काहीना काही भर आपल्या जवळील साधनात पडत असतेच त्यात अलीकडे सातारचे श्री विष्णुपंत करदीकर यानी उत्खननाची शाखा जोडून पर्वतीच्या प्रसिद्ध देवालयावर चालविलेलें उत्खनन नि संशय कौतुकावह आहे तें अजून चालू आहे. त्यामुळे आजच त्यासंबंधी अधिक लिहिणे प्रशस्त नाही

आपल्या या संमेलनाच्या

## शुभ मुहूर्तावर तीन नवीन साधनग्रंथांची

भर भा. इ. स. मंडळातर्फे पडत आहे. हे ग्रंथ आपल्या परवानगीने मी आज प्रकाशित झाल्याचें जाहीर करतो. पैकी पहिला ग्रंथ म्हणजे मंडळातील सुप्रसिद्ध कुशल संशोधक आणि पेशवेदप्तरतपासणीनंतर रावसाहेब सरदेसायांचे उजवे हात रा. कृष्णाजीपंत पुरंदरे मास्तर यांनी संपादिलेला **पुरंदरे दप्तराचा नवा तिसरा खंड** हा होय. या खंडात श्री. माधवराव बल्लाळ पेशवे यांचीच कारकीर्द ग्रथित झालेली आहे. काही शिवकालीन साधनेहि आहेत. हीं साधनें तर उपयुक्त आहेतच, परंतु या साधनग्रंथाला रा. पुरंदरे मास्तर यांनी जोडलेली सखारामबापूंच्या समर्थनपर प्रस्तावना तीहि वाचनीय झाली आहे. साधार प्रतिपादिलेली कोणचीहि उलटसुलट मतें मांडण्यास विद्वत्समंथेत अवसर पूर्ण वाव मिळाला पाहिजे. पुरावा नानांचें मंडण करो की बापूंचें करो, त्याचा इतिहासकाराला पर्वा काय ? सत्य शोधणें व प्रतिपादणें हें त्याचें काम. मग कोणी तुष्ट होवो किंवा रुष्ट होवो !

बाकीचे दोन्ही ग्रंथ सारस्वतात मोडतील. एकात **कृष्णदयार्णवाची स्फूट कविता व वेदस्तुति** छापली आहेत. यात अगदीं नवा असा भाग थोडा आहे. पुनर्मुद्रणच असें आहे. पण पुनर्मुद्रित केलेला भाग आज दुर्मिळ झालेला होता इतकेंच ! मोगलाईतील रा. काटे वकील यांना या ग्रंथाच्या प्रसिद्धीचें श्रेय आहे. नाशिकच्या हरिवरदेची कल्पना आता यावरून बऱ्याच जिज्ञासूंस करितां येईल.

तिसरा ग्रंथ **शिवदिनकेसरीनाथकृत ज्ञानप्रदीप** हा होय. नाथपरंपरा ही एक फार मोठी परंपरा मराठा सारस्वतांत मोडते. श्री ज्ञानेश्वर हे तिचे अध्वर्यु समजले जातात. त्या नाथसंप्रदायाची तत्त्वें व कार्य यांची ओळख आपणास काहीच नाही म्हटले तरी चालेल. अभ्यासकांस ती व्हावयास पाहिजे आहे व हाच या अप्रसिद्ध ग्रंथाच्या मुद्रणाचा मुख्य उपयोग. अनायासें दोन्ही ग्रंथ हातीं एकत्र पडतील तेव्हा वाचकांना **थोडा मौजेचा विचार तुलनेनें** सुचविण्यासारखा आहे तो येथे दाखल करितो.

कृष्ण दयार्णव यांचा जन्मशक म्हणजे शिवराज्यारोहणाचा शक १५९६ हाच. दयार्णवसमाधि शके १६६२. उलट शिवदिनाचा जन्म शके १६२० व समाधि १६९६ ! दयार्णव हा शिवकालीन परंपरेंतला आणि शिवदिन पेशवेकालीन

परपरेंतला दोघाचीं मध्ये गाठ पडलेली—चागलो प्रौढपणो म्हणजे एक साठींत गेलेला असता दुसरा चाळिशींत ! परंतु त्याच्या विचारातील अतर पाहा—एक कर्मठपणाच्या कडकपणामुळे अत्यंजास श्रुतीचे शब्द ऐकविण्यास व त्या श्रुतीवर प्राकृत व्याख्यान करण्यास कचरतो, तर दुसरा 'ज्ञानकाडात' हा विटाळ बाधत नाही असें सागून अंत्यजानी केलेला पोतेभरणा तेवढा कसा चालतो म्हणून टोमणा मारण्यास व यावनी फारसी भाषेतहि वेदात सिद्धान्त ग्रथित करता येतो इत्यादि उदारमते धिठाइने पुढे माडतो याचे कारण थोडा विचार केला असता ध्यानी येईल पहिल्याच्या मतभरणीचा काळ व दुसऱ्याचा तोच काळ या काळाच्या स्वरूपातच परिस्थिति विलक्षणपणे बदलली, आणि हा बदल राजकीय क्षेत्रातही स्पष्टपणे प्रतीत झालेला दिसतो. पहिल्याचा पिड शिवकाळातील देवाब्राह्मणाच्या राजवटीत व ती राजवट गनिमा पोटतिडीकीने राखण्याच्या काळी पोसलेला तर दुसरा पेशव्यानी बादशाही सनदा मिळवून नवे पातशाही धोरण आखलेल्या काळात वाढलेला ! राजकीय परिस्थितीचा राष्ट्राच्या अनेक अगावर फार मोठा परिणाम कसा घडतो याचे हे वरील उदाहरण मार्मिक आहे असे आम्हास वाटते.

तजावर येथील संग्रहालयातील मोडी कागदपत्राचा परिचय करून देणारा एक लहानसा परंतु उपयुक्त निबंध रा. शेलवणकर यानी लिहिलेला मद्रास युनिव्हर्सिटीने प्रसिद्ध केलेला आहे त्यात काही माहिती बोधप्रद व मनोरंजक आहे मोडी वाचनाचा बिनचूकपणा यात याहून अधिक दिसला असता तर आनंद वाटला असता येणेप्रमाणें साधनप्रकरणीचा आढावा आहे.

## रचनात्मक इतिहासकार्याचा आढावा.

साधन किंवा साधनप्रधान प्रमुख ग्रथाचा विचार येथवर केला. यापुढे **विरचन वर्गातील** ग्रथाचा विचार कर्तव्य आहे

या वर्गांत कित्येक प्रयत्न व्यक्तिश व कित्येक प्रयत्न संघश चाललेले आहेत. व्यक्तिशः चाललेल्या प्रयत्नात बुलढाण्याचे सुप्रसिद्ध **रा यादवराव माधव काळे** याचा प्रयत्न गेल्या सालीं विशेष उल्लेखनीय असा झाला असे म्हणता येईल. वऱ्हाडच्या विस्तृत इतिहास लोकास सादर केल्यानंतर रा यादरावजींनी **नागपुरचा इतिहास** पुरा करण्याचा संकल्प केला व तो आधिव्याधींना न जुमानतां तडीसहि नेला याबद्दल त्यास धन्यवाद समर्पण केलेच पाहिजेत. भडक भावनांचा अभाव हा रा यादवरावजीच्या लिखाणांतील विशेष होय असे आमचे मत आहे. प्रसिद्धाप्रसिद्ध पुराव्यांचा विचार समतोलपणे

करून एक साधेंसुधें सरळ चित्र समाजापुढें ठेवणें एवढाच हेतू रा. यादवरावजींनी आपल्यापुढें ठेवलेला स्पष्ट दिसतो. **डॉ केतकर यांनीं प्राचीन महाराष्ट्राचा इतिहास** लिहिण्याचा चालविलेला प्रयत्न हा विरचनापुरता तरी वैयक्तिकच म्हणणें योग्य होईल हैद्राबाद संमेलनाचे वेळी त्यानीं सातवाहन पर्वाचा इतिहास प्रसिद्ध केला होता. परंतु तो पुढें सुधारून पुन लिहिण्याचें त्यानीं ठरविलें तो नवा ग्रंथ लिहून प्रसिद्ध केल्याचें नुकतेच आम्ही वाचले त्यामुळे आम्हास इतक्यातच त्याबद्दल काही लिहिता येत नाहीं परंतु डॉ केतकर याचें बौद्धिक सामर्थ्य, त्याची पल्लेदार अंतर्भेदी दृष्टि याचा जो अनुभव आपणास आतापावेतो आला आहे त्यावरून त्याचा हा नवा प्रयत्नहि महत्त्वाचा व उपयुक्तच ठरेल यात काहीं संशय नाहीं

अगदीं रेखीव रचनात्मक असे जरी त्याचे स्वरूप नसलें आणि ज्याला साधनात्मक तर म्हणणें शक्य नाहीं असा महत्त्वाचा उल्लेखनीय ग्रंथ म्हटला म्हणजे **नगरवाङ्मयोपासक मंडळानें** प्रसिद्ध केलेला खंडद्वयात्मक '**ज्ञानेश्वर दर्शन**' हा ग्रंथ होय देवापुढें ठेवलेल्या नारळात जसे लहानमोठे ओलेगोटे सर्व प्रकार आढळतात तसाच काहींसा प्रकार या ग्रथाचा आहे आणि अनेक लेखकांनी मिळून रचलेल्या ग्रथाचें स्वरूप असेंच असणे अपरिहार्य आहे साधनात्मकाच्या मानानें

**रचनात्मक इतिहासकार्य फारच कमी**

झालें आहे. रा. सरदेसाई, वैद्य याच्यासारख्याची उदाहरणें पुढें असतानाहि तरुणानी तो कित्ता गिरविण्यास अहमहमिकेनें कां पुढें येऊं नये हा विचार करण्यासारखा प्रश्न आहे साधनाचे क्षेत्र नित्य वाढते असल्यामुळे रचनेचा माड वारवार बदलावा लागतो यामुळें तें काम पूर्वींपेक्षा अधिक जबाबदारीचें होत आहे यामुळेंच या शाखेकडे तरुण विद्वानाचे दुर्लक्ष होत असावे. एवढा रजपुताचा उद्दीपक इतिहास, पण त्यावर 'लोकहितवादी' नीं जो टॉडसारूप ग्रंथ प्रसिद्ध केला त्याच्यापुढें एक रेसभरही पाऊल वैद्याशिवाय कोणी टाकलें नाही आणि आतातर लोकहितवादींचा तो ग्रंथहि दुर्मिळ झाला आहे! मग तामिळ नाडूचा इतिहास कोणी मराठींत वर्णिला नाहीं हे सागावयासच नको गुजराथचा इतिहास, सौराष्ट्राचा इतिहास, बडोदें राज्याचा इतिहास इत्यादि पुस्तकें एकदा झालीं तीं होऊन गेलीं. तिकडे पुन कोणी फिरलेंही नाही!!

मोगलशाहीच्या ऱ्हासावर जदुनाथानी इंग्रजींत दोन खंड प्रसिद्ध केले आहेत. मोगली राज्यपद्धतीवर त्यांचा एक वाचनीय ग्रंथ आहे. परंतु तसे काहीं मराठीत

कोणी लिहीत नाही प्रो अनंतराव अळतकरांनी मुकुंद राष्ट्रकूटासंबंधी किंवा डॉ सालेटीर यांनी विजयनगरसंबंधी जे विद्वत्तामंडित सुंदर ग्रंथ लिहिले आहेत त्याचा भाषांतररूपाने देखील आस्वाद मराठी जनतेस मिळत नाही इतके आपले स्वकीयाकडे दुर्लक्ष आहे ! ' नवीन स्वतंत्र रचना राहिली पण भाषांतर तरी ? असल सोडले, नक्कल तरी निदान ? बडोद्याचे भाषांतरखाते उत्कृष्ट कार्य करीत आहे त्यांना ही उणीव दूर करण्याविषयी प्रार्थना केल्यास वाया जाणार नाही असे वाटते

जगाच्या अनेक देशांतील घटनांचे नानाविध इतिहास परकीय भाषांत शेकडो प्रसिद्ध होतात ' परंतु मराठीत एखादाच **नारायण हरी आपटे अमेरिकेच्या इतिहासाकडे** आपली लेखणी वळवितो ' प्रो पेंडशाचा महाराष्ट्राचा सांस्कृतिक इतिहास किंवा आपट्यांचा अमेरिकेचा इतिहास असे उपयुक्त ग्रंथ प्रसिद्ध करण्याचे श्रेय मिळविणारी एखादीच

**' नवभारत ग्रंथमाला '**

मराठीत चमकते ' अशी या रचनात्मक शाखेची कथा मोठ्या खेदाने आपणासमोर खेदाने निवेदन केली '

इतिहासलेखन पद्धतशीर व्हावयाचे असेल तर त्यासाठी **आधीं** तद्विषयक **सामग्रीचे संकलन** काळजीपूर्वक व्हावयास पाहिजे. तसे प्रयत्न आपल्यामध्ये सुरू झाले आहेत ही फार आनंदाची गोष्ट आहे डॉ केतकर यांस या उपक्रमाचे अग्रेसरत्वाचे श्रेय दिले पाहिजे त्यांनी प्रथम ज्ञानकोशाची सिद्धता करून **संकलीकरणाचें युग सुरूं केलें** नंतर त्यांचे अनुकरण होऊन शब्दकोश, चरित्रकोश, धर्मकोश, व्यायामकोश, व्यवहारकोश, असे प्रयत्न एकामागून एक महाराष्ट्रात चालू झाले आहेत त्यात व्यायामकोशप्रसिद्धीचे श्रेय बडोद्यास श्री आबासाहेब मुजुमदार यांच्या कृपेने मिळत आहे ही गोष्ट या नगरवासीयास खचित भूषणास्पद आहे कोशमंडळाप्रमाणे श्रीसंभाजीचरित्र कार्यालय आनंदवनभुवनग्रंथमाला इत्यादि प्रयत्नहि अभिनंदनीय होत

## पुढील कार्याच्या सूचना.

मागे सांगितलेच की सर्वांत प्रथम साधनें शोधली पाहिजेत या साधनांचे अनेक प्रकार आहेत पत्रे, चित्रे, शस्त्रे, आख्यायिका, लोकचालीरीति देवधर्म, इत्यादि सर्वांचा समावेश साधनांत होतो हे **संशोधन** झाले म्हणजे साधनांचे

**संग्रहण** करावें लागते सर्व संग्रहीत केलेली साधने **संरक्षून** ठेवणेंहि अवश्य आहे कारण ज्या ज्या अभ्यासकाला जरूर पडेल त्याला मूळ पाहून आपली खात्री करून घेण्यास किंवा आपल्या सूक्ष्मदृष्टीनें पूर्वी समजून न आलेले नवे विशेष दाखविण्यास सवड मिळालीच पाहिजे अशी **संरक्षणाची** सोय न केल्यास ज्ञानाची प्रगति खुंटेल कारण एकाच्याच हातून उपलब्ध साधनांचाहि पूर्णतया परामर्ष होणें शक्य नसते साधने कालक्रमानुसार व विषयवार लावल्याशिवाय तीं आपले काम करू शकत नाहीत अर्थात सर्व साधनांचे **वर्गीकरण व सूचीकरण** ही करावींच लागतात म्हणजे १ संशोधन, २ संग्रहण, ३ संरक्षण या पायऱ्या अगदी क्रमानें येतात आणि लगेच त्याच्यापुढे ४ वर्गीकरण व ५ सूचीकरण या पायऱ्या येतात या पाच पायऱ्या ओलांडल्यावर **संकलनाची सहावी** पायरी चढता येते मागील साधनांच्या साहाय्याने जेथले जेवढे विभाग लौकर नीट जुळत असतील तेथले तेवढे भाग जुळविणे हेच भागसंकलन होय आणि याच्याच योगाने खंडप्रबंध-Monographs-तयार होतात. या खंडप्रबंधाच्या साहाय्यानेच पुढे **अखंड इतिहासदेवाची मूर्ति** उभवावयाची असते. जेथें साधनांच्या अपुरेंपणामुळे अधलेमधले भाग किंवा अवयव किंवा अवयवांश जुळत नसतील तेथें अक्कल खर्चून, कल्पना लढवून ती उणीव पुरी करून घ्यावी लागते ही कल्पना लढविण्याची शक्तिही अभ्यासाशिवाय वाढीस लागणे शक्यच नसते- जगातील अनेकविध घटनांचे सिद्ध इतिहास, मुळापासून तपासून पाहून जी तुलनात्मक दृष्टि अंगी येते ती या कामीं फारच अवश्य असते. उत्तम व निर्दोष तर्कशक्ति, तुलनात्मक अभ्यास आणि उपलब्ध साधनांचे सांगोपांग ज्ञान ही ज्यांपाशी असतील त्याजजवळ जर ठायींची प्रतिभा जागृत असेल व न्यायबुद्धीच्या व सत्यप्रीतीच्या ताजव्याची दांडी हातात धरून माप टाकण्याचें योगसाधन किंवा कर्मकौशल त्याने संपादन केले असेल तर **असा पुरुष ' इतिहासाचार्य ' या** थोर पदवीस खचित पात्र झाल्याशिवाय राहणार नाही. इतिहासविरचन करताना आपल्या शक्त्यनुरूप वर्णित घटनांचा अर्थहि वाचकांस समजावून सांगणे लाभप्रद असते. या कामासाठी लागणारी स्थितप्रज्ञता ज्यांचे अंगी आली असेल त्याने केलेलें **संदर्शन** ( interpretation-viewpoint ) हा एक महादीपच होय यात शंका नाही अर्धकच्च्या माणसाने किंवा विकारावेशाचे भरात केलेलें संदर्शन हे विषमदर्शन होते व त्याने अज्ञानाचा बुद्धिभेद मात्र होतो

आपणा मराठ्यांच्या इतिहासापुरतेच बोलावयाचे म्हटले तर असा इतिहासऋषि किंवा स्थितप्रज्ञ द्रष्टा कोणी निर्माण झालेला नाही. किंबहुना या

दृष्टयाच्या अवताराची पूर्वतयारीहि अद्यापि नीटशी झालेली नाहीं. त्यामुळें द्रष्टेपणाचीं कित्येक अंगें ज्यांचे ठायीं अपूर्वतेनें विलसत होतीं असे जे राजवाडे यांसहि साधनसंग्रहसंशोधनादि पूर्वतयारीच्या कार्याकडेच स्वतः वळून इतरांस वळवावें लागले मात्र 'आत्मिक' इतिहास म्हणजे काय याची खरी कल्पना त्यांस उत्तमोत्तम झाली होती. तेवढा व तसा पुरुष दुसरा कोणीहि आपणांत झाला नाहीं. आपण संशोधन बऱ्यापैकीं चालविलें आहे संग्रहण व संरक्षण याचीहि सोय पुणें, धुळें, सातारा, यवतमाळ वगैरे ठिकाणीं बऱ्यापैकी केली आहे. सरकारें व संस्थानें यांतहि इष्ट हालचालींना प्रारंभ झाला आहे. परंतु वर्गीकरण व सूचीकरण झालें नसल्यामुळें हल्ली खऱ्या अभ्यासकाला अडूनच बसावें लागत आहे. नुसत्या **साधनग्रंथांची एक सशास्त्र यादी** देखील आपल्याजवळ आज नाहीं. आमचे मित्र रा. वाकसकर वगैरेंनी याच बडोद्यांत एक चालचलाऊ यादी केली होती; तीहि आतां जुनी झाली. तेव्हां **उपलब्ध व प्रकाशित साधनग्रंथांची एक वर्णनात्मक व मार्गदर्शक यादी,** वर्गीकृत साधनांचीं कोष्टकेंही जोडलेली अशी, प्रथम प्रसिद्ध व्हावयास पाहिजे. भा. इ. सं. मंडळातर्फे लवकरच-म्हणजे जुळल्यास रौप्यमहोत्सवाच्या प्रसंगीं–अशी यादी तयार करण्याचा विचार आहे. अर्थात् जितके विद्वान् यांत सहकार्य करतील तितकें तें काम सुलभ होईल. आर्थिक साहाय्यहि लागेल तें जर बडोदें सरकार किंवा म. सा. परिषद् किंवा सहविचारिणी सभा यांचेकडून मिळेल तर अधिक त्वरा ह्या कामीं करणें आम्हांस शक्य होईल. श्री. शिवचरित्र कार्यालयातर्फे पुण्यास श्री. छत्रपतींच्या इतिहासाबाबत 'पत्रसारसंग्रहा' चे जे दोन खंड प्रसिद्ध झाले ते या सूचीकरणाच्या दृष्टीनें फारच महत्त्वाचा टप्पा गांठल्याचे निदर्शक होत. श्रीसंभाजी चरित्रकार्यालयातर्फेहि तसा उद्योग चालू आहे. चरित्रकोशकार्यालयाचे श्री. चित्रावशास्त्री यांनींहि असाच उद्योग उत्साहानें चालविला आहे भा. इ. सं. मंडळाचा पंचविशीचा रौप्यमहोत्सव साजरा व्हावयाचा आहे, त्यावेळीं मंडळाच्यापुरती तरी अशी एक सूचि तयार करविण्याची खटपट आरंभिली आहे. सांगण्याचा मुद्दा इतकाच कीं, रियासतकारांना आपली रियासत लिहितांना एकट्यापुरत्याच टांचणवजा सूचि करून असहाय स्थितींतच कसेंबसें काम उरकावें लागलें; तशी अडचण 'पुढिलांची' होऊं नये यास्तव हें बृहत्सूचीकरणाचें कार्य आतां विलंबावर टाकणें आत्मघातकीपणाचें व प्रगतिविघातक ठरेल असा इषारा देणें प्राप्त आहे व याचा या सभेनें अवश्य विचार करावा अशी विनंति आहे.

आता **आमचीं विद्यापीठें** हि फार दिवसांची **सुखनिद्रा** सोडून आपले डोळे किलकिले करून इतिहासविषयाकडे पाहूं लागलीं आहेत कित्येक तर अंथरुणावर उठून देखील बसलीं आहेत व कित्येक पुढच्या तयारीलाहि लागलीं आहेत. **आमचें मुंबई विद्यापीठ अजून साखरझोपेंतच आहे** क्वचितच एखादे वेळीं फारच हाका मारल्या तऱ्हा जरा जाग आल्याची चिन्हे तें दाखवितें, परतु ही जाग क्षणिकच ठरते ! ' इतिहासाचे प्रबंध ' लिहून एम् ए पदवी देण्याचा उपक्रम आमच्या विद्यापीठानें सुरू केला, परतु आता त्यातील ' वर्गीकरण ' काढून टाकण्याची त्याच्यावर पाळी आली ! अशी ढिलाई त्या त्यात त्यानें चालू दिली असो तरी पण ' प्रबंध ' प्रथा सुरू झाली हें आम्ही सुचिन्ह समजतो हे **प्रबंध मराठीप्रभृति देशी भाषांत** लिहू देण्याचीहि मुभा मिळणे अवश्य आहे, आणि तशी शिफारस हे संमेलन करील अशी आम्हाला आशा आहे इग्रजी व पांडित्य यांचे आम्हीच मांडलेले मनोमय समीकरण खोटें पाडण्याची तिडीक आम्हालाच अजून उत्पन्न झाली नाहीं तेथे दुसऱ्यास काय बोल लावावा ?

हे ' प्रबंध ' अर्थात संकलनात्मकच असतात साधनवर्गीकरण व सूचीकरण नसल्यामुळें हे प्रबंध साहजिकच कनिष्ठ प्रतीचे राहणें अपरिहार्य आहे

आपला इतिहास आपणच लिहिला पाहिजे, आपला इतिहास आपणच शोधला पाहिजे. म्हणजे इतरांची मदत आपण घेऊं नये असे बिलकुल नाहीं. सरस्वतीची दालनें व मंदिरें सर्वांस अनिर्बंध खुलीं असलीं पाहिजेत. तथापि ज्याचीं त्याचीं स्वत.चीं कर्तव्यें म्हणून असतात, ती काहीं त्याचीं सुटत नाहींत. इतर काहीं करोत आपण काय केले पाहिजे तें वरील सूत्रात दर्शविलें आहे.

मराठ्याच्या इतिहासाबाबत आणखी एक असें लक्षात ठेविलें पाहिजे की, मराठ्यांचा व्याप सर्व हिंदुस्थानभर व क्वचित थोडा भारताबाहेर पसरला होता त्यामुळे मराठ्याच्या इतिहासाचा सर्वांगीण परामर्ष घेणें तर भारतातील सर्व प्रमुख प्रांत व सर्व प्रमुख भाषा यांशीं संबंध येणें अपरिहार्य आहे. त्यामुळे मराठी इतिहासाच्या **अभ्यासकाचें क्षेत्र भारताएवढें** व्यापक व काही अशीं भारताच्या सीमेबाहेरहि पसरलेलें आहे विलायतेंत, तसेंच फ्रान्स, जर्मनी, पोर्तुगाल हॉलंडप्रभृति देशातहि मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें विपुलपणें आढळून येतात. इतक्या भाषाशींही ऐतिहासिकाला संबंध ठेवणें प्राप्त आहे

अर्थात् एवढें अफाट व अवाढव्य काम सर्वांच्या सहकाराशिवाय सिद्धीला जाणें सर्वथा अशक्य आहे एकट्या नेबूरने किंवा मॉम्सेनाने युरोपियन इतिहासात जी कामगिरी केली, किंवा एकट्या राजवाड्यानी मराठी इतिहासात जी कामगिरी केली ती कितीही मोठी असली तरी एकट्यादुकट्या प्रचंडबुद्धि व प्रचंडशक्ति व्यक्तीच्या हातून देखील एकंदर व्हावयाच्या कामातला फारच अल्प अंश सिद्धीस जाणार म्हणून येथे सहकाराची फारच गरज आहे.

अद्यपि सर्व साधनेंहि शोधून झाली नाहीत खुद्द हिंदुस्थानातच अनेक ठिकाणी मोठमोठे **खाजगी संग्रह** पडलेले आहेत दक्षिण हैद्राबादमध्ये मौलवी हकीमसाहेब चादरघाट याजजवळील प्रचंड संग्रहाचे उदाहरण देण्यासारखे आहे आणि एवढे बलाढ्य व श्रीमान आलाहजरतांचे सरकार व त्यांचे स्वतंत्र उस्मनिया विद्यापीठ हीं तेथे प्रत्यक्ष जागृत असता या संग्रहाची उर्जितावस्था का होऊं नये तें कळत नाही.

खाजगी संग्रहाप्रमाणेंच **संस्थानी संग्रह** हेहि फार मोठमोठे, महत्त्वाचे व पुष्कळ अद्यापि ‘ अस्पृष्ट ’ आहेत ! पेशवे, निजाम गोवे, पांडिचरी प्रभृति **सरकारी संग्रह** म्हणाजे प्रचंड साधनसागरच आहेत, शिवाय **शोधसंस्थांजवळ असलेले संग्रह**-याप्रमाणे चार प्रकारच्या संग्रहात मिळून साधनें वाटलेली आहेत खेरीज पुष्कळ साधने हि अजून शोधली पाहिजेत पृथ्वीच्या पोटात लुप्त झालेली साधनेंहि उकरून बाहेर काढिलीं पाहिजेत.

नतर मागे सांगितल्याप्रमाणे शास्त्रीय दृष्टीने या संग्रहाचें संरक्षण, वर्गीकरण सूचीकरण **अगोदर** झाले पाहिजे **प्रसिद्धीकरण हें यानंतरच झालेलें बरें;** परंतु कित्येक प्रसंगी प्रसिद्धीकरणहि आधी करणें प्राप्त होते योग्य व शास्त्रीय रस्ता कोणता ते येथे सांगितले.

एखाद्या दप्तरखान्यातील सर्व साधने लावून तपासून त्याचे विभाग पाडून वगैरे संस्कार करून मगच त्याचे प्रसिद्धीकरण केल्यास मजकुराची संगति चांगली ठेवता येते ‘ ऐतिहासिक लेख संग्रहकर्त्यां ’ नी शक्य त्या प्रमाणात ही पद्धति स्वीकारल्यामुळें त्याच्या खंडाच्या सामान्य वाचकास व अभ्यासकांस दोघासहि अधिक उपयोग होतो.

दप्तराची व्यवस्था शास्त्रीयरीत्या लागली पाहिजे हे आता पुनः सांगावयास नकोच. परंतु या कामीं **कांही कायदे**-किंवा तत्सदृश निर्बंधहि करणे अवश्य आहे.

इतिहासोपयोगी साहित्य हिंदुस्थानाबाहेर जाऊं देता कामा नये आमच्या-कडील हजारो इतिहासोपयोगी वस्तु आज परदेशाच्या अजबखान्यांतून व दप्तर-खान्यातून संग्रहित केलेल्या आहेत याशिवाय शेकडो महत्त्वाची कागदपत्रे व वस्तु खासगी संग्रहातहि असण्याचा बळकट संभव आहे आमच्या दौर्बल्यापेक्षा आमचे अज्ञान व दुर्लक्ष्यच यास कारण आहे कागदपत्राची जोपासना इतिहासदृष्ट्या करण्याचे शास्त्र आम्ही पाश्चात्याकडूनच शिकलो म्हणून आम्ही त्यास धन्यवाद देतो, परंतु **आतां आम्ही आमची काळजी** घेण्यास चांगले समर्थ झालो आहोत ! आणि 'अज्ञना' ची ही कोठली काळजी घेण्याची रीत की, त्याची जिनगी नेऊन आपल्या घरात साठवून आपले घर भूषवावे ! तात्पर्य जसे लंकेचे 'सिंहासन' ब्रि. सरकारने **उदारपण** परत दिले तसे आमच्या भारताच्या इति-हासाच्या उपयोगी जी साधने येथूनच नेऊन तिकडे त्यानी संरक्षून ठेविली आहेत त **आमचीं आम्हांस परत मिळावीं** अशी मागणीहि आम्ही केली पाहिजे इतके दिवस तिकडील यड हवेत त्याचे काळजीपूर्वक जतन केल्याबद्दल **आभार** व्यक्त करून हे **पैतृक धन** आता आमचे आमच्या स्वाधीन करण्याने ब्रि सर-कारचा लौकिक जगात ासा वाढेल व आम्ही निरंतर त्याचे ऋणाईत कसे होऊन राहू हेहि त्याच्या नजरेस आणावे.

**सरकारी ऐतिहासिक दप्तरसभेच्या** सभासदानी बरीच उपयुक्त कामगिरी केली होती, परतु अलीकडे खर्चाच्या तगीच्या सबबीवर सरकारने या सभा बद ठेवल्या आहेत, त्या **पुनरपि सुरू** कराव्या अशी विनति सरकारास करणेहि अवश्य आहे

मराठ्याच्या इतिहासाच्या अभ्यासाच्या दृष्टीने शेदोनशे वर्षापूर्वीच्या **हिंदुस्थानचे नकाशे मराठींत** व्हावयास पाहिजेत हे काम गायकवाड सर-कारासारख्यांनी मनावर घेतले तर लवकर व उत्तम रीतीने सिद्धीस जाईल जुन्या ग्रथातील शेकडो नकाशाचे नुसते फोटो (छायाछबी) घेऊन अभ्यासकास देण्याची सोय झाली तरी केवढे कार्य होईल ! मुबई सरकारामध्ये जी एक नवी फोटोपद्धति शोधून अमलात आणण्यात आली आहे ती **फोटोस्टाटपेक्षांहि सरस व स्वस्त** आहे. यास्तव इतिहासाभ्यासकास या पद्धतीने फोटो-यथामूळ प्रति-मिळण्याची सुकरता मुंबई सरकारने नवे नियम करून व ते जाहिर करून अमलात आणावी असे केल्याने सरकारचा व जनतेचा दोघाचाहि फायदा आहे.

**जागजागीं अनेक बहुमूल्य चित्रसंग्रह** आहेत, त्याच्या छायाछबीचींहि रंगीत व साधी अशी चित्रसंग्रहाची पुस्तकें प्रसिद्ध व्हावयास पाहिजेत ऐतिहासिक व्यक्ति व स्थळें याचें यथार्थ दर्शन त्यामुळे सर्वांस सुलभ होईल आणि **खोटा तुकाराम, खोटा ज्ञानेश्वर, लोकांपुढे बे-धडक मांडण्याचा जो सपाटा** चांगले समजस लोकहि अज्ञानामुळे चालवीत आहेत, त्यासहि आळा पडेल दिल्लीचें लला परसदाम याचाच एक खासगी चित्रसंग्रह पाहिला तर केवढा मौल्यवान आहे ? या बाबतीत आम्ही एकवार ऐतिहासिक दप्तरखानासभेस सूचनाहि केली होती पण आपल्या कक्षेत ती येत नाहीं अशी भिति या सभेस वाटून तिने तिचा विचार केला नाही

असाच विचार अनेक ऐतिहासिक स्थळांचे संरक्षणाबद्दल करावयास पाहिजे समाधि, जागा, वाडे, हुडे, इत्यादि सर्व नीट संरक्षावयास पाहिजे पुष्कळ ठिकाणी शहरसुधराईच्या नावाखाली असे उत्कृष्ट ऐतिहासिक अवशेष अविचाराने पाडून साफ नाहीसे करण्यात येतात तसे करू नये मारामार विचार तरी करावा

असो, असे अनेक विचार या प्रसंगी सुचतात त्यातले काही आपणासमोर आज ठेविले आहेत आपण या सर्व प्रश्नाचा विचार करून सशास्त्र प्रगतीच्या मार्गावर **एकादें तरी पाऊल पुढें** टाकण्यास साहाय्य कराल तर पुष्कळच कार्य झाले असे ठरेल

या कामी मला पुढे करून वाटचाल करण्याचा चालकानी संकल्प केला तो त्याचा संकल्प सर्वांनी पूर्ण करावा अशी माझी आपणास प्रार्थना आहे 'न्यून ते पुरते आणि अधिक ते सरते' करण्यास काय निराळी विनति सज्जनास करावयास पाहिजे ?

---

# महाराष्ट्र साहित्य संमेलन १९३४

## अधिवेशन १९ वें.

### बडोदें, ता. २५,२६,२७, दिसेंबर, सन १९३४



## प्रकाशन—विभाग.

### अध्यक्षः—श्रीयुत दामोदर सांवळाराम यंदे यांचें भाषण.

---

जनरल नानासाहेब, भगिनींनो व बाधवहो,

यंदाच्या १९ व्या साहित्यसंमेलनातील पोटविभागापैकीं प्रकाशनकार्याच्या अध्यक्षाच्या जागीं मजसारख्या वयोवृद्ध माणसाची निवड करून मजवर जी जबाबदारी आपण टाकिली आहे, त्यांत आपला काहीं विशिष्ट हेतु असावा असे मला वाटते. तो हेतु म्हणजे मी आपला आहे, आणि माझ्या हातून जे अल्पस्वल्प प्रकाशनकार्य गेल्या ४० वर्षांत झाले, त्याचा उगम येथेंच व आपल्याच परमपूज्य महाराजांच्या कृपाछत्राखाली आणि आपल्याच सानिध्यात झाला आहे तेव्हा येथील व खालशातील ग्रंथप्रकाशनाचा अनुभव मला कसा आला, तो मी आपणापुढे माडावा, हाच आपला हेतु असावा. तसे असल्यास तो मला मान्य आहे, आणि आपल्या आज्ञेप्रमाणे मी आपल्या सेवेस हजर झालों आहें. आजपर्यंत ग्रंथप्रकाशनाच्या द्वारा जी अल्पसेवा मी केली, ती आपण गोड करून घेतली आहेच, व आजची सेवाहि हंसक्षीरन्यायाने गोड करून घ्याल अशी मला उमेद आहे.

### दु खप्रदर्शन

आजच्या प्रसंगीं मला माझ्या भाषणास सुरवात करण्यापूर्वीं एका अत्यत दु खद प्रसंगाचा उल्लेख केल्यावाचून राहवत नाहीं. तो अनिवार व असह्य दु खद प्रसंग म्हणजे आमच्या ग्रंथप्रकाशक मंडळीचे पूज्य अध्यक्ष, साहित्यक्षेत्रांतील उत्साही साहित्यभक्त, बडोद्यांतील अनेक लोकोपकारी शैक्षणिक संस्थाचे उत्पादक आणि आपणा सर्वांचे साह्यकर्ते व हितचिंतक मित्र, श्रीमंत संपतराव गायकवाड यांचा चिरवियोग हा होय. साहित्यकार्यांत श्रीमंत संपतराव यांचा उत्साह किती अपूर्व होता, हे मागच्या दोन्हीं साहित्य संमेलनप्रसंगीं आपणा सर्वांच्या निदर्शनास आलेच आहे. आपले परमपूज्य विद्याभिलाषि श्रीमंत महाराजसा यांनीं आरंभिलेल्या ज्ञानसत्रात, श्रीरामास जसा लक्ष्मण, त्याप्रमाणे

श्रीमंत संपतराव हे तनमनधनाने अहर्निश झटणारे साह्यकारी असत. त्यांच्या मृत्यूमुळे साहित्यक्षेत्रातील अनेक संस्थाची फार मोठी हानि झाली आहे. परंतु श्रीमंत महाराज साहेबाच्या कृपाछत्राखालींच गायकवाड वंशातील तरुण सुशिक्षितांकडून ती उणीव भरून निघेल अशी मला उमेद आहे. सर्वशक्तिमान प्रभु श्रीमंत संपतराव साहेबाच्या आत्म्यास चिरशांति देवो, व त्याच्या मृत्यूने झालेली ही हानि त्याचे सुविद्य चिरंजीव लवकरच भरून काढोत, अशी त्या जगन्नियंत्याकडे मी प्रार्थना करतों.

आजच्या प्रसंगीं अशीच उल्लेख करण्यासारखी दुसरी दु खद गोष्ट म्हणजे साहित्य-प्रकाशनाच्या कार्यात ज्यांच्याकडून मला नेहमीं प्रोत्साहनपूर्वक सहाय्य होत असे, व जे आमच्या ग्रंथप्रकाशनकार्याचे सल्लागार होते, असे माझे मित्र व साहित्यभक्त वऱ्हाडचे श्री श्रीपाद कृष्ण कोल्हटकर, पुण्याचे श्री. केशवराव बाळ, श्री. बापुराव आबेकर, श्री नानासाहेब पावगी, मुंबईतील डॉक्टर आनंदराव नायर, रा ब. मानाजी राजूजी, गुरुवर्य कृष्णराव अर्जुन केळूस्कर, श्री अनंतराव मोरमकर, दिनकरराव वर्दे, याचे मृत्यु होत कै कोल्हटकर, आबेकर, केळूस्कर, नानासाहेब पावगी व दिनकरराव वर्दे, हे ग्रंथकार या नात्याने आपणा सर्वांच्या पूर्ण परिचयाचे आहेतच. श्री अनंतराव मोरमकर यानीं कै रा सा मोरमकरांच्या पश्चात् विविधज्ञानविस्ताराची जबाबदारी आपल्या शिरावर घेऊन त्याची जोपासना केली, व कै केशवराव बाळ ह्यानी आर्यभूषण छापखाना व ज्ञानप्रकाश ह्या संस्थाच्या द्वारे केलेली निस्सीम सेवा सर्वश्रुत आहेच डॉ. नायर व रा ब. मानाजी शेठ हे साहित्यक्षेत्रात औदार्याने प्रसिद्ध आहेत. त्याच्या मृत्यूमुळे प्रकाशनक्षेत्राची एक प्रकारे मोठी हानि झाली आहे. पालीभाषेतील उत्तम ग्रंथाचे भाषातर करवून त्याच्या प्रकाशनाचें कार्य कै. डॉ. नायर यानी नुकतेच हाती घेतले होते, व त्या कार्यास लागेल ते द्रव्य-सहाय्य करण्याचे त्यानी व कै. रा ब मानाजी शेठ यानीं आश्वासन दिले होते परतु ही जयविजयाची जोडी दोनच महिन्याच्या अवधीत निर्घृण काळाने आमच्यातून ओढून नेल्यामुळे पालीभाषेतील प्रकाशनकार्यास मोठाच धक्का बसला आहे. तथापि कळविण्यास समाधान वाटते की, कै डॉ नायर याच्या जागी आलेले त्याचे शालक, बुद्धसो-सायटीचे अध्यक्ष डॉ. व्यंकटराव आणि रा ब मानाजी शेठचे चिं रघुनाथराव यानी तें कार्य मित्रमंडळीच्या सहाय्याने पुरे करण्याचे मनावर घेतलें आहे सर्वशक्तिमान प्रभु ह्या साहित्यसेवकाच्या व साहित्यभक्ताच्या आत्म्यास चिरशाति देवो अशी मी प्रार्थना करतो

## कार्यकारीमंडळाचे अभिनंदन

असो, या दुःखद प्रसंगाचा उल्लेख केल्यानंतर, आज करावयाची पहिली गोष्ट म्हणजे आजच्या संमेलनाच्या कार्यकारीमंडळीचे अभिनंदन करणे ही होय. म ाराष्ट्

साहित्यसंमेलनाचें हें १९ वें अधिवेशन पूर्वीं बडोद्यास झालेल्या दोन्ही अधिवेशनापेक्षां एका दृष्टीनें अधिक महत्वाचें होय, असें मला वाटतें. कारण पूर्वींचीं दोन्ही अधिवेशनें बडोद्याच्या नांवास शोभतील अशा रीतीनें जरी यशस्वी झालीं, तरी तीं एकांगी होतीं. त्यांत साहित्याच्या उपांगासंबंधींच्या स्वतंत्र विचारास वाव मिळाला नव्हता. ती उणीव ह्या प्रसंगीं कार्यकारीमंडळीनें भरून काढली, ही अभिनंदनीय गोष्ट होय. ती गोष्ट म्हणजे साहित्याच्या मुख्य संमेलनाबरोबरच त्याच्या अंगभूत असलेले, १ शास्त्रीय विभाग, २ नाट्यविभाग, ३ भाषाविभाग, ४ काव्यविभाग, ५ इतिहासविभाग, ६ कथाविभाग, ७ प्रकाशनविभाग, ८ संगीतविभाग, ९ तत्त्वज्ञान व समाजशास्त्रविभाग, अशा नऊ विभागांचा आजच्या प्रसंगीं स्वतंत्र विचार करण्याची केलेली योजना ही होय. ह्या सर्व विभागांचा साहित्यपरिषदेशीं पोट आणि अवयव याप्रमाणें निकट संबंध आहे. शरीराच्या सुदृढतेचा विचार करूं लागलें म्हणजे तदंगभूत असलेल्या, हात, पाय, नाक, डोळे, कान इ. दशेंद्रियांचा विचार करणें जसें भाग असतें, त्याप्रमाणेंच साहित्यरूपी शरीराचे वरील विभाग हीं मुख्य अंगें आहेत, व त्यांचा विचार यंदाच्या कार्यकारी-मंडळीनें करण्याचें ठरविलें आहे, याबद्दल ती अभिनंदनास पात्र आहे.

माझ्या मतें वरील नऊ विभागांबरोबरच चित्रकला ह्या विभागाचाहि त्यांत समावेश होणें जरूर आहे. साहित्य व चित्रकला या दोहोंचा निकट संबंध आहे. जेथें लेखकाची लेखणी चालेनाशी होते, तेथें चित्रकार आपल्या कुंचल्यानें ती उणीव भरून काढतो. पाश्चिमात्यदेशांत ग्रंथांत चित्रांचा समावेश करून ते अधिक चित्ताकर्षक करण्याचा प्रघात विशेष आहे, आणि अलिकडे आमच्या मराठी वाचकांतही त्याची आवड उत्पन्न झाली आहे. अशा प्रसंगीं चित्रकारबंधुभगिनींचेही सहकार्य होणें जरूर आहे असें मला वाटतें; व ही उणीव पुढील प्रसंगीं भरून काढण्याचा प्रयत्न होईल अशी मला उमेद आहे.

सन १९३२ सालीं करवीरनिवासी साहित्यभक्तांनीं १७ व्या अधिवेशनाच्या प्रसंगीं साहित्याच्या अंगभूत असलेल्या कांहीं मुख्य मुख्य विभागांचा स्वतंत्र रीतीनें विचार करण्याचा योग घडवून आणून साहित्यकार्यास विशेष वळण देऊन प्रोत्साहन दिलें होतें. गुदस्त सालीं मध्यविभागांतील संमेलनप्रसंगीं ह्या उपांगांच्या विभागांत स्वतंत्र विचारांस जरी वाव मिळाला नाहीं, तथापि नागपूरकरांनीं संमेलनास विशेष चालना देऊन जे ठराव पास केले ते अत्यंत महत्वाचे आहेत यांत संशय नाहीं. वटोदरनिवासी साहित्यभक्तांनीं अधिक जोमानें पुढें येऊन साहित्यक्षेत्रांतील अनेक उपांगांचा स्वतंत्र विचार करण्याचा योग घडवून आणला ही गोष्ट जशी विशेष अभिनंदनीय होय, तशीच यंदाचे संमेलनप्रसंगीं, नागपूरकरांनीं पास केलेले ठराव मूर्त स्वरूपांत आणण्याचा प्रयत्नहि ते यशस्वी रीतीनें पार पाडतील अशी मला उमेद वाटते.

## संस्थानिकांचें अभिनंदन

तिगस्त सालीं करवीर येथील १७ व्या साहित्यसंमेलन प्रसंगीं प्रकाशनकार्याचा अध्यक्ष या नात्याने केलेल्या त्या वेळच्या माझ्या भाषणांत मागील १६ संमेलनाचा आढावा घेताना खालशातील इतर शहरापेक्षा इंदूर, ग्वाल्हेर, हैद्राबाद, बडोदे, या देशी संस्थानातील संमेलने विशेष उत्साहानें कशीं झाली, व त्यांत बडोदे व इंदूर या दोन संस्थानाधिपतींनीं कसे प्रोत्साहन दिलें, याचे मी दिग्दर्शन केले होते. त्याचा थोडक्यात इत्यर्थ असा की, इंदूरच्या अधिवेशनाच्या प्रसंगीं इंदूरनरेश श्रीमंत सवाई तुकोजीराव महाराज होळकर यानीं साहित्यकार्यांत प्रत्यक्ष भाग घेऊन दहा हजार रुपयांची देणगी देऊन साहित्यपरिषदेस एक प्रकारे शाश्वत रूप आणलें, आणि बडोद्यातील पहिल्याच ( १९०९ सालात ) अधिवेशनप्रसंगी आमचे विद्याभिलाषी श्रीमंत सयाजीराव महाराज यानीं संमेलनकार्यात प्रत्यक्ष भाग घेऊन साहित्यप्रकाशनाच्या कार्याकरिता दोन लक्ष रुपयाचा निधि वेगळा काढून त्याच्या व्याजांतून ग्रंथप्रकाशनाचें कार्य अव्याहत चालू ठेवलें

औध संस्थानाचे अधिपति श्रीमंत बाळासाहेब पंडित प्रतिनिधि याची साहित्य-क्षेत्रातील कामगिरीहि प्रशसनीय आहे. त्याचे संस्थान जरी लहान आहे, तरी त्यानीं आपल्या संस्थानात अनेक कलास प्रोत्साहन देऊन त्या ऊर्जितावस्थेस आणल्या, सूर्य-नमस्कारासारख्या व्यायामाचा प्रसार केला, इतिहासावरील ग्रंथास मोठमोठ्या देणग्या देऊन त्याचे पुनरुज्जीवन केले, पुण्यातील महाभारतसंशोधनकार्यास एक लक्ष रुपयाची देणगी देऊन महाभारतासारख्या श्रेष्ठतम राष्ट्रीय ग्रंथाविषयीचे महत्व लोकनिदर्शनास आणले. उद्योग, व्यायाम, ऎतिहास, चित्रकला इ० उपयुक्त विषयावर स्वतः ग्रंथ लिहून मराठी वाङ्मयास आपल्या लेखणाने शोभा आणली, आणि ह्या विसाव्या शतकात आपल्या निधीचा विनियोग साहित्यकार्यासारख्या सत्कार्याकडे कसा करता येतो, हे पटवून दिले ह्याबद्दल श्रीमताचे हार्दिक अभिनंदन करणे जरूर आहे

## मध्यवर्ती प्रकाशन-संस्था.

कार्यकारी मंडळीने प्रकाशन कार्याचे तीन विभाग केले आहेत ( १ ) मध्यवर्ती प्रकाशनसंस्था, तिचे स्वरूप व शक्यता, ( २ ) लेखक व प्रकाशक यांचे संबंध, आणि ( ३ ) प्रकाशकाची वाङ्मयनिमितीस व शुद्धतेस मदत होईल का ? याप्रमाणें हे तीन विभाग आहेत. ह्या तीनही गोष्टी जरी वेगवेगळ्या दाखविल्या आहेत, तरी त्या एकरूप असून साहित्यक्षेत्रात जीवनरूप आहेत. त्यांचा विचार करण्यापूर्वी प्रकाशनक्षेत्रांतील गेल्या पन्नास वर्षांच्या माझ्या अनुभवाच्या दृष्टीनें माझे अल्प विचार मी आपणापुढें मांडतों.

## पन्नास वर्षांतील प्रकाशनकार्य.

पन्नास वर्षापूर्वी मराठी भाषेत एकहि दैनिक पत्र नव्हतें, ती उणीव प्रथम प्रभाकर व नंतर मुंबईवैभव या पत्रांनी मुंबईत भरून काढली. त्यानंतर पुण्यात ज्ञानप्रकाश व मुंबईत इंदुप्रकाश अशीं प्रागतिक मताचीं दोन जुन्यांत जुनीं साप्ताहिक पत्रें दैनिक स्वरूपात प्रगट होऊं लागली. त्यानंतर राष्ट्रमत व संदेश हीं दैनिके जन्मास येऊन त्यानी बहुजनसमाजात चागलीच जागृति उत्पन्न केली, आणि आज मुंबईत नवाकाळ, प्रभात, श्रीलोकमान्य, नवशक्ति, ताजीबातमी इत्यादि दैनिके आणि सुबोधपत्रिका, विविधवृत्त, मौज, निर्भीड, विहार, वसुंधरा, संजीवनी इ० साप्ताहिके, विविधज्ञानविस्तार व मासिकमनोरंजन हीं जुनीं मासिके, शिवाय प्राविण्य, पारिजात, नवजीवन, प्रतिभा, गृहलक्ष्मी, महिला, खेळगडी, आयुर्वेद, वसंत, वगैरे वगैरे नियतकालिके, साहित्यक्षेत्रात पुढे आली आहेत. पुण्यात ज्ञानप्रकाश, सकाळ, त्रिकाळ इ० दैनिके आणि केसरीसारखी द्विसाप्ताहिके व दीनबंधु, भाला, संस्थानी समाचार इ० सारखी साप्ताहिकें, चित्रमयजगत, आनंद, शालापत्रक, यशवंत, सृष्टिज्ञान, स्वराज्य, मतिविकास इ० नियतकालिके नेटानें साहित्यकार्य करीत आहेत नागपुरास महाराष्ट्र पत्र साप्ताहिकाचें द्विसाप्ताहिक स्वरूपात प्रगट होऊं लागले असून त्याच्या हजारो प्रती खपत आहेत, व वागीश्वरी, विश्ववाणी इ० नियतकालिके व शामसुंदर, विदर्भ इत्यादि पत्रे लोकप्रिय झाली आहेत कोल्हापुरास विद्याविलास पत्र दैनिक स्वरूपात निघूं लागले असून सत्यवादी, सेवक यासारखी आकर्षक साप्ताहिकेही बरीच चमकूं लागली आहेत. तसेच वऱ्हाडात उदय, प्रजापक्ष, बेळगावात राष्ट्रवीर, परीक्षक, लोकपक्ष, अहमदनगरात दीनमित्र, सावंतवाडीस वैनतेय, रत्नागिरीस बलवंत व सत्यशोधक, सोलापुरास कल्पतरु व सोलापुरसमाचार, धुळे येथे प्रबोध, कराचीस सिंध-मराठा व रविकिरण, नाशकास शेतकरी, पंढरपुरास पंढरीमित्र, धारवाडास धारवाडवृत्त, गोव्यात भारत, साताऱ्यास ऐक्य व समर्थ, मालवणास कोकणप्रभा, जळगावास वार्ताविहार, बडोद्यात श्रीसयाजी विजय, नवजीवन, जागृति, कप्तान, सहविचार, व्यायाम, औधसंस्थानात पुरुषार्थ, किर्लोस्कर, स्त्री, मनोहर इ० सारखी मासिके निघत असून त्यातील कित्येकांनी तर नवजीवन उत्पन्न केले आहे पुण्यामुंबईबाहेर, दक्षिण व उत्तर हिंदुस्थानातहि दूरदूरच्या शहरी उत्तमोत्तम अशी नियतकालिके ह्याची स्पृहणीय वाढ झालेली आढळून येते. याशिवाय निरनिराळ्या जातींचीं विशिष्ट मासिके, द्वैमासिकें आपापल्यापरी स्वज्ञातीची सेवा बजावीत आहेत

सारांश, सागण्याचे तात्पर्य इतकेच कीं, गेल्या पन्नास वर्षांचा आढावा घेतल्यास अनेक वर्तमानपत्रें व नियतकालिके उदयास आलीं आणि त्यातील काहीं लोकाश्रयाच्या अभावी,

काहीं चालकांच्या अभावी व कांही नवीन आर्डिनन्सखाली अस्तास गेली ! तथापि समाधानाची गोष्ट ही की, त्यांची रिकामी झालेली जागा भरून काढण्यास अनेक साहित्यभक्त पुढे आले व त्यानीं साहित्यक्षेत्रांत दुपटीने भर घातली असे आपणास दिसून येईल. साहित्यक्षेत्राप्रमाणेच ललितकलेत आणि समाज व राजकारण यातहि कितीतरी स्थित्यंतर झाले आहे, आणि रोज सारखे होतच आहे रबराचा चेंडू जितक्या जोरानें आपटावा तितका तो अधिक वर उडतो, या न्यायाप्रमाणे जो जो जीवनकलहाचा प्रश्न बिकट होत आहे, बेकारी वाढत आहे, गरीब प्रजेवर अनेक नवेनवे कराचे बोजे लादत आहेत, नवींनवी ऑर्डिनन्से निघत आहेत, तो तो लोकात अधिक जागृति, अधिक जोम व अधिक कर्तव्यतत्परता उत्पन्न होत आहे, असेच आपणास दिसून येईल. आर्थिक दृष्टीने पाहिल्यास आज आम्ही जगाच्या खालच्या पायरीस गेलो आहोत, परंतु जागृति, सुधारणा, नवमतवाद, साहित्यचर्चा, ऐषआराम इ० दृष्टीने पाहिल्यास धनोत्पादना-शिवाय बाकीच्या एकंदर गोष्टीत आम्ही वरच्या पायरीस सारखे चढत आहोत, असेच आढळून येईल नुसते पुणे-मुंबई या दोन शहराकडेच पाहिले तर, शाळा छापखाने, वर्तमानपत्रे, नियतकालिके, व त्याबरोबरच नाटकगृहे, सिनेमागृहे, विद्युत-दीपानी शृंगारलेली उपाहारगृहे, ट्रामगाड्या, बसीस, एरोप्लेन, रेडियो, बोलकी चलत्-चित्रे, मोटारी, याची गर्दी उडालेली दिसते, आणि आम्ही हल्ली जगाच्या कोणत्या युगात वावरत आहो याची भ्रांति पडते !

## बडोदें संस्थानांतील प्रगति

फार लाब कशाला ? ज्या वटोदरपुरींत आपण मराठी साहित्याची चर्चा करण्याकरिता आज एकत्र झालो आहोत, त्या ह्या बडोदे शहरात पन्नास वर्षांपूर्वीची लोकस्थिति, समाजस्थिति, आरोग्यस्थिति कशी होती, किती शाळा होत्या, किती लोक शिक्षणाचा लाभ घेत होते, किती वाङ्मय तयार होत होते, आणि आज त्याच शहरात आरोग्य, शिक्षण व वाङ्मय, याचे क्षेत्र किती वाढले आहे, याचा आपण विचार केल्यास आज सर्वच बाबतींत कल्पनातीत प्रगति झाली आहे, असेच आपणास दिसून येईल.

पन्नास वर्षांपूर्वी ह्या बडोदे शहरांत हातात काठी घेतल्यावाचून व नाकाला पदर लावल्यावाचून रस्त्याने चालणे मुष्किलीचे होते. मुलाची शाळा लोकसंख्येच्या मानाने हजारास १ सुद्धा नव्हती व मुलीच्या शाळांची तर वानवाच होती. स्वतंत्र मुद्रणालयें, नियतकालिके व वर्तमानपत्रे औषधालाहि नव्हती परंतु आज तेंच बडोदे शहर इंद्राच्या अमरावतीप्रमाणे भासत आहे. पूर्वीचे खाचाखळग्यांनी व दोहो बाजूच्या घाणपाण्यानें भरलेले रस्ते नाहींसे होऊन त्या ठिकाणी विद्युत्प्रकाशाने प्रकाशित झालेले, दोहोंबाजूंच्या विविधवृक्षछायेनें आच्छादिलेले, खडी-डांबरानें तुळतुळीत केलेले भव्य रस्ते दिसत आहेत.

पूर्वीची मोडकीं घरें, रस्त्यांत इतस्तत वावरणारी कुत्रीं व गाढवे जाऊन त्याच ठिकाणीं दोहोबाजूस उभारलेली माडीची निवासगृहे, जागोजाग विश्रांतीकरिता सज्ज असलेलीं उपवने व ज्ञानार्जनार्थ उभारलेलीं शारदामंदिरे, आणि सकाळ संध्याकाळ विद्यार्जनार्थ जाणाऱ्या व परतणाऱ्या मुलांमुलीचे गंगौघाप्रमाणे वाहणारे प्रवाह पाहिले म्हणजे आज आपण इंद्रपुरींत आहोंत कीं काय, असें वाटल्यास त्यात आश्चर्य कसले ! साहित्यक्षेत्रातहि बडोदे शहराने अपूर्व प्रगति केली आहे. ज्या बडोदे राज्यात पूर्वी एकहि मुद्रणालय किंवा वर्तमानपत्र नव्हते, तेथे आज दशकानी मोजता येतील इतके छापखाने व नियतकालिके साहित्यसेवा करीत आहेत. ग्रंथलेखन व ग्रंथप्रकाशन हा काय प्रकार आहे, हे स्वप्नातहि जेथें येत नव्हते, त्या ठिकाणी साहित्य-क्षितिजावर नक्षत्रासारखे अनेक लेखक चमकूं लागले आहेत.

राष्ट्रकथामाला, विविधग्रंथमाला, ज्ञानमंजुषा, साहित्यमाला, बालज्ञानमाला, क्रीडामाला, इ. इ. मालाच्या द्वारा वाङ्मयभाण्डारात अनेक ग्रंथाची भर पडून रा. सा. गोविंदराव सरदेसाई, श्री. दाजी नागेश आपटे, प्रो. चिंतामणराव जोशी, जनरल नानासाहेब शिंदे, प्रो माणिकराव, श्री वाकसकर, श्री वा वी जोशी, कवि चंद्रशेखर, गोरे, श्री वी पा. दांडेकर, श्री आनंदीबाई जयवंत, श्री कृष्णाबाई इ. इ कर्तृत्ववान विद्वद्रत्ने वाङ्मयाच्या क्षितिजावर चमकूं लागली आहेत

साराश, गेल्या ५० वर्षांचा इतिहास पाहिला म्हणजे कालचक्राच्या परिस्थित्य-नुरूप विविध बाबतीत आम्ही अघाडी मारली आहे असेंच दिसून येईल साहित्यक्षेत्रात मराठी भाषेने जी अघाडी मारली आहे, त्याचे पुष्कळसे श्रेय तत्कालिन कार्यकर्ते व साहित्यभक्त कै न्या मू. रानडे, श्री जगन्नाथ शंकरशेठ, भाण्डारकर, तेलंग, माडगावकर, पंडित, परब, शं मो रानडे, ह ना आपटे, गुंजीकर, टिळक, आगरकर, कुंटे, गोळे, भानु, महाजनी, देशमुख, चिपळूणकर, त्रिलोकेकर, कीर्तिकर, कानिटकर, तुकारामतात्या, ज्योतीराव फुले, राजारामशास्त्री भागवत, वामन दाजी ओक, रा सा विनायक कोंडदेव ओक, याच्यासारख्या अनेक पुरोगामी कर्तृत्ववान् विद्वानानी पुढाकार घेऊन केलेल्या साहित्यसेवेस आणि श्रीमंत सयाजीराव महाराजांसारख्या कर्तृत्ववान राज्यकर्त्या पुरुषानी वेळोवेळी दिलेल्या प्रोत्साहनास द्यावे लागते.

## प्रकाशकांसंबंधानें कांही तक्रारी

प्रकाशक लेखकास पुरेसा मोबदला देत नाहीत व प्रकाशक लेखकाबरोबर बेपर्वाइने वागतात, अशी प्रकाशकांविरुद्ध एक तक्रार काही लेखकाकडून करण्यात येते, पण ती चुकीची आहे असे मला वाटतें.कारण,बहुतेक प्रकाशकाची दृष्टि व्यापारी तत्वास अनुसरून

असते, व ती तशी असणें साहजिक आहे. जो लेखक नाणावलेला आहे, व ज्याच्या ग्रंथास बाजारात विशेष मागणी आहे, अशा लेखकास व त्याच्या ग्रंथास केव्हांहि कमी मोबदला मिळणे शक्य नसते. उलट श्रमाच्या मानाने अधिकच मोबदला प्रकाशकाकडून मिळतो. परंतु ज्या लेखकाचे ग्रंथ मागणीच्या अभावी वर्षोनुवर्ष पडून राहतात, अशा ग्रंथाच्या लेखकास त्याच्या इच्छेप्रमाणे प्रकाशकाकडून त्याच्या अपेक्षेप्रमाणे मोबदला मिळाला नाहीं तर त्यास दोष कसा देता येईल ? ग्रंथप्रकाशनाच्या कार्यांत प्रकाशकास भाडवल अडवावें लागते, आणि तें भाडवल वेळचेवेळी मोकळें झालें म्हणजे लेखकास भरपूर मोबदला देणे आणि प्रकाशनाचे कार्य अधिक जोमाने चालविणें याची फिकीर त्यास वाटत नाही. परंतु मागणीच्या अभावीं आज किती तरी प्रकाशकाचे भाडवल ग्रंथात अडून पडले आहे, व भाडवल अडून पडल्यामुळे त्याची स्थिति किती बिकट झाली आहे, याचा विचार कोणी करीत नाही. फार लाब कशाला, ह्या ग्रंथप्रकाशनाच्या कामात आमचें भाडवल एक लक्षावर अडून पडले आहे व त्यामुळे वेगवेगळ्या विद्वानानी लिहिलेले शास्त्रीयविषयावरील अनेक ग्रंथ भाडवलाच्या व मागणीच्या अभावीं अप्रकाशित ठेवावे लागले आहेत. वास्तविक हा विचार अशा प्रसंगी होणे फार जरूर आहे. तसेच अशा अप्रकाशित राहिलेल्या ग्रंथाची यादी करून त्यातील योग्य ग्रंथाचे प्रकाशन करण्याची काहीं योजना होणें अवश्य आहे

## प्रकाशनकार्यांतील अडचणी

पहिली गोष्ट अशी कीं, हल्ली जे शिक्षण आम्हास मिळत आहे, ते सर्वच परकी भाषेतून मिळत असल्यामुळे आरभापासूनच मायभाषेस आम्ही पारखे होत आहोत. शिवाय द्रव्य आणि काळ पुष्कळ खर्च होऊनहि त्याचा उपयोग पुढे काही होत नाही. अशी परिस्थिति असल्यामुळे मराठी भाषेतील वरिष्ठ प्रतीच्या (शास्त्रीय) ग्रंथाचा प्रसार व्हावा तसा होऊं शकत नाही. कै बाळाजी प्रभाकर मोडक यानी तयार केलेले शास्त्रीय विषयावरील सर्वोत्कृष्ट ग्रंथ, श्रीमंत महाराजानी हजारो रुपये खर्ची घालून तयार केलेले ज्ञानमंजूषामालेतील अनेक ग्रंथ, ग्रंथसंपादक मंडळीने प्रसिद्ध केलेले विविध शास्त्रीय विषयावरील ग्रंथ मागणीच्या अभावी कसरीच्या भक्ष्यस्थानीं जाण्याची पाळी आली आहे ! ! आणि आज अनेक विद्वानानीं मोठ्या हौसेने अत्यंत परिश्रम घेऊन लिहिलेले विविध शास्त्रीयविषयावरील ग्रंथ लोकाश्रयाच्या अभावी अप्रकाशित पडून राहिले आहेत ! ह्या अडचणी दूर करावयाच्या म्हणजे आजच्या शिक्षणक्रमात सुधारणा झाली पाहिजे, वरिष्ठ शिक्षण देशी भाषेतून देण्याची व्यवस्था झाली पाहिजे, देशी भाषेतून शिक्षण देणारीं कॉलेजे उघडलीं पाहिजेत, आणि ह्या सर्व गोष्टी घडून येण्याकरिता मराठी भाषेच्या युनिव्हर्सिटीची योजना शक्य तितक्या लवकर अंमलात आणली पाहिजे

## बोधभाषा या नात्याने मराठी भाषेचे महत्त्व

एखाद्या देशातील किंवा प्रातातील बहुसंख्य लोकानीं आपले विचार व भावना व्यक्त करणे, व इतराचे विचार व भावना समजून घेणे, हे ज्या भाषेच्या द्वारे सुलभ होते, ती त्या देशाची किवा प्रांताची खरी देशभाषा किवा बोधभाषा होय, ह्या दृष्टीने गुजराती, मराठी, कानडी ह्या आपापल्या प्रातातल्या स्वत सिद्ध राजभाषा होत त्या त्या प्रातातील एकंदर वाङ्मयनिर्मितीवर ह्या भाषाचेच वर्चस्व असावयाचे. मराठी संबंधींच बोलावयाचे तर, महाराष्ट्रीय विद्वानाची, कवीची, शास्त्रज्ञाची ग्रंथनिर्मिति बहुताशी मराठींतून व्हावी हे स्वाभाविक असून, तशी ती होतेहि. तथापि इंग्रजी, जर्मन, फ्रेंच, इत्यादि पुढारलेल्या भाषाच्या मानाने आमच्या मराठी भाषेतील वार्षिक ग्रंथनिष्पत्ति फारच कमी असते याचे कारण एकच, व ते हे कीं, शाळा-कॉलेजातून मराठीला तिचे स्वभावसिद्ध बोधभाषेचे स्थान देण्यात आलेले नाहीं, हे होय. इतिहास, राजशास्त्र, अर्थशास्त्र, त्याचप्रमाणे पदार्थविज्ञान, रसायनशास्त्र, इत्यादि सर्व शास्त्राचा व विज्ञानाचा अभ्यास करताना मराठीतून विचार करण्याची व मराठीतून ते ते ज्ञान प्रकट करण्याची संवय शाळा-कॉलेजातील विद्यार्थ्यांना लागेल, तर त्यायोगे मराठी भाषेची शब्दसंपत्ति वाढेल, निरनिराळ्या शास्त्रास आवश्यक असलेल्या परिभाषा तयार होण्यास मदत होईल, आणि निश्चयानें मराठी भाषेतील ग्रंथनिर्मितीचे प्रमाण वाढेल.

अलिकडे मुंबई युनिव्हर्सिटीचा देशभाषाचे व्यावहारिक महत्व ओळखण्याकडे कल दिसूं लागला आहे, ही समाधानाची गोष्ट होय. मराठीला एक ऐच्छिक विषय म्हणून मान्यता एम्. ए., बी. ए., व मॅट्रिक परीक्षाच्या बाबतीत आज बरीच वर्षे आहे. पैकी मॅट्रिकमध्ये ' संस्कृत किवा मराठी ' असा विकल्प ठेवल्यानें आणि प्रीव्हि-यस व इंटरमिजिएट ह्या परीक्षातून मराठीचे उच्चाटण केल्यामुळे, मॅट्रिकला मराठी भाषा घेणे पुष्कळास नुकसानीचे होते कारण पुढच्या दोन्ही परीक्षास मराठीचे नाव नस-ल्याने, पाली, फ्रेंच, संस्कृत अशा भाषापैकी कोणत्यातरी एका भाषेचा आश्रय घ्यावा लागतो ! म्हणजे दोन वर्षे मध्येच आपल्या मायभाषेस सोडचिठ्ठी द्यावी लागते ! ! दगडापेक्षा वीट बरी, या न्यायाने नुकत्याच झालेल्या युनिव्हर्सिटीच्या नियमाप्रमाणे मॅट्रिकच्या विद्यार्थ्यांना इंग्रजी भाषेचा ( आवश्यक ) एक पेपर, इंग्रजी किवा मराठी वगैरे देशभाषेचा एक पेपर आणि संस्कृत, पाली किंवा फ्रेंच वगैरे दुसऱ्या भाषेचा एक पेपर, याप्रमाणे भाषाविषयाचे तीन पेपर ठेवल्याने वरील आपत्ति बरीचशी टळेल व मॅट्रिकपर्यंत मराठीचा व तत्सम देशीभाषाचा अभ्यास प्रत्येकाला अवश्यक झाल्या-सारखे होईल हे खरे, परंतु इतके झाल्यानेंहि मराठीला खरे स्थान प्राप्त झाले असें होत नाहीं ! खरे स्थान म्हणजे पहिल्या इयत्तेपासून तो उच्चतम परीक्षेपर्यंत निर-निराळ्या विषयाच्या बोधभाषेचें स्थान होय थोडक्यात सागावयाचें तर इंग्लंडदेशात

जे इंग्रजीचे स्थान आहे, ते महाराष्ट्रीयापुरते तरी मराठीचे स्थान असावे गुजराती, मराठी, कानडी, इ० निरनिराळ्या भाषा बोलणाऱ्यांच्या शिक्षणाची काळजी वाहणाऱ्या व व्यवस्था करणाऱ्या मुंबई युनिव्हर्सिटीला देशभाषांना दिले आहे त्याहून उच्चस्थान देतां येईल कीं नाही, हा व्यवहारिक प्रश्न आहे. परंतु भाषावार विश्वविद्यालये झाल्याखेरीज देशभाषांना त्यांचे खरे स्थान मिळणे शक्य नाहीं. म्हणून देशी भाषासाठीं विश्वविद्यालयें स्थापण्याचा प्रयत्न मायभाषेचा अभिमान बाळगणाऱ्या प्रत्येकाने करणे जरूर आहे. मायभाषेची युनिव्हर्सिटी झाल्यावांचून आमच्या मायभाषेस बोधभाषेचे स्थान मिळणार नाही, व बोधभाषेचे स्थान मिळाल्याखेरीज देशभाषातील वाङ्मयनिर्मिति आणि वाङ्मयप्रकाशन सर्वस्पर्शी कधीहि होणार नाही

## साक्षरता वाढविण्याची आवश्यकता

खानेसुमारीच्या आकड्यात मराठी भाषा बोलणाराची संख्या जरी मोठी दिसते, तथापि शिक्षणाच्या अभावी वाङ्मयप्रसारास त्याचा उपयोग होत नाही. याचे कारण शेतकरी, कामकरी, इ लोकात अशिक्षिताचाच भरणा फार मोठा आहे. ह्या वर्गास निदान लिहिणे, वाचणे व साधारण गणित, इतके शिक्षण तरी मिळणे फार जरूर आहे. त्याकरिता आतां सरकारावर अवलंबून न राहतां हा प्रश्न आम्हीच हाती घेतला पाहिजे. खेड्याखेड्यांतून मोफत सक्तीच्या शिक्षणाच्या शाळा उघडल्या पाहिजेत हे सक्तीचे शिक्षण अति अल्प खर्चांत व अत्पकाळात कसे देता येईल, ह्या संबंधाची एक सुंदर योजना मुंबईतील म्युनिसिपल स्कूलसकमिटीचे सेक्रेटरी श्री रामचंद्रराव परुळेकर यानी तयार केली आहे ती विचारात घेण्यासारखी आहे तसेच रत्नागिरी जिल्ह्यातील केळशी येथील विद्यालयाचे शिक्षक श्री. दि. धों. पराजपे, यानीं एक सुलभ योजना केली आहे, तीहि अवलोकनात घेण्यासारखी आहे. त्या योजनेनुरुप व्यवस्था झाल्यास प्रत्येक तालुका लोकलबोर्डास आपापल्या तालुक्यात सक्तीच्या शिक्षणाच्या शाळा अल्प खर्चांत उघडतां येतील, व दोन तीन वर्षाच्या अवधीत सकाळचा फक्त तीनच तास अभ्यासक्रम ठेवला असतां, लिहिणे, वाचणे व साधारण गणित इतके शिक्षण पुरे होऊं शकते

दुसरी गोष्ट अशी कीं, शिक्षणप्रसाराबरोबरच शेतकरी, कामकरी वगैरे वर्गास सुलभतेने विविध ज्ञानाचा लाभ घेता यावा म्हणून, अत्यंत सोप्या व सहज समजेल अशा भाषेत लहान लहान पुस्तके तयार झालीं पाहिजेत, व ती शक्य तितक्या कमी किमतींत दिलीं पाहिजेत. हल्ली जे वाङ्मय प्रसिद्ध होत आहे, ते सर्व वरिष्ठ वर्गाकरता असून त्यातील तीनचतुर्थांश वाङ्मय तर प्रेमकथास वाहिलेलें असते, व त्यापैकीं काहीं तर तरुण मुलामुलींस वाचण्यास अयोग्य अशा विषयाने भरलेले असते. परंतु मजा अशी कीं, अशाच वाङ्मयाचा प्रसार दिवसेंदिवस फार होत

आहे. समाजस्वास्थ्याच्या दृष्टीने विचार करिता, अशा वाङ्मयास शक्य तो आळा घालणे फार जरूर आहे, असे अनेक सुशिक्षितांचें मत आहे.

## बालवाङ्मयाची आवश्यकता

तिसरी गोष्ट अशी की, लहान मुलामुलींस उपयोगी पडेल असे ' बालवाङ्मय ' स्वतंत्र तयार झाले पाहिजे पाश्चात्य देशातील बालवाङ्मयाशी आपणाकडील बाल-वाङ्मयाची तुलना केल्यास आपण जगाच्या फार मागे आहोत असेच आपणास दिसून येईल. नाही म्हणावयास पुण्यात आनंदकार्यालयातर्फे, बडोद्यात भाषातर शाखेतर्फे, सांगलीस ' बालवाङ्मय प्रसारक मंडळा'तर्फे, मालवणास श्री मिसाळ याजकडून व मुंबईत श्री के भि ढवळे, याजकडून मुलाकरिता बालवाङ्मय तयार करण्याचा उपक्रम सुरु झाला आहे, तो अभिनंदनीय आहे परंतु तो विशेष व्यापक होणे जरूर आहे आनंदकार्यालयाने या संबंधाने आखलेली योजना विचारात घेण्यासारखी आहे.

## वाङ्मय प्रसारास पोस्टाच्या अडचणी

चवथी गोष्ट अशी की, पोस्टखात्याने पोस्टाचे दर वाढविल्यामुळे वाङ्मयप्रसारास फार मोठी अडचण उत्पन्न झाली आहे. पूर्वी पोस्टकार्डाची किंमत एक पैसा होती, त्या ठिकाणी हल्ली तीन पैसे झाली आहे. म्हणजे साधारण पत्र पाठविणे असले तरी एक पैशाच्या ऐवजी हल्ली तीन पैसे खर्च करावे लागतात, व उत्तर मागविणे असल्यास सहा पैसे खर्चावे लागतात ! हल्लीच्या जीवनकलहाच्या कालात ह्या सहा पैशाची किंमत फार मोठी आहे. गरीब कुटूंबास सहा पैसे म्हणजे एक दिवसाचा चरितार्थ होय ! मध्यम स्थितीतील लोकासही पोस्टाच्या दरात आवास्तव झालेल्या ह्या वाढीमुळे इच्छा असूनहि तीन पैसे खर्च करून पोस्टकार्ड पाठविणे जिवावर येते त्यामुळे हल्ली एकाद्या पुस्तकाची कितीही मोठी जाहिरात दिली, तरी त्याची कोणी विचारपूसहि करीनासें झाले आहे. पूर्वी केसरीत एकाद्या पुस्तकाची जाहिरात दिली म्हणजे पाच पन्नास वाच-काकडून पत्रे सहज येत असत, व त्या वेळी केसरीच्या जाहिरातीचा दरहि कमी होता. त्यामुळे प्रकाशकास जाहिराती देण्यापासून काहीना काही फायदा होत असे. परंतु हल्ली वाढत्या धंद्याच्या दृष्टीने केसरीनेंहि आपले जाहिरातींचे दर पूर्वीच्या मानाने चौपटीने वाढविले आहेत व पोस्टानेंहि आपले दर तिपटीने वाढविले आहेत, त्यामुळे चौपट खर्च करूनही जाहिरातीपासून उपयोग होईनासा झाला आहे ! !

पाचवी गोष्ट अशी की, पूर्वी अनरजिस्टर व्ही. पी. पार्सल घेण्याचा पोस्टाचा नियम असे, व मनिआर्डर कमिशन पाच रुपयास एक आणा व बुकपोस्ट १० तोळ्यास अर्धा आणा असे दर होते, त्यामुळे दहा तोळ्यापर्यंत वजनाचे पुस्तक व्ही. पी. ने पाठ-

ण्यास फक्त दीड आणा खर्च येत असे हल्ली तितक्याच वजनाचे पुस्तक व्ही. पी. नें पाठविणे झाल्यास बुकपोस्ट सव्वा आणा, रजिस्टर फी तीन आणे व व्ही. पी. दोन आणे असा सहा आणे खर्च येतो म्हणजे प्रकाशकाने पोटास चिमटा घेऊन एकाद्या १०० पानाच्या पुस्तकाची किमत अत्यंत काटकसर करून जरी आणा दोन आणे ठेविली, तरी बाहेरगावच्या ग्राहकास त्याचा लाभ घेण्याकरितां सात आठ आणे खर्च करावे लागतात !

## सरकारची अनुदारता

सहावी गोष्ट अशी की—पूर्वी प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक पुस्तकाच्या ३ प्रती सरकार विकत घेत असे, त्यामुळे ग्रंथप्रकाशनाच्या कार्यास एक प्रकारें प्रोत्साहन मिळत असे. परंतु गेल्या कित्येक वर्षांपासून सरकारने ही पद्धत बद केली आणि उलट कोणतेही पुस्तक प्रसिद्ध झाले की, त्याच्या तीन प्रती प्रकाशकाने सरकारास फुकट दिल्याच पाहिजेत; न दिल्यास मुद्रक व प्रकाशक दोघेही दंडास पात्र होतात, असा सक्तीचा कायदा अंमलात आणला आहे तात्पर्य पूर्वीचे प्रोत्साहन तर गलेच, पण उलट प्रकाशकावर हा एक नवीन कर बसला आहे !

## मध्यवर्ती प्रकाशनसंस्था व तिचें स्वरूप

वरील एकंदर गोष्टी लक्षात घेतल्या म्हणजे प्रकाशनकार्य सुव्यवस्थित चालण्यास एकादी मध्यवर्ती प्रकाशनसंस्था असणे फार जरूर आहे, असेच आपणास दिसून येईल ह्या मध्यवर्ति संस्थेने मराठी भाषेत लोकशिक्षणास उपयोगी असे ग्रंथ कसे निर्माण होतील, त्याचा प्रसार सुलभतेने सर्वत्र होण्यास काय केले पाहिजे, ग्रंथप्रसाराच्या कामी कोणत्या अडचणी आहेत, व त्या दूर कशा कराव्या, लेखक व प्रकाशक याच्यात सलोखा उत्पन्न होऊन त्यास कसे उत्तेजन मिळेल. इ गोष्टींचा विचार करावयाचा आहे. ह्या मध्यवर्ति संस्थेची साधारण रूपरेषा पुढीलप्रमाणे असावी असे मला वाटते.

( १ ) मध्यवर्ती संस्थेकरिता कार्यकारीमंडळीची निवड प्रत्येक साहित्यसंमलेनप्रसंगीं करण्यात यावी.

( २ ) साहित्यपरिषदेचे अध्यक्ष हेच होतां होईतों मध्यवर्ती प्रकाशनसस्थेचे अध्यक्ष असावे, आणि हल्ली ज्या संस्था प्रकाशनाचे कार्य करीत आहेत, त्यापैकी प्रत्येक प्रातातील एक, याप्रमाणे चार प्रातातील चार उपाध्यक्ष व चार चिटणीस असावेत, आणि ग्रंथलेखक व प्रकाशक असे २० सभासदाचे एक कार्यकारी मंडळ असावें.

( ३ ) ह्या मध्यवर्ती प्रकाशनमंडळाची मुख्य कचेरी मुंबई किंवा पुणे अशा मध्यवर्ती शहरीं असावी.

( ४ ) मध्यवर्ती मंडळात लेखक, मुद्रक, प्रकाशक व विक्रेते, ह्या सर्वांस सभासद होण्याची मोकळीक असावी.

( ५ ) सभासदांची फी सर्वांस सुलभ पडेल अशी असावी.

( ६ ) महिन्यांतून एक वेळ, निदान तिमाही तरी सभासदांची सभा भरवावी व त्या वेळीं प्रकाशनकार्यांत येणाऱ्या अडचणींसंबंधीं खल व्हावा.

( ७ ) लेखक व प्रकाशक यांच्यांत सहकार व सलोखा राहून अधिकाधिक श्रेष्ठ दर्जाचे वाङ्मय निर्माण होईल व त्याचा प्रसार होईल, अशाबद्दल योग्य तो खल करून तत्संबंधीं नियम ठरवावे.

( ८ ) हल्लीं ग्रंथ व नियतकालिकाचे काही विक्रेते, पैसा दोन पैसे भाडे म्हणून घेऊन पुस्तकें भाड्याने वाचावयास देतात, त्यामुळे पुस्तकांच्या व नियतकालिकाच्या विक्रीस व प्रसारास मोठा अडथळा येतो, असा बोभाटा आहे. त्याचा विचार व्हावा, आणि त्यास शक्य तो आळा घालण्याचा प्रयत्न करावा.

( ९ ) प्रकाशनकार्यांत प्रकाशकास नेहमी भाडवलाची अडचण फार येते, व शेवटी चागले ग्रथ रद्दीच्या भावाने विकण्याचा प्रसंग येतो. ही अडचण दूर होण्याकरिता सहकारी पद्धतीवर एक बॅंक मध्यवर्ती संस्थेने उघडावी व योग्य तारणावर हलक्या व्याजाने प्रकाशकास जरूर ती मदत करावी ह्या सहकार योजनेसंबंधाने एक मसुदा माझे मित्र श्रीयुत देवरुखकर यानी तयार केला आहे, त्याचा विचार व्हावा

( १० ) ज्या प्रकाशनसंस्था मध्यवर्ती सहकारी प्रकाशनसंस्थेशी संलग्न होतील, त्याचा नामनिर्देश करून त्या सरकारांत रजिस्टर करणे, त्या संस्थास नियतकालिकाप्रमाणे पोस्टाच्या सवलती मिळवून देणे, अशा संस्थाच्या द्वारा प्रकाशित होणाऱ्या ग्रंथाच्या निदान तीन प्रती पूर्वीप्रमाणें सरकारात विकत घेवविणे, कॉलेजे, हायस्कूलें व रजिस्टर्ड लायब्ऱ्या यातून त्यांचा प्रसार करणे, जप्त होणाऱ्या वाङ्मयासंबंधाने योग्य तो प्रयत्न करणें, ग्रंथप्रसाराच्या कार्यास मदत होण्याकरितां अशा ग्रंथाच्या जाहिराती सवलतीने छापण्याविषयीं वर्तमानपत्रांचें सहाय्य मिळविणे, खेड्याखेड्यातून साक्षरतेचे प्रमाण वाढविण्याकरितां योग्य उपायांची योजना करणे, आणि सर्वांत विशेष व महत्वाची गोष्ट म्हणजे, दुय्यम प्रतीचें शिक्षण जे हल्ली इंग्रजी भाषेत देण्यात येते ते मायभाषेत देता येईल अशाविषयीं योग्य ते प्रयत्न करणें

वरप्रमाणें मध्यवर्ती सहकारी प्रकाशनसंस्था, तिचे स्वरूप व शक्यता, या संबंधानें माझे विचार मीं आपणापुढें ठेवले आहेत. आता ( आ ) लेखक व काशक यांचे

संबंध व ( इ ) प्रकाशकांची वाङ्मयनिर्मितीस व शुद्धतेस मदत होईल का? ह्या दोन्ही मुद्याचा समावेश पहिल्या मुद्यांतच होण्यासारखा आहे. मध्यवर्ती संस्थेनेच त्या गोष्टीचा निर्णय करावयाचा आहे. लेखक व प्रकाशक याचे संबंध निगडित झाले असतां वाङ्मय-निर्मितीस व शुद्धतेस प्रकाशकांची मदत होण्यास अडचण पडणार नाही असे मला वाटते.

## उपसंहार

भगिनीनो व बांधवहो, प्रकाशनकार्यात गेल्या ५० वर्षांत झालेले स्थित्यंतर, त्यात झालेली प्रगति, तसेच त्यात येणाऱ्या अडचणी इ० संबंधाची माहिती माझ्या अल्प समजुतीप्रमाणे मी आपणापुढे माडिली आहे त्यात जे योग्य वाटेल ते आपण ग्रहण करावे व नको असेल ते टाकून द्यावे.

## साहित्यिक संस्थांचे अभिनंदन

माझे भाषण पुरे करण्यापूर्वी साहित्यप्रकाशनाच्या कामी हल्ली वेगवेगळ्या संस्थाच्या विद्यमाने कोणकोणते प्रयत्न चालू आहेत, त्याचा उल्लेख करून त्यानीं आरंभिलेल्या कार्यांत त्याचे अभीष्ट चितणे जरूर आहे, असे मला वाटते. ह्या अभीष्टचिंतनाच्या मालिकेत, पुण्यातील भाण्डारकर रिसर्च इन्स्टीटयूटने आरंभिलेले महाभारत-संशोधनाचें कार्य, महाराष्ट्रसावत्सरिक मंडळाने स्वीकारलेले सावत्सरिक व विज्ञानकोशासारखे ग्रंथप्रकाशनाचे कार्य, बडोद्यातील ओरिएंटल रिसर्च इन्स्टिटयूटने शिरावर घेतलेले प्राचीन ग्रंथाबरोबरच श्रीसयाजीसाहित्यमाला व श्रीसयाजी बालज्ञानमाला या मालाच्या द्वारा देशीभाषेत ग्रंथप्रकाशनाचे कार्य, शब्दकोशमंडळाने आरंभिलेले मराठी शब्दकोशप्रकाशनाचे कार्य, धुळेकर मंडळीनें हाती घेतलेलें राजवाडे इतिहास प्रकाशनाचे कार्य, पुण्याच्या इतिहाससंशोधकमंडळाने आरंभिलेले इतिहाससंशोधनाचे कार्य श्री. चित्रावशास्त्री यानीं आरंभिलेले चरित्रकोशाचे कार्य, आणि मुंबईच्या ग्रंथप्रकाशक मडळीने आरंभिलेले सार्थ-महाभारत ग्रंथ प्रकाशनाचे कार्य व कर्नाटक प्रेसने चालविलेले भारतगौरव ग्रथमालेचे कार्य, त्याचप्रमाणे मायभाषेत शिक्षणप्रसाराच्या क्षेत्रात चालविलेले प्रो कर्वे याचे महिलाविद्यालयाचे कार्य, सेवासदनाचे द्वारे चालू असलेले स्त्रीशिक्षणाचे कार्य इ. इ. कार्यें आदरणीय असून त्या त्या सस्थास स्वीकृत कार्यांत योग्य लोकाश्रय मिळो, व ती यशस्वी होवोत, अशी इच्छा प्रगट करतो. तसेच सन १९३५ च्या खिस्तशकाच्या आरंभापासून नवीन जोमांत पुण्यास केसरीट्रस्टच्या विद्यमाने प्रसिद्ध होणारे ‘ सह्याद्री ’ मुंबईस निर्भीड संस्थेच्या विद्यमाने प्रसिद्ध होणारे ‘ महाराष्ट्र शारदा ’ ग्रंथसंपादक व प्रकाशक मंडळीच्या विद्यमाने प्रसिद्ध होणारे ‘ ज्ञानमंदिर ’ ही नियतकालिके व प्रो काळे याचे साप्ताहिक ‘ अर्थ ’ ही साहित्यक्षेत्रातील नूतन बालके आयुष्यमान्, कीर्तिमान् व लक्ष्मीवान् होवोत असा त्यास आशीर्वाद देतों.

साहित्यक्षेत्रांत भाग घेणाऱ्या संस्थानिकांचा नाम निर्देश करतांना प्रथम दर्शनीं आमचे गुर्जरनरेश विद्याभिलाषि श्रीमंत महाराज सयाजीराव गायकवाड याच्या नावाचा उल्लेख करावा लागतो. श्रीमंत महाराजाच्या ५० वर्षांच्या कारकीर्दीत एकंदर सुधारणे-बरोबर साहित्यकार्यांत किती महत्त्वाची कामगिरी झाली आहे, हें आरंभींच मीं सागितले आहे. आजच्या विसाव्या शतकात त्याची कारकीर्द इतिहासप्रसिद्ध भोज राजाप्रमाणे शोभा देत आहे, हे आपण जाणतच आहांत.

मध्य हिंदुस्थानात इंदूर संस्थानाधिपति होळकर सरकार याच्या घराण्याचा लौकिक इतिहासप्रसिद्ध असून शिक्षणप्रसार, साहित्यसेवा, औदार्य, इत्यादि लोककल्याणकारी कार्यात त्याची कीर्ति सर्वमुखी आहे साहित्यकार्यांतील त्याच्या औदार्याचा थोडासा उल्लेख मी आरंभीच केला आहे. नुकतेच इंदूर शहरी मध्यभारतीय मराठी साहित्य संमेलन, श्री सौ. इंदिराबाई मासाहेब होळकर याच्या प्रमुखत्वाखाली, आपले बडोद्यातील विद्वद्रत्न श्री दाजी नागेश आपटे, याच्या अध्यक्षतेखाली इंदूर शहरी भरविण्यात आले होते; त्याप्रसंगी इंदूरनरेश श्री सवाई यशवंतराव महाराज होळकर यानी तसेच त्याच्या सुविद्यपत्नी श्री सौ संयोगिता महाराणी सरकार आणि श्री मातु श्री सौ चंद्रावती मासाहेब यानी स्वतः प्रत्यक्ष भाग घेऊन साहित्यकार्याविषयीं आपले औदार्य व प्रेम व्यक्त केले होते साराश, गुजराथेत बडोदे, मध्य हिंदुस्थानात इंदूर आणि महाराष्ट्रात कोल्हापुर व औंव हीं संस्थाने शिक्षण, वाङ्मय व साहित्य, या कार्यांत आज आदर्शवत् संस्थाने आहेत

बंधुभगिनींनो, वृद्धावस्थेमुळे नजरचुकीने किंवा विस्मरणाने कित्येक योग्य साहित्यभक्ताचा, तसेच प्रकाशनकार्यांत भाग घेणाऱ्या संस्थाचा नामनिर्देश करताना चूक झाली असेल तर त्याबद्दल आपण मला क्षमा करावी अशी विनंती आहे.

## शेवटची नम्र विनंती

मी साहित्यप्रकाशनाची दीक्षा सन १८९५ सालीं आपल्या बडोदे शहरातच आपल्या सहचारिणीसभेच्या व आपले विद्याभिलाषि श्रीमंत महाराज साहेब याच्या सान्निध्यात घेतली आहे गेल्या पन्नास वर्षांत माझ्या हातून प्रकाशनक्षेत्रांत जी काही अल्पशी सेवा झाली, तिचे सर्व श्रेय श्रीमंत महाराजांस व आपणासारख्या विद्वज्जनाकडे आहे. मी निमित्तपात्र असून आपणा सर्वांचा नम्र सेवक आहे. माझे वय हल्ली ७३ वर्षांचे झाले आहे, तथापि माझ्यावरील आपले प्रेम अद्याप कायम आहे, याबद्दल मी आपला ऋणी आहे. आपले प्रेम निरंतर असेच राहो, अशी माझी नम्र विनंति आहे.

मी जरी वयोमानानें वृद्ध झालों आहें, तरी मायभाषेच्या सेवेची माझी इच्छा, माझी उमेद, माझी जिज्ञासा कमी झाली नाहीं. बहुजनसमाजास उपयोगी असें वाङ्मय निर्माण

व्हावे, व शेतकऱ्याच्या झोंपडींतून त्याचा प्रसार व्हावा अशी माझी उत्कट इच्छा आहे. त्या इच्छेस अनुसरून येत्या मकरसंक्रांतीपासून **ज्ञानमंदिर** या नावाचें एक मासिक काढण्याचे मीं ठरविले आहे. गोरगरिबांस ह्या मासिकाचा लाभ सहज-(रोज एकच पै बाजूस ठेविली असतां)-घेतां यावा म्हणून ह्या मासिकाची वार्षिक वर्गणी फक्त १ रुपाया ठेविली आहे. आणि त्याच्या वार्षिक पृष्ठसंख्येचे प्रमाण ५०० ठरविलें आहे. परंतु लोकाश्रय मिळाल्यास किंमत न वाढवितां जरूरीप्रमाणे पृष्ठसंख्या वाढविण्याचाहि विचार आहे. हे सर्व विचार शेवटास जाण्यास आपणासारख्या साहित्यभक्तांच्या सहकाराची फार जरूर आहे. तरुण होतकरू लेखकास उत्तेजन देणे, हा आमच्या मंडळीचा नियम आरंभापासूनच आंखलेला आहे परंतु योग्य लेखकास विशेष प्रोत्साहन मिळावे म्हणून प्रतिवर्षी एक वार्षिक समारंभ करून, त्या प्रसंगीं, ज्याची साहित्यसेवा विशेष आदरणीय ठरेल, अशा लेखकापैकीं काहीं लेखकास मंडळीच्या पुरस्कर्त्यांच्या नांवानें सुवर्णपदके देऊन त्याचा गौरव करावयाचा, असा एक विचार आम्ही ठरविला आहे.

आज बाजारांत उत्तम वाङ्मयास मागणी नाहीं, त्यामुळे चांगल्या लेखकांची प्रवृत्तीहि लोकाभिरुचीप्रमाणे लैंगिक वाङ्मयासारखे वाङ्मय निर्माण करण्याकडे वाहवत चालली आहे, ह्या प्रवृत्तीस आळा बसावा व बहुजनसमाजास उपयोगी असें वाङ्मय निर्माण व्हावे, म्हणून अशा वाङ्मयलेखकांस शक्य तोवर योग्य पारितोषक, बक्षिसे, सुवर्णपदके देऊन त्याचा गौरव करण्याचा प्रघात सुरू करण्याचा आमचा विचार आहेच, परंतु श्रेष्ठतर वाङ्मयास नोबेल प्राईझच्या पद्धतीवर एकादे मोठें बक्षिस ठेवण्याचाही विचार आहे मला कळविण्यास समाधान वाटते कीं, या कार्यांत भाग घेऊन योग्य ते साह्य करण्याचे आश्वासन अनेक साहित्यप्रेमी मित्रांनीं व हितचिंतकांनी दिले आहे. माझ्यासारख्या एका गरीबावर आपणासारख्या साहित्यभक्ताचे प्रेम आहेच ते कायम ठेवा, आणि ही आजची अल्पसेवा गोड करून घ्या, अशी माझी विनंती आहे सर्व-शक्तिमान प्रभु आमचे विद्याभिलाषी श्रीमंत महाराजसाहेब, श्री मातु श्री सौ महाराणी साहेब, राजकुटुंबातील मंडळी व आपण सर्व साहित्यभक्त, यांस दीर्घ आयु व आरोग्य देवो, आणि आपल्या हातून मराठी साहित्याची सेवा उत्तरोत्तर अधिक उत्कर्ष पावो, अशी प्रार्थना करून, व आपण मला आजच्या प्रसंगी अध्यक्षस्थानीं बसवून माझें वेडेवांकुडे भाषण शांतपणें ऐकून घेतलें याबद्दल आपले पुन्हां एकदा मन पूर्वक आभार मानून, मी आपली रजा घेतो.

ॐ तत्सत्

मराठी साहित्य समेलन, अधिवेशन १९ वें, बडोदें



स्त्री प्रतिनिधि.

श्री.

# मराठी साहित्य संमेलन

## अधिवेशन १९ वें, बडोदें.

---

सन १९३४.

---

नाट्य विभाग.

अध्यक्ष :

## श्री. यशवंत नारायण टिपणीस

## यांचें भाषण.

---

नाट्यरसिक सभाजन हो !

या संमेलनाच्या नाट्यविभागाच्या अधिवेशनाचें जे हें नाटक आता सुरू झाले आहे त्यात अध्यक्षाची भूमिका आपण माझ्यावर नेमली आहे या भूमिकेला लायक अशी काही माणसे आपल्या या नटवर्गात आहेत याची मला जाणीव आहे आ-पली केवळ आज्ञा म्हणूनच मी या भूमिकेचा स्वीकार करीत आहें आपण मात्र आपापल्या भूमिका उत्तम प्रकारे वठवून मला चागली साथ द्यावी व या नाटकाचा प्रयोग पूर्ण यशस्वी करावा अशी माझी विनंति आहे चालकानी मला ही सन्मा-नाची जागा दिली त्याबद्दल त्याचे आभार मानून व जनताजनार्दनाला वंदन करून मी प्रयोगाला सुरवात करतो

गेली तीन चारवर्षे परमेश्वरी कोपामुळे पृथ्वीवर प्रलय चालला आहे निर-निराळया राष्ट्रात राजकीय उलथापालथी होऊन क्रातीचे ताडव सुरू झाले आहे या भरतभूमीत राजकीय क्षेत्रात क्रातीचे थैमान चालू आहे तर बिहार प्राता-प्रमाणे धरणीकपाचे धक्के बसून आमची रगभूमिही उध्वस्त होत आहे गेल्या वर्षात या धरणीकंपाने आमच्या आवडत्या रंगभूमीतील कित्येक प्रेक्षणीय प्रासाद, उंच उच मनेरे, टोलेजंग इमारती, व बहारीदार बागा नामशेष केल्या महाराष्ट्र नाटक मडळी, बलवत नाटक मडळी, व समर्थ नाटक मंडळी या तीन प्रसिद्ध मंडळया या धरणीकंपात गडप झाल्या गंधर्व मंडळीहि या धक्याने हादरत असून, हा ताज-महाल केव्हा दृष्टीआड होईल याचा नेम नाही किर्लोसकर मडळीची गडप झालेली गंगा पुन्हा प्रकट होऊन झुळ झुळ वाहूं लागली आहे दुसऱ्या लहान मोठ्या कंपन्या कशातरी जीव धरून जिवंत आहेत साऱ्या हिंदुस्थानात माझ्यासारखे सौंदर्य कोणा-लाहि नाही म्हणून मोठ्या दिमाखाने आणि अभिमानाने नाचणाऱ्या आमच्या मराठी रंगभूमीची अशी करुणाजनक स्थिति होईल अशी कुणाला कल्पना तरी होती का ?

ज्या वेळी कै गणपतराव जोशी याच्या सारख्या नटसम्राटावर हॅम्लेट, अथेल्लो, मॅकबेथ सारखी जिवंत नाटके बाजूला ठेऊन तुकारामासारख्या गबाळ सताळी नाटकावर शाहुनगरवासी जिवंत ठेवण्याची पाळी आली, गद्य नाटकावर प्रेक्षकानी

बहिष्कार घातल्याकारणाने तुकारामाच्या सोंगात अर्धा अर्धा तास भजन करून अभंग गाण्याचा व टाळकुटेपणा करण्याचा प्रसंग जेव्हा त्या नटसम्राटावर आला, त्या वेळी केवळ नाट्यकलेच्या–रंगभूमीच्या उत्कर्षासाठी महाराष्ट्र नाटक मंडळी निर्माण झाली व तिने आपल्या कर्तबगारीने संगीत नाटकाकडे जोराने वाहणारा प्रेक्षकाचा ओढा आपल्याकडे ओढून आणला, तो इतका की नामांकित संगीत कंपन्याची नाटकगृहेहि काही काल कोरडी ठणठणीत पडली ! सोज्ज्वल नाटके, नटाचा शास्त्रशुद्ध अभिनय, यथातथ्य पोशाख, वास्तव देखावे या गोष्टीकडे प्रथम महाराष्ट्र मंडळीने महाराष्ट्राचे लक्ष वेधले आज सर्वत्र नाटक कंपन्यात वापरण्यात येत असलेले चेहेऱ्याचे रंग महाराष्ट्र मंडळीनेच शोधून काढले व उपयोगात आणून त्याचा प्रसार केला, दिवाणखान्याचे वास्तव देखावे, वरील छते प्रथम महाराष्ट्र मंडळीच्या रंगभूमीवर प्रेक्षकाना दिसली इतर नाटक मंडळ्याच्या एक खांबी नटाच्या तबूपेक्षा महाराष्ट्र मंडळीचा सहाखांबी शामियाना लोकाना अधिक प्रिय वाटू लागला महाराष्ट्र नाटक मंडळीने रंगभूमीवर क्रांति घडवून आणली तसाच तिने नटाचा दर्जा वाढविला नटावरचा ‘ नाटक्या ’ हा छाप प्रथम महाराष्ट्र मंडळातील नटानी आपल्या सभ्य, विनयशील वागणुकीने पुसून काढला व नटाला समाजात सन्माननीय केले महाराष्ट्र नाटक मंडळीने जी दृष्टी दिली तीमुळेच प्रेक्षकाचे लक्ष गद्य रंगभूमीकडे वळले व के गणपतराव जोशाच्या अभिनयनैपुण्याच्या रंगगंगेत ते डुंबत राहून गणपतरावाना ‘ नटसम्राट ’ म्हणू लागले, कै गणपतराव भागवत, श्री प्रधान, श्री दाते, श्री टिपणीस, श्री औंधकर व कै पोतनीस याच्या सारखे हिरे याच गोवळकोंड्याच्या खाणीत सापडले मोहना नाटकाच्या शाहूच्या प्रयोगामुळे निराश झालेल्या श्री खाडीलकराना महाराष्ट्राचे यशस्वी प्रयोग पाहून नवचैतन्य आले व त्यानी लागोपाठ नाटके लिहून मराठी रंगभूमीला सामर्थ्यवान् बनविले प्रेक्षकाच्या चष्म्यातून पाहणाऱ्या एखाद्या आधळ्या मायेफिरूला महाराष्ट्राची कामगिरी दिसली नसली, तरी तिची भरीव सेवा रंगभूमीच्या चरणी रुजू आहे या मंडळींतूनच नट नाटककार निर्माण झाले माझ्या सहकारी मित्राच्या साह्याने स्थापन केलेल्या मंडळीतच श्री विष्णुपत औंधकरासारखा यशस्वी नाटककार जन्माला आला नाटकाच्या मर्यादेपलीचे कायदेशीर व्यवहार कसे असावे हे प्रथम महाराष्ट्र मंडळी व श्री खाडीलकर यानी इतर कंपन्या व इतर नाटककार याना दाखवून दिले कै गडकऱ्याची परीक्षा महाराष्ट्रानेच केली व मराठी वाङ्मयाला ऋणी केले अशा कर्तबगार मंडळीचा केवळ चालकाच्या भाऊबंदकीत बळी पडलेला पाहून खरा महाराष्ट्र हळहळला तर नवल काय !

महाराष्ट्राची परंपरा चालविणारी समर्थ मंडळीहि याच वेळी केवळ आर्थिक आपत्तीमुळें बंद झाली ही देखील रंगभूमीची कधीहि भरून न येणारी हानि आहे

कै गडकऱ्याच्या नाटकामुळे बलवंत झालेली बलवंत मंडळी याच वेळी बंद ठेवण्याची बुद्धि तिच्या चालकाना सुचावी हे रंगभूमीचे दुर्दैवच ' नाटक कंपनी बंद करून बोलपटात पदार्पण करण्यात जरी मालकाचा वैयक्तिक फायदा होत असला तरी त्यामुळे रंगभूमीचे अपरिमित नुकसान झाले आहे टॉकी कंपनी बरोबरच नाटक कंपनी चालवून त्यानी टॉकीची व रंगभूमीची सेवा चालविली असती तर रंगभूमीने त्याना " यशस्वी व्हा " असा आशिर्वाद दिला असता

गंधर्व मंडळी अद्याप बंद झाली नसली तरी बालगंधर्व लौकरच ती बंद करणार अशा दुर्वार्ता कानावर येत आहेत श्रीमंत सयाजीराव महाराजाच्या कृपेच्या आश्रयाला पात्र ठरलेल्या या वैभवशाली मंडळीचा अस्त म्हणजे मराठी रंगभूमीवर दारुण प्रसंगच आहे बालगंधर्वांनी स्त्रीभूमिकेत रंगभूमीची सतत अठ्ठावीस वर्षे प्रामाणिकपणाने सेवा करून परमावधीची कीर्ति मिळविल्यानंतर त्याना सेवानिवृत्त होण्याचा पूर्ण अधिकार आहे अशा स्थितीतहि बोलपटाच्या द्वारे नाट्य देवतेची सेवा करण्याकरिता त्यानी कंबर बांधली आहे ही गोष्टहि त्याच्या लौकिकात भर टाकण्यासारखीच आहे परंतु त्याच्या सहकारी बंधूंनी व नटांनी गंधर्व मंडळी बंद पडूं न देता ती कर्तबगारीने चालवावी अशी सर्व रंगभूमीच्या अभिमान्याची इच्छा असणें स्वाभाविक आहे श्री गायकवाड सरकाराचा उदार आश्रय व लोकाचा प्रेमळ आश्रय याजवर कालमानाप्रमाणे कंपनीची पुनर्घटना होणे व सुव्यवस्थित कंपनी चालणे अशक्य नाही

एकीकडे मोठमोठ्या मंडळ्या बंद पडत आहेत तर दुसरीकडे नामांकित नाटककार व नट याच्यावर काळाने आपली वक्रदृष्टि फिरविली आहे वीरतनयापासून जन्मरहस्यापर्यंत रंगभूमीवर नवरसाचे फवारे उडविणारे प्रति भीष्माचार्य नाटककार श्रीपाद कृष्ण कोल्हटकर यांनी याच वेळी इहलोकची यात्रा संपवून परलोकी प्रयाण केले आहे कै तात्यासाहेबासारखा प्रतिभासंपन्न नाटककार, अभिजात विनोदाचा जनक व अष्टपैलु लेखक साऱ्या मराठी वाङ्मयात झालेला नाही गुंतागुंतीच्या कथानकाची मांडणी, वाढ आणि शेवट त्यांनीच करावा, ते ' येरा गबाळाचे काम नाही ! ' माझा त्याच्याशी मित्रत्वाचा संबंध आला हे मी माझे भाग्य समजतो प्रसंगविशेषी योग्य सल्ला देऊन त्यांनी मला उपकृत करून ठेवले आहे त्याच्या मृत्युमुळे मराठी रंगभूमि रुक्ष दिसू लागली आहे

रंगभूमीला दुसरा जोराचा धक्का म्हणजे नटरत्न वामनराव पोतनीस याचा आकस्मिक मृत्यु ! कै पोतनीसाचें पहिले नायिकेचें काम माझ्याच कमला नाटकात झाले कमला, गौरी, त्रिवेणी, राधिका या माझ्या नायिकाच्या कामात त्यानी प्रेक्षकाना रडविलें आहे रगभूमीच्या अशा संकटसमयी त्याच्यावर एकदम मरणाची गदा यावी हे तिचें दुर्दैवच ! दिपवाळीच्या दिवशी भर दोन प्रहरी एक वाजता ते नाटककार देशपाडे याना घेऊन मुद्दाम माझ्या भेटीला आले आणि त्याना ‘ या बसा ’ म्हणण्यापूर्वीच एकदम वाती येऊन त्याची हृदयक्रिया बंद पडली !

श्री वामनराव पोतनीस कैलासवासी झाले त्याच्या दुसऱ्याच दिवशी प्रख्यात सामाजिक व चित्ताकर्षक नाटक मंडळीचे मालक श्री रामभाऊ गोखले यानी स्वर्गारोहण केले अलीकडे पंधरा वर्षे त्यानी रंगभूमि सोडली होती तरी त्यापूर्वी पंधरा वर्षे त्यानी रगभूमीची उत्कृष्ट सेवा केली असून त्याच्या मरणाने रंगभूमीवर चमकलेला एक तेजस्वी तारा अस्ताला गेला यात मुळीच शका नाही !

वृक्ष उभा असला की त्याच्या छायेत बसून किंवा त्यावर आरोहण करून पशुपक्षी आपला योगक्षेम चालवितात पण तोच वृक्ष वादळात सापडून उन्मळून पडताना ते त्याला सावरून न धरता सोडून जातात रगभूमि अशी शरपजरी पडलेली पाहून काही नामाकित नटाना याच वेळी तिला शेवटचा रामराम ठोकून सिनेमा कंपन्याचा आश्रय धरावा लागला !

रंगभूमीच्या पाठचे भावड म्हणजे चित्रपट आतापर्यंत मुकें असल्यामुळे आपले मनोगत खाणाखुणानी व मुद्राभिनयानी प्रकट करून प्रेक्षकाचे मनोरंजन करीत होते परंतु आज चार वर्षे त्याला वाचा फुटल्यावर त्याने आपल्या गुणानी साऱ्या जगाचे लक्ष आपल्याकडे वेधून घेतले तर नवल काय ! पण त्यामुळेहि रंगभूमीचे नुकसान झाले आहे एखाद्याच्या पाठीवर पाय देऊन येणारे भावड त्याच्या मूळावरच जन्म घेते तसेच हे झाले !

मुकी चित्रें बोलू लागली, गाऊ लागलीं, स्वाभाविक अभिनयानी आणि देखाव्यानी नेत्राना अत्यंत आल्हाद देऊं लागलीं आणि हे सर्व नाटकाच्या एक चतुर्थांश मोबदल्यात आणि दोन तासात ! मग काय ! लोकाच्या झुंडीच्या झुंडी सिनेमाकडे धावूं लागल्या ! नाविन्य, वैचित्र्य, स्वस्त दर, अल्पकाल, सुंदर नट, स्त्रियाच्या भूमिकाना लावण्यवती नटी, गर्दीचे सीन, लढाईचे देखावे, सारेच अजब ! टॉकीने आपल्या वैभवानें लोकाना दिपवून टाकले ज्याच्या त्याच्या

तोंडी टॉकी फिरत्या टॉकिवाल्यानी गोरगरीब खेडवळाचा पैसा घटोत्कचाच्या मायाबाजारासारखा लुटून आणला टॉकीचे वेड सर्वत्र पसरले

नाटक कंपन्या टकमक पाहू लागल्या ! हें काय बंड आहे त्याना काहीच कळेना परंपरागत चालत आलेल्या पद्धतीप्रमाणे आम्ही सहा सहा तास नाटकें करतो, वीस वीस मिनिटें एक एक गाणे घोळणाऱ्या नटाना आम्ही सभाळतो रोज दाढी करून स्त्रीपार्टांत नाणावलेल्या व दहा वीस वर्षे लोकप्रिय झालेल्या पुरुष नटाकडून आम्ही कामे घेतों, कापडावर रंगाविलेले बागाचे आणि अरण्याचे भडक देखावे आम्ही दाखवितों, आमच्या मोठ्या दर्जाप्रमाणें आम्ही पाच पाच रुपयापासून आठ आण्यापर्यंत दर ठेवतो, आम्हाला व प्रेक्षकाना जागरणाचा त्रास न पडावा म्हणून आठवड्यातून फक्त तीनच खेळ लावतो मग आमच्या भारदस्त नाटकाना टाकून त्या बकाली टॉकीकडे हे लोक का धावतात ?

नाटक कंपन्या गडबडल्या ! टॉकीने दाखविलेल्या नाविन्याने त्यानीं शॉक घेतला व अंथरुण धरले ! टॉकीमुळे आपल्याला ही दशा आली, टॉकी आमची शत्रु त्या टॉकीला पाण्यात पाहू लागल्या !

टॉकींत नटाना पगार भक्कम मिळूं लागला नटानी नाटक कपन्या मोडण्यास भटाभड सुरवात केली, त्या मोडकळीस आल्या, पण नाटक कपन्या ह्मणू लागल्या हे टॉकीचे बंड आज ना उद्या मोडणार आणि आमचे नट पुन्हा आमच्याकडे धावत येणार मूक चित्रपटाच्या अभिमान्याचीहि अशीच दिशाभूल झाली तेहि म्हणूं लागलेकी टॉकी मुळीच टिकणार नाही चार दोन वर्षांत टॉकी कपन्याची दिवाळीं निघतील आणि पुन्हा आमची मुकी मुलेच नाचूं लागतील ।

सगळाच गोंधळ ! शातपणाने कोणीच या प्रश्नाचा विचार करीत नाटक कपन्याची दृष्टि अद्याप निवळत नाही नाटक व टॉकी समोरासमोर उभीं करून कमी अधिक गुण काय आहेत याची कोणी विचारपूर्वक छाननी करीत नाहीत

नाटक म्हणजे रंगभूमीवर प्रत्यक्ष दिसणारे श्राव्य दृश्य व टॉकी म्हणजे रुपेरी पडद्यावर दिसणारे श्राव्य दृश्य दोघाचेही कार्य नाट्यकला हेच असल्यामुळे नाट्याचे गुण पूर्णत्वाने दाखविणे हे दोघाचेंही अंतिम आहे आत्म्याला आपले दृश्य स्वरूप दाखविण्यासाठी जसा देह धारण करावा लागतो, त्याप्रमाणेच नाट्याला आपले दृश्य स्वरूप दाखवावयाला कथानकाची जरूरी असते या कथानकावरच नाटक किंवा टॉकी याची रचना करावयाची असते नाटक व टॉकी याची रचना पद्धति अगदी भिन्न आहे. पात्रे तीच, त्याचा परिपोष तोच, त्याचे पर्यवसानही तेच

पण त्याची आखणी मात्र भिन्न नाटक रंगभूमीच्या चोवीस फुटाच्या मर्यादित भागात दाखवावयाचे असें, तर टॉकी एक फूटापासून सर्व पृथ्वीवर धिगाणा घालीत सुटते नाटक एक ,अंकापासून सामान्यपणें पाच अंका पर्यंत किंवा एक प्रवेशापासून फार तर बारा पंधरा प्रवेशापर्यंत तर टॉकीला प्रवेशमर्यादाच मुळी नाहीं तिचे कथानकाप्रमाणें शभर प्रवेश देखील पडतात दोहोंची संभाषणे लेखनाची पद्धति व प्रमाण हीं भिन्न असतात नाटकात तयार केलेली मूर्ति जशीच्या-तशी दाखविता येते तर टॉकींत तयार केलेल्या मूर्तीचे अनेक तुकडे करून त्या तुकड्याची चित्रे काढून, ती सादून पुन्हा चित्र रूपानें दाखवावयाची असते नाटकाचे तंत्र ( टेक्निक ) निराळे, टॉकीचे निराळे ! हे लक्षात घेऊन नाट्यकवि नाटक किंवा टॉकी लिहितो नाटक लिहिणाराला नाटककार, व टॉकी लिहिणाराला कथालेखक म्हणतात टॉकीचे तत्र न जाणणाऱ्या नाटककारला टॉकी लिहिता येत नाहीं, आणि नाटकाचे तंत्र न जाणणाऱ्या कथालेखकाला नाटक लिहिता येत नाही, दोन्ही लेखकाची योग्यता सारखीच आहे पण नाटकाच्या क्षत्रात नाटककाराला जा श्रेष्ठ मान आहे, तो कथालेखकाला टॉकीच्या सृष्टीत मात्र नाही.

टॉकीच्या क्षेत्रात दिग्दर्शक म्हणजे डिरेक्टर ही एक सर्वज्ञ व्यक्ति असते तिच्या अंगी परमेश्वराप्रमाणे कर्तुम् शक्ति असते तो स्वत मालक असतो किंवा मालकाचा त्याच्यावर पूर्ण विश्वास असतो एकाद्या उत्तम कथालेखकानें कितीही उत्कृष्ट कथा ( स्टोरी ) लिहून आणली तरी तिच्यात पुष्कळसे फरक केल्यावाचून त्याला चैनच पडत नाहीं आपल्या कल्पनेत जे येते ते बरोबर, इतरांचें गचाळ अशी त्याची खात्रीच असते कधी कधीं तो स्वत च दहावीस फिल्म मधले शेलके प्रसंग चोरून एकादें कथानक तयार करतो व एकाद्या नाट्य लेखकाकडून त्यातील पात्राच्या तोंडचे फक्त संवाद तो आपल्या देखरेखीखाली लिहून घेतो एका कवीकडून त्यातील गाणी तयार करवितो. व नंतर सिनरीओ लिहून तो टॉकीच्या चित्रीकरणाची तयारी करतो डायरेक्टर टॉकीची भाषणें कधी कधी नटाना पाठ करावयास देतो तर कधी कधी आयत्यावेळी त्याना सागतो ही भाषणें नीट उच्चारात बसवून घेण्यासाठी तालीम मास्तर किंवा रिहर्सल मास्तर असलाच तर तो आपल्या जिवाची उरफोड करून नटाकडून ती बसवितो पण चित्रपट घेताना डायरेक्टर साहेब कित्येक वेळा सारेच उच्चार बदलून तरी टाकतात किंवा ती भाषणे अजिबात गाळून लेखकाला नवीन संवाद लिहिण्याचा हुकूम देतात कित्येक वेळा अगदी आयत्या वेळी कथानकात व मुख्य पात्राच्या स्वभावात देखील फरक होतात साधारणपणे हा प्रकार बऱ्याच कंपन्यात चालू असतो ज्या कथालेखनावर

अफाट पैसा खर्च केला जातो, त्या कथेचे अशा तऱ्हेचे धिंडवडे चालतात. कथा-लेखकच कथेचा निर्मिता ईश्वर असतो, पण त्याला कोणींच विचारत नाहीं त्याच्या बगीचाची धुळधाण करणाऱ्या सैतानाचा मात्र मान सन्मान !

नाटक किंवा टॉकी साभिनय करून दाखवतो तो नट रंगभूमी नट व सिनेमा नट अशा जाती मी पाडीत नाही रंगभूमी व चित्रपट हीं दोन्ही क्षेत्रें भिन्न असलीं तरी नटाचे मुख्य अभिनयाचें काम त्याला एकच पडतें रंगभूमीवर म्हणजे नाटकात क्रोधाचा, शोकाचा किंवा आनंदाचा एक अभिनय, आणि चित्रपटात दुसरा असे नाही एकाच नटाला रंगभूमी व टॉकीमध्यें काम करता आलें पाहिजे मात्र नाटक व टॉकीचे तंत्र निराळे आहे, हे जाणून त्याने काम केलें पाहिजे उदाहरणार्थ, नाटकाच्या वेळी थिएटरच्या कोनाकोपऱ्यात सुद्धा चागले ऐकूं जाईल इतक्या मोठ्या आवाजात साधारणपणें नटास बोलावे लागते टॉकीत तसें बोलून चालत नाही आपण व्यवहारात जसे साधारण आवाजात बोलतो तसें बोलावें लागतें, त्याला नाटकासारखा सर्व प्रवेश एकदम करावा लागत नाही टॉकीच्या तंत्राप्रमाणे त्याला तुटक तुटक तुकड्यानीं काय करावे लागते कधीं कधीं नुसती रागाची किंवा आनंदाची मुद्रा करून तिचे चित्र काढलें जातें त्यामुळें मुळींच अभ्यास न केलेल्या नव्या नटाला दखील टॉकीत काम करणे जड जात नाहीं त्याला प्रत्येक तुकड्यापुरतें भाषण व अभिनय डायरेक्टर सागत असतो व तेवढाच भाग चित्रित केला जातो

डायरेक्टरच्या कसबावर सिनेमानटाची कीर्ति किंवा अपकीर्ति अवलंबून असते नाटकात काम करणाऱ्या नटाला एकदम टॉकीत उभे केले तर प्रेक्षकाकडे पाहून भाषण करण्याच्या संवयीमुळे कॅमेऱ्याकडे पाहून तो खड्या आवाजात बोलूं लागतो रागाच्या किंवा क्षोभाच्या वेळी तो आरडा ओरडा व आक्रोश करतो हें त्याचें करणे टॉकीच्या दृष्टीने चुकीचें ठरते आपण केलेला अभिनय व भाषण कॅमेरा व रेकॉर्डींग मशीनच्या सहाय्याने घ्यावयाची असतात, हे ओळखून त्याने डायरेक्टर सागेल त्याबरहुकूम त्याने आपले काम बजाविले पाहिजे तो जर डायरेक्टरच्या मर्जीप्रमाणें न चालेल तर एखाद्या टाकाऊ नटाइतकेही त्याचे काम चित्रपटात दिसणार नाहीं. सिनेमात नटाची परावलंबी स्थिति असते

रंगभूमीवर नट स्वतंत्रपणाने वावरूं शकतो नाटकाच्या डायरेक्टरचे काम पडद्याच्या मागेच संपतें तो शिक्षण देऊन नटाला रंगभूमीवर सोडतो, व नट स्वत च्या ज्ञानावर इतर पात्राना साथ देऊन आपले गुण प्रेक्षकाना दाखवितो

सिनेमात काम करणाऱ्या नटाला काम करताना जर रंगभूमीचे तंत्र माहित नसले तर त्याचे भाषण नाटकगृहात पुढच्या दोन रागानाही ऐकूं जाणार नाहीं रागाच्या किंवा शोकाच्या प्रसंगी त्याचा आवाज बसेल, चिरकेल, तो एकाच जागीं उभा राहील किंवा उलटा सुलटा फिरेल आपल्या कामाचा परिणाम प्रेक्षकावर कसा करावयाचा हें त्याला कळणार नाहीं प्रेक्षकाकडून नापसंतीचा थोडासा उद्गार निघताच तो घाबरून जाईल व सर्व नाटकाचा अगदी बेरंग करील ! टॉकीप्रमाणे तुकड्यातुकड्यानीं अभिनय करून घ्यावयाला डायरेक्टर जवळ नसल्यामुळे त्याची तारांबळ उडेल. व भोपळ्यावर पोहणाऱ्या माणसाचा भोपळा काढून घेतल्यावर जसा तो गटांगळ्या खातो त्याप्रमाणेच डायरेक्टरचा भोपळा दूर झाल्याबरोबर त्याची प्राणांतिक अवस्था होईल !

अशी वस्तुस्थिती असताना ‘ आम्ही सिने आर्टिस्ट ’ म्हणून भूषण मानणारे नट, रंगभूमीवरील नटाना टॉकीत काम करता येत नाही अशा कल्पना करतात हे आश्चर्य नाही का ? डायरेक्टर आपल्याला साजेशी पोज देतो, रडण्याचा भाव दाखविण्याकरिता ग्लीसरीनचा ओघळ आपल्या डोळ्यामधून गालावर पाडतो, या गोष्टीची जाणीव असूनही स्वतःच्या सामर्थ्याने प्रेक्षकाचीं अंतःकरणे खळबळून सोडणारा नाटकी नट सिनेमाला नालायक कसा ठरतो ? हा निव्वळ मत्सर आहे ! नाटकी नट सिनेमा नटाला मुळीच हलका मानीत नाही तो इतकेच म्हणतो की, सिनेमात काम करणें सोपें आहे, व हे त्याचे म्हणणे मुळीच खोटे नाही मी तर म्हणतो कीं स्वतंत्र नाटकी नट परतंत्र सिनेमानटापेक्षा केव्हाही श्रेष्ठच ! कित्येक सूज्ञ सिनेमानट हे जाणतात आणि म्हणूनच त्याच्यातील खरे कलावंत नाटकात काम करण्याची उत्सुकता दर्शवितात नटानी नाटकात व सिनेमात सारखेच सव्यसाची का बरे नसावे ? नुसते ‘ नट ’ म्हणवून घेण्यातच त्याला अभिमान वाटावा ‘ सिनेमानट ’ असे कोणी म्हणल्यास त्याला अपमान वाटला पाहिजे. रंगभूमिवर नटाला पूर्ण स्वातंत्र्य असल्यामुळे त्याला आपल्या अंगच्या गुणाचा प्रकाश स्वतःच्या कर्तबगारीवर पाडता येतो डायरेक्टरच्या पर प्रकाशावर जगणाऱ्या नटाचे तसें नसतें नाटकी नटाला रंगभूमिवर प्रत्यक्ष येऊन लोकाचे शुभाशीर्वाद किंवा शिव्याशाप घ्यावे लागतात व एखादे वेळी गंडेरी खाण्याची त्याच्यावर पाळी येते प्रत्यक्ष समोर असलेला प्रेक्षकसमुदाय त्याला परमेश्वर तरी वाटतो किंवा सैतानासारखाही भासतो असल्या भयंकर दिव्यातून त्याला जावें लागतें. सिनेमानटाची प्रत्यक्ष प्रेक्षकाशी गाठ पडत नसल्यामुळे त्याला वरील गोष्टीचा अनुभव येणें शक्य नाही

नाटक हे प्रत्यक्ष नटाकडून रंगभूमीवर होत असल्याकारणानें त्यात जिवंतपणा असतो टॉकीत नटाची चित्रें वावरत असल्याकारणानें प्रेक्षकाना नाटकाचें समाधान टॉकींत मिळत नाहीं. उत्तम तालमी घेऊन बसविलेलें नाटक प्रथम प्रयोग झाल्यावर जसजसे त्याचे जास्त प्रयोग होतील तसतसें जास्त आकर्षक होतें. कारण प्रत्येक प्रयोगात नटवर्गाची कामे सुधारत जातात प्रेक्षकाच्या प्रत्यक्ष प्रोत्साहनाने नटास हुरूप येऊन नाटकास जास्त रंग भरतो अशा प्रकारचा अवसर टॉकीत नटाला मिळत नाही तसेच रसोत्पत्तीच्या दृष्टीने नाटकात प्रसंग रंगविण्यास भाषा व संगीत याना टॉकीपेक्षा जास्त अवसर सापडतो संगीत हें श्राव्य असलें तरी ज्याच्या मुखातून तें निघते त्या गायकाचा चेहरा दिसला नाही तर श्रोत्याला समाधान वाटत नाही त्याचा चेहरा पाहण्यासाठी तो धडपडतो पात्राच्या प्रत्यक्ष दर्शनाचा असा महिमा असल्यामुळें नाटकाच्या वैशिष्ट्याबरोबर त्याचे श्रेष्ठत्वही अबाधित कायम राहील, व टॉकीची कितीही वाढ झाली तरी नाटके ही जिवंतच राहतील यूरोपात ख्रिस्ताच्या चरित्रावर अनेक चित्रपट निघाले आहेत तरी ज्या वेळी एखाद्या शहरात ‘ पॅशन प्ले ’ लागतात त्यावेळीं निरनिराळ्या देशातून यात्रेप्रमाणे लोकाच्या झुंडीच्या झुंडी त्या शहराकडे लोटत असतात लोकाना ख्रिस्ताचे दर्शन प्रत्यक्ष घडल्यासारखे वाटत असल्याचा हा परिणाम आहे

नाटक जर श्रेष्ठ तर आजकाल त्याला टॉकीबरोबर टक्कर का मारता येत नाही ? टॉकीच्या थिएटरात तुफान गर्दी आणि नाटकाची थिएटरे रिकामी का ? टॉकीला हजारो रुपये फायदा तर नाटकाच्या गंगाजळीत थिएटरभाडे चुकते करण्यापुरतेहि पैसे का जमत नाहींत ? टॉकी कंपन्याची भरमसाट भरभराट तर नाटक कंपन्याची दिवाळी का निघत आहेत ? प्रश्न अगदी स्वाभाविक आहेत, पण त्याचे उत्तर सरळ आहे. समुद्राला एका ठिकाणी भरती लागते तर त्याच वेळी दुसऱ्या ठिकाणी त्याला ओहोटी लागलेली असते लोक टॉकींना जाऊं लागले पैसे देवूं लागले तेव्हा नाटके पडली व त्याना दारिद्र्य आले हें बरोबरच झालें.

पण असे का व्हावे ? शास्त्रीय शोधामुळे अगदी थोड्या माणसांच्या श्रमावर उपयुक्त गोष्टींची जास्त पैदास झाली व लोकाच्या गरजा अधिक प्रमाणात भागूं लागल्या तर मूळ धंदा बुडतो. हातमागाचे उदाहरण घ्या, यांत्रिक सुधारणेमुळे अगदीं थोड्या लोकाच्या श्रमांवर गिरण्यात हजारो माग चालू होऊन मुबलक कापड निघूं लागताच हातमागाचा धंदा अजिबाद बुडाला ! गिरणीवाले कोट्या-

धीश झाले तर बिणकर उपाशी मरूं लागले नाटकाच्या एका प्रयोगाच्या श्रमात कॅमेरा व रेकॉर्डींग याच्या साह्याने टॉकीच्या फिल्मस तयार होऊन गांवोगाव दिसूं लागल्यामुळेच नाटकधंदा बसत चालला एका नाटकाचे एका आठवड्यात दोन प्रयोग होतात तर तितक्याच वेळात टॉकीचे शे सवाशें खेळ होतात ! नाटक एका ठिकाणी चालतें टॉकी त्याच वेळी शेकडो ठिकाणी लोकांची करमणूक करीत असतें या कारणानें नाटक टॉकीबरोबर टक्कर मारूं शकत नाहीं शास्त्रीय शोधाचा हा विजय आहे नाटक श्रेष्ठ कीं टॉकी श्रेष्ठ हा प्रश्नच येथे उद्भवत नाही उद्या रेडिओच्या शास्त्रात प्रगति होऊन बसल्याजागी भाषणाबरोबर टॉकीप्रमाणे चित्रेहि दिसूं लागली तर टॉकीचा धंदाहि बुडेल, कारण पृथ्वीच्या पाठीवर कोठेहि एक टॉकी फिल्म चालूं केली तरी रेडिओमुळे ती एकाच वेळी सर्व ठिकाणी दिसूं शकेल व रशियासारख्या हजारो मैल दूर असलेल्या देशात होणारी नाटकें बसल्या जागी आपणास पहावयास मिळतील

नाटकधंद्यावर गदा आली, नाटकधंद्याचे मालक बुडाले तरी नाट्याचें व नटाचें त्यात मुळीच नुकसान नाही नाटक कंपनी बंद झाली तर नट टॉकीत जातात व चांगल्या नटाची टॉकींना जरूर असल्यामुळें नाटककंपनीपेक्षा द्रव्यदृष्ट्या तर त्याचा जास्तच फायदा होतो

गिरणीवाल्याना क्रोडो रुपये मिळून ते गबर झाले तरी बिचाऱ्या विणकराला कसा बसा धंदा चालवून आपले पोट भरावेच लागते. त्याप्रमाणेंच सिनेमा कंपन्या मातबर झाल्या तरी नाटक कंपन्यानाहि आपला चरितार्थ चालविणे भाग आहे नाटक कंपनीचा मालक लक्षाधीश होणार नाही पण कंपनी स्वावलंबी करून चार पैसे फायदा मिळविणें त्याला अशक्य नाही

नाटकधंद्याला इतका जबरदस्त धक्का बसण्याला आणखी कारणे झाली पहिले कारण धंदेवाल्याचा गाफिलपणा ! सिनेमाची बेसुमार वाढ व लोकप्रियता आज ना उद्या आपल्याला जाचक होऊन आपल्या पोटावर पाय येणार या गोष्टी स्पष्ट डोळ्यासमोर असताना देखील नाटकवाले जागे होऊन आपला धंदा सुधारण्याच्या उद्योगाला लागले नाहीत नाटकात जास्त चित्ताकर्षकत्व आणण्याचा त्यानी मुळींच प्रयत्न केला नाही उद्या सिनेमा बोलूं लागणार व आपले तोंड बंद पडणार हे त्यांना कळायला हवे होते ते प्रेक्षकाच्या हौशीपेक्षा स्वतःच्या आवडीची किंवा हांजीहाजीखोर मित्राचीच गबाळी नाटके बसवूं लागले सिने-मात नटींचा सहज सुंदर अभिनय लोकांवर छाप बसवूं लागला तरी राकट

पुरुषाच्या स्त्रीभूमिकातच ते तन्मय राहिले सारांश प्रेक्षकाच्या मागणीप्रमाणे पुरवठा करण्याचें किंवा स्वत च्या कर्तबगारीनें नाटकाकडे प्रेक्षकाना खेंचून आणण्याचे त्याच्या मनात देखील आलें नाहीं. दुसरें कारण धंद्याला न झेपणारा जबरदस्त खर्च, नाटक धंद्याची यत्किंचित्‌ही माहिती नसणाऱ्या एकाद्या मूर्ख टीकाकाराप्रमाणे काही कर्तबगार मालकाच्या मोटारगाड्यावर माझा मुळीच कटाक्ष नाही. तर प्रत्येक फिरत्या व स्थायिक कंपनीनें शक्य तर एक मोटारकार व एक लॉरी अवश्य बाळगावी अशा मताचा मी आहें माझा कटाक्ष परंपरागत चालत आलेल्या काही गोष्टीवर आहे धंदा या दृष्टीनें व्यापारी तत्वावर कंपनी चालविणें सोडून जहागिरदारी थाटावर कंपनी चालविण्याकडेच अलीकडे कंपनीच्या मालकाचा कल झुकल्यापासून जेवायला शंभर आणि कामाला बोटभर–म्हणजे हाताच्या बोटा इतकी–असा ऐदी माणसाचा भरणा कंपन्यात झाला उत्पन्न दिवसें दिवस कमी व त्यात खर्च भागणे मुष्कील, अशी नाटक कंपन्याची परिस्थिति झाली

त्रेतायुगातली नाटके कालमानाप्रमाणे काही एक बदल न करता किंवा त्यात नाविन्य न आणता करण्याचा त्याचा क्रम चालूच होता समाजाच्या वाढत्या आकांक्षेप्रमाणे स्वतंत्र विचाराची नवी कलावंत नाटके योग्य सजावटीत व वास्तव देखाव्यात त्यानी रंगभूमीवर आणावयास हवी होती अशा प्रकारचा प्रयत्न ललितकलादर्श मंडळीने केला व म्हणूनच कलेच्या दृष्टीने त्याची रंगभूमि अद्याप टिकाव धरून राहिली आहे श्री पेंढारकराना इच्छा आहे, पण परंपरागत कंपनीची पुनर्घटना करण्याला त्याचा हात धजत नाही त्यानी केवळ कर्तव्य म्हणून या कामाला हात घालावा कलेच्या व धंद्याच्या दृष्टीने त्यात यश मिळाल्यावाचून राहाणार नाहीं.

अशाच प्रकारचा दुसरा प्रयत्न नाट्य मन्वंतर कंपनीने केला व आंधळ्याची शाळा नाटकाचा प्रयोग तिने आधुनिक तऱ्हेच्या सजावटीत आणि अभिनयात यशस्वी करून दाखविला, त्यात स्त्रियाची कामे स्त्रियानी–कुलीन स्त्रियानी–केली, त्यामुळे समाजात वरील खळबळ उडाली मुख्य नायिकेचे काम तर सौ. ज्योत्स्ना भोळे यानी इतक्या तन्मयतेनें आणि कौशल्याने केले की तसे स्त्रीपात्राचे काम मुंबईच्या रंगभूमीवर आजपर्यंत कोणत्याहि पुरुष अगर स्त्री नटीने केले नाही आंधळ्याच्या शाळेचे यश केवळ सौ ज्योत्स्नामुळेच नाट्यमन्वंतरला लाभले परंतु लवकरच जुन्या परंपरेतील डायरेक्टराच्या भारणाला बळी पडून कंपनीने

आपले ध्येय सोडले व अगदी सामान्य प्रेक्षकाच्या मनोवृत्तींना देखील न पटणारी नाटकेच त्याच्या रंगभूमीवर दिसूं लागली झालें ते झाले, या पुढें तरी नाटकवाल्यानी सर्वांग कंपन्याची सुधारणा करावी धंदा यशस्वी झाल्यावाचून कलेची जोपासना व वाढ होत नाही हे ध्यानात ठेऊन व्यापारी तत्वावर कंपनी चालवून ती स्वावलबी करावी व्यक्तिश प्रत्येक कंपनीवर ती गोष्ट सोपविण्यापेक्षा हल्ली हयात असलेल्या सर्व कंपन्यानी संघटित रीतीने या उद्योगाला लागणे इष्ट आहे

प्रथमत सर्व कंपन्याची परिस्थिति, त्याचे उत्पन्न व खर्च याची पद्धतशीर चौकशी करण्यासाठी तज्ञाची एक चौकशी कमिटी नेमावी, त्या कमिटीनें साधारणपणे प्रत्येक कंपनीचे उत्पन्न व खर्चाचे प्रमाण काढावें व त्या प्रमाणावर त्या त्या कंपनीने आपल्या खर्चाची आखणी करावी कमीत कमी उत्पन्न व जास्तीत जास्त खर्च यावर हे प्रमाण बसवावे उत्पन्नात सर्व खर्च बसवणें भाग असल्यामुळे त्यासाठी हल्लीची कपन्याची पद्धत मोडावी लागेल हल्ली कंपनीच्या मालकाला नटवर्गाच्या सोईसाठी एक आलेजाही खाणावळ चालवावी लागते ही पद्धत एकदम बंद करून नटाना व नोकराना कोरडे पगार देण्याची प्रथा पाडावी ऑफीसप्रमाणे वेळच्यावेळी नटानी व इतर नोकरानी कंपनीत यावें व आपली कामे करावी मालकानी चटकदार नाटकाची निवड करावी किंवा लोकप्रिय नाटककाराकडून लिहून घ्यावीत

गेल्या दोन तिन वर्षात रंगभूमिवर आलेली नाटके म्हणजे नर्थिरुप काकासाहेब खाडिलकराचे सावित्री, श्री वरेरकर याची जागती ज्योत, नामानिराळा, सदा बंदिवान, व स्वयंसेवक, श्री य ना टिपणीस यांची स्वस्तिक बँक व शिवाजीला शह, श्री औंधकराचा महारथी, श्री शुक्राचा सत्याग्रही, श्री ना वि कुळकर्ण्याचें मंगलभुवन श्री कमतनूरकराचे स्त्रीपुरुष श्री वसंतराव देसायांचे अमृत–सिद्धि, श्री गद्रे याचा पुणेरी जोडा, श्री फाटक शास्त्र्याचे व्याहीविहिणी श्री देशपाड्याची उमाजी नाईक व त्यागसम्राट, श्री वर्तकाची आधळ्याची शाळा, लपंडाव व तक्षशीला, श्री टाकऱ्याचा खरा ब्राह्मण, श्री हडपाचें देवकी श्री बेडेकराचे ब्रह्मकुमारी, सौ मालतीबाई तेंडुलकराची अर्धांगी व मराठ्याचा राजा, श्री बेडे याची बेबी, बुवा व पाचाली श्री ताम्हनकराचें उसना नवरा प्रो फडक्यांचे संजीवन हीच यांशिवाय काही नवशिक्या नाटककाराचीहि नाटकें असतील.

नाटककारात जुने व नवे असे भेद पाडल्यास नवीन नाटककाराबद्दल निराशेचेच उद्गार काढावे लागतात पदवीधर व बिन पदवीधर असे नाटककारात भेद

पाडल्यास पदवीधरापेक्षा बिन पदवीवालेच चागले ठरतात  नाटकाच्या परीक्षेवर जर त्याच्या पदव्या ठेवल्या तर बहुतेकाच्या पदव्या काढून घेण्याबद्दलच युनिव्हर्सीटीस सागावे लागेल  काहीतरी विषय घेऊन स्त्रीपुरुष पात्राच्या तोडीं संवाद घालणे म्हणजे नाटक नव्हें पदव्या नसणाराना हे अशिक्षित नाटककार म्हणून नावें ठेवतात  युनिव्हर्सीटीची पदवी म्हणजे नाटक लिहिण्याला लायसेन्स असे थोडेंच आहे ! नाट्यकला सोपी नाही, पदवीबरोबर तिचा संचार शरीरात होत नाही, तिच्याकरिता निराळी तपश्चर्या करावी लागते ती कला साध्य व्हावयाला नाटकाचें तंत्र शिकावें लागते, त्याकरिता रगभूमिशी नट म्हणून अथवा तदनुषगिक संबंध यावा लागतो काही पदवीधर नाटककार आपल्या पदवीच्या साहाय्याने नाटक कंपनीत प्रस्थान ठेवतात व नाटकवाल्याची अवास्तव स्तुति व हाजी हाजी करून आपली नाटके खपवितात मालकाच्या पुढें ते दिवसभर लाळ घोटीत असतात, त्याच्याकडेच राहून आपले चहा, कॉफी सिगारेटपासून भोजनापर्यंतचे सारे खर्च वाचवतात, कंपनीच्या अंतर्गत कारभारात मुद्दाम लक्ष घालून आपल्याला जाचक व्यक्तीबद्दल मालकाची मने कलुषित करतात, व मुख्य नटाना क्वचित् प्रसंगी मालकाविरुद्ध सल्ला देऊन कंपनीच्या नाशालाही कारणीभूत होतात.

अशा नाटककारापासून नाटकवाल्याने सावध असावे ते तुमच्या गळयांत बंधु म्हणून, काका म्हणून, ताई म्हणून, मावशी म्हणून आपली गचाळ नाटके बाधतील आणि शेवटी पस्ताव्यात पाडतील  तुम्हाला जे नाटक उत्तम वाटेल तेच घ्या त्याबद्दल देण्याघेण्याचा करार अगोदरच करा नाहीतर मागाहून भानगडी उत्पन्न होतात व पश्चात्तापाची पाळी येते कारण हे विद्वान लोक तुमची चुकी नसता तुमची वाटेल त्या मार्गानें बदनामी करतात मी स्वत या बाबतींत पोळलो आहे.

केसरीचे संपादक दे भ तात्यासाहेब केळकर यांचे ‘ तोतयाचें बंड ’ हे नाटक मी घेतले तें त्याच्याच परवानगीने नीटनेटके करून बसविले, त्याच्यासाठीं कर्ज काढून सजावट केली, त्यासाठी कलेक्टर साहेबाच्या मागे दहा ठिकाणी हिंडून परवानगी मिळविली, उद्या प्रयोग म्हणून जाहिराती लावल्या, पण रात्रीं रंगीत तालमीच्या वेळी ते विलक्षण संतापले व नाटक करूं नका असे त्यानी दरडावून सांगितले पण दुसरे दिवशी परत भेटले व खेद पदर्शित करून प्रयोग लवण्याबद्दल मला गयावया करून सागू लागले. मला त्याचा कावा कळला नाही, मी

प्रयोग लावला नंतर त्याच्या दुसऱ्याच दिवशी त्यानी मला घरी बोलावून पैशाचा प्रश्न काढला व पुढें तर माझ्याशी चमत्कारिकच वर्तन केलें, त्यानीं माझा सूड घेतला, त्यानी चित्ताकर्षक कंपनीकडून मला ' तोतयाचे बंड ' बंद करण्याबद्दल नोटीस दिली मी मुद्दाम त्यांची भेट घेतली व परिस्थिती सागितली. कायद्याने नाटक मला करता येतें असा वकीलांनी मला सल्ला दिला परंतु कै तात्यासाहेब कोल्हटकर याच्या शब्दाला मान देऊन मी तोतयाचे बंड बंद केलें. वस्तुस्थिती अशी होती ही निव्वळ खासगी गोष्ट होती परंतु सन १९१२ साली घडलेल्या गोष्टीचा सूड केळकरानीं वीस वर्षानी म्हणजे सन १९३२ साली आपल्या एका चेल्याकडून माझ्यावर उगवला आपल्या बडोद्याचेच प्रो दाडेकर यानी श्री केळकराच्या एकसष्टीनिमित्त ' केळकराची ६ नाटके ' नावाचे एक पुस्तक प्रसिद्ध केले. त्याच्या प्रस्तावनेत पुस्तकातील सर्व मजकूर गुरुवर्य केळकर याच्या नजरे खालून गेल्या असल्याचा उल्लेख आहे त्या पुस्तकात ' तोतयाचे बंड ' नाटकाच्या इतिहासाची माहिती देताना माझ्या सबंधाने बदनामी करणारा मजकूर आला आहे त्याचा उतारा मी आपणास वाचून दाखवितो " पुढे १९१२ साली...हा अप्पा टिपणीस यानी भारत नाटक मंडळी काढली रा टिपणीसानी पुन केळकराजवळ नाटकाची मागणी केली......मग अवघ्या दहा दिवसात चार सव्वाचार अंकाहून अधिक नाटक लिहून झाले ! रा अप्पाटिपणीस याना हा भाग इतका आवडला की त्यानी त्याच्यावर स्वामित्वाचा हक्क दाखवून उडी घातली ! टिपणीसानीं नाटक बसवावलाहि घेतलें, व नाटकाचा शेवटचा प्रवेश तर रंगीत तालमीच्या दिवशीच केळकरानी लिहून दिला ! टिपणीसानी नाटक फार घाईघाईनें बसविलें व तें घेऊन ते बाहेर गावी गेले ! पैशासंबंधी बोलणे निघाले असताना मात्र त्यानी आश्चर्यकारक वर्तन केले यामुळे केळकरानी नाटक करण्याची त्याना बंदी केली "

ही हकीकत प्रोफेसर साहेबाना केळकरानी स्वत सागितली व तीवर विश्वास ठेऊन कारण नसता त्यानी ती आपल्या पुस्तकात घातली ती घालण्यापूर्वी त्यानी त्या माहितीच्या खरेखोटेपणाबद्दल मला विचारलें असते तर मी आपली बाजू त्याना सागितली असती त्याच्या पुस्तकात ती आल्याकारणाने त्याचे पुस्तक हयात असेपर्यंत माझ्या नावाची कायमची बदनामी होत रहाणार, त्यामुळे येथे प्रसिद्धपणें माझी बाजू माडण्याची पाळी माझ्यावर आली व आपलाहि बहुमोल वेळ खर्च झाला प्रो दाडेकरांचे व माझे वाकड नाही, त्याचा माझा परिचय

नाहीं, त्याना अद्याप मीं पाहिलेंहि नाहीं त्याच्याबद्दल मला बोलावे लागत आहे त्याला इलाज नाहीं.

असे प्रसंग येऊं नयेत यासाठी नाटकाचा व्यवहार अगोदरच ठरलेला बरा असतो नाटक नीट निवडून घ्यावें. तेथे भीडभाड नसावी, नाटककार नाटकाचें तंत्र नीट जाणतो की नाही हे अगोदर पाहावें, द्रव्यप्राप्तीबरोबरच कलेच्या दृष्टीनें नाटक नीटस आहे कीं नाहीं हें पाहणें अत्यंत जरूर आहे कारण ढिसाळ नाटकापासून एकादवेळ पैसा मिळाला तरी कलेच्या दृष्टीनें हानीच होतें. पात्राचा स्वभावपरिपोष सहाजिकपणें होत नसला व नटाना बडबडण्यापलीकडे काहीं काम नसले तर त्याला भलभलत्या खोडी लागतात व अभिनयदृष्ट्या नटाची नासाडी होते. ( कै. पोतनीसासारखा नट अशा प्रकारच्या नाटकामुळें अलीकडे फुकट गेला होता ) मी या गोष्टी स्वतःच्या अनुभावानें लिहीत आहें, वायफळ गोष्ट मी तुम्हाला कधीच सागणार नाहीं

नाटकें प्रचलित सामाजिक किंवा राजकीय विषयावरील असलीं तरी त्यात सर्वकालीन तत्वें असावीत, प्रचलीत विषयावरील नाटकें तो विषय अथवा प्रसंग दृष्टीआड झाला कीं विसरली जातात परंतु त्यात सर्वकाल पटणारीं सामान्य तत्वें असली तर तीं कायमची टिकण्यास अडचण पडणार नाही ऐतिहासिक व पौराणिक नाटकात स्थलकालविपर्यास नसावा त्याचप्रमाणें पात्राचे स्वभाव व प्रसंग प्रेक्षकाच्या समजुतींना धक्का देतील अशा प्रकारानें त्याचा परिपोष करूं नये. ऐतिहासिक व पौराणिक व्यक्तीबद्दल आदर कमी झाल्यास नाटककाराबरोबरच कंपनीलाहि नुकसान सोसावें लागतें त्यात तत्कालीन समाजस्थिति अवश्य दाखवावी पण हें सर्व मूळ कथासूत्राशीं विसंगत नसावें.

संगीत नाटकाचा प्रयोग चार तासापेक्षां जास्त होऊं नये व गद्य नाटकाचा प्रयोग तीन तासावर जाऊं नये अशा बेताचेंच नाटक घ्यावे किंवा तें मोठें असल्यास अगोदरच छाटाछाट करून तें बसवावें. संगीत गाणीं दहापेक्षा जास्त घालूं नयेत जास्त गाण्यानी नाटक वाढतें व खऱ्या नाट्यप्रसंगाची रसहानि होते तसेंच, नाटक एक प्रवेशाकी असावें की अनेक प्रवेशाकी असावें असल्या वादात पडूं नये सारींच कथानकें एक प्रवेशाकीं नाटकाना योग्य अशीं असतात असें नाहीं. खर्चाच्या मानानें अशीं नाटकें बरीं असतात, परंतु ज्यावेळी टॉकीमध्यें शेंकडो स्वाभाविक देखाव्यानीं प्रेक्षकाना नाविन्य आणि वैचित्र्य यानीं रंजविलें जातें त्यावेळीं केवळ तीन किंवा चारच देखाव्यानीं प्रेक्षकाच्या डोळयांचे समाधान होणें

फार कठीण आहे एक प्रवेशाकी नाटक लिहीण्यात मोठेसे कसब आहे असें नाही. प्रेक्षकाचे मनरंजन करण्याचा हा प्रश्न असल्यामुळे अशी नाटके प्रेक्षकाच्या मनाची पकड घेतील की नाही हे पाहाणे इष्ट आहे.

आपली संस्कृत नाटकें एक प्रवेशाकीच आहेत, त्याना अंकमर्यादा नसे, त्यामुळे ती एकाकीपासून दशाकीहि आहेत. यावरून नाट्यवस्तुप्रतिपादनाबरोबर वैचित्र्य व चटकदारपणा आणण्याचा त्याचा प्रयत्न असे हें उघड दिसते, त्या प्रमाणेच तत्कालीन प्रेक्षकाचा उच्च दर्जाहि सिद्ध होतो

दोनतासी नाटके—ज्याना नाटिका हें नाव चुकीने लावले जाते ती–अलीकडे लोकप्रिय होऊं लागली आहेत परतु अशा नाटकाची प्रथा सुरू करणारानी धंद्याच्या दृष्टीने जमाखर्चाचे प्रमाण न पाहाता एकदम कमी दर ठेवल्याने कंपन्या चालेनाशा झाल्या परंतु लोकरंजनाच्या दृष्टीने हा प्रयोग यशस्वी झाला आहे कंपन्यानी दोन तासी नाटके अवश्य करावी नाटककारानी टॉकीप्रमाणे ती सुटसुटीत लिहावी व वाड्मय आणि कलेच्या दृष्टीने ती उच्च प्रतीची असावी, कारण अशा नाटकाचा प्रेक्षकवर्ग सुशिक्षित व उच्च दर्जाचा असतो अशा नाटकात संगीत म्हणजे चारसुद्धा पदें नसावीत.

संस्कृत नाटकात भास कवीने तर एक तासात होणारी एकाकी पाच नाटकें लिहिली आहेत व ती सर्व ‘ किरातानी ’ मराठीत भाषातरित केली आहेत ती सर्व एक प्रवेशाकीच आहेत नाविन्य, वैचित्र्य व आकर्षकता त्यात किती भरली आहे हे नाटक वाचून सहज कळते. त्या नाटकाचे प्रयोग आजही रंगभूमीवर यशस्वी होतील निदान शाळा व कॉलेजसमेलनप्रसंगी ती अवश्य करावी

संगीत नाटकात ज्याचे गाणे ऐकण्यास प्रेक्षकवर्ग उत्सुक असतो अशा नटनटीनाच संगीत घालावे, सदभिरुचीला साजेल असेच ते असावे व ते विशेषत. भावनाप्रधान असावे गवईगाणे नाट्यकलेचा नाश करते पात्राच्या संवादात संगीत नसावे, एकादे पात्र गाणे गुणगुणत बसलें आहे किंवा दुसऱ्या पात्रानें गाणे म्हणण्यास सागितले आहे किवा भजनस्तवन अशा वेळीच गाणें असले तर गायक पात्राला गायालाहि पूर्ण अवसर सापडतो व गाण्यात रसोत्पत्ति होण्यास अडचण पडत नाही

नाटकातील पोशाख कालानुरुप असावेत ज्या कालचा इतिहास नाटकात येत असेल त्या काळचे वातावरण निर्माण करणे इष्ट असतें म्हणून सामाजिक, ऐतिहासिक

अथवा पौराणिक नाटके करतेवेळीं देशकाळाला अनुसरून पोशाख असणे जरूर असते

जी गोष्ट पोशाखाची तीच देखाव्याची, देशकाल समाजस्थितीला धरून ते तयार करावे, त्यात वास्तवता दिसावी, उगाच रंगाचा भडकपणा नसावा, प्रेक्षकाचे चित्त रमेल व ते नाट्यप्रसंगाशीं समरस होईल असेच देखावे असावे प्रसंगीं अद्‌भुत देखावे ( ट्रानस्फर सीन्स ) सुद्धा दाखवावे, त्यामुळे प्रेक्षकवर्ग आश्चर्यचकित होतो व आनदाने डुलूं लागतो

देखाव्यात वास्तवता दाखविण्यास प्रकाशाची अत्यंत मदत होते नाट्य प्रसंगाचा काल दिवसा, रात्री किंवा सकाळ, दुपार, संध्याकाळचा किंवा पहाटेचा आहे हे प्रकाशाच्या सहायाने हुबेहुब दाखविता येते, तसेच करुण, भयानक, रौद्र रसाच्या प्रसंगीं देखाव्यात पात्रावर योग्य प्रकाश टाकला असता रसोत्पत्तीला फार मदत होते सिनेमात प्रकाशाच्या परिवर्तनाचे जे उठाव साधले जातात ते सर्व नाटकप्रयोगात साधण्याकरिता विद्युत् प्रकाशाची साधनसामुग्री प्रत्येक कंपनीनें बाळगणे अवश्य आहे ही बाब खर्चाची असली तरी कलेच्या व उत्पन्नाच्या दृष्टीनें ती अत्यंत महत्वाची व फायदेशीर आहे नाटकवाल्यानी या साधनाचा अवश्य फायदा घ्यावा

महायुद्धाच्या वेळी महर्गतेमुळे सर्व वस्तूंच्या किमती चढल्या, थिएटरभाडी तर बेसुमार वाढली, नाटकाला लागणारे कापडचोपड व पडद्याचे रंग महाग झाले, नाटकाचे दरही वाढवावे लागले एक किर्लोस्कर कपनी सोडून दिल्यास यच्चयावत कंपन्याचे दर चार आण्यापासून दीड रुपयापर्यंत असत एकाद्या कंपनीचे जास्तीत जास्त दोन रुपयेहि दर असे तर मुंबई पुण्याबाहेर फिरणाऱ्या कंपनींचा सर्वात कमी दर दोन आणे देखील असे तो काळ गेला, सर्व वस्तुंच्या किमती उतरल्या, थिएटरभाडी कमी झालीं, प्रेक्षकवर्गाच्या प्राप्तीचे प्रमाणही कमी झाले तरी नाटकवाले आपले दर अद्याप कमी करीत नाहीत टॉकीने सारे प्रेक्षक खेचले तरी नाटकवाले दर कमी करीत नाहींत दर कमी करणे कमीपणाचें आहे अशी त्याचा ठाम समजूत आहे टाईम्स पत्राचा अंक पूर्वी चार आण्याला विकीत पण क्रॉनिकल पत्र निघाल्यावर त्याने दोन आणे दर ठेवला म्हणून टाईम्सही दोन आण्याला विकूं लागले. काल परवा डेली मेल पत्र निघाले, त्याने एक आणा ठेवल्यामुळें टाईम्स सुद्धा सर्व पत्रानी एक आणा दर केला टाईम्सला कमीपणाचें पिशाच्च बाधलें नाही. दर कमी केल्यास नाटकाचें उत्पन्न वाढेल हे सप्रमाण सिद्ध

करून देता येईल उदाहरणार्थ आपण पाच मित्र आहोंत, आपल्याजवळ फक्त एकएकच रुपया आहे आपणा सर्वांस नाटक पाहाणें आहे, आपल्या योग्यते-प्रमाणें नाटक पाहावयाचें म्हणजे दोनदोन रुपयाचीं तिकीटें घेणें भाग आहे व त्याला तर आपणाजवळ पैसे नाहीत म्हणून आपण कोणीच नाटकाला जात नाहीं व नाटकवाल्याचें पाच रुपयाचें नुकसान होतें

टॉकींचे दर चार आण्यापासून सवा रुपयापर्यंत असतात चागल्या योग्यतेच्या माणसालासुद्धा नऊ आण्याच्या जागेंत बसण्यात कमीपणा वाटत नाहीं पण त्याच माणसाला नाटकात दोन रुपयापेक्षा कमी प्रतीच्या जागेंत बसता येत नाहीं या मुळें बहुतेक लोक टॉकीच पाहूं लागले आहेत, नाटकवाल्यानीं दर कमी केल्या वाचून त्याचें उत्पन्न वाढणार नाहीं

नाटकें व नाटक कंपन्याचा विचार झाला, आता टॉकीकडे वळूं या, सध्या चढती कमान आहे प्रभात, सरस्वती, कोल्हापूर वगैरे मराठी टॉकी कंपन्यानीं कलेच्या दृष्टीनें बंगाल इतकी नसली तरी मुबईचा हिंदी टॉकीच्या कितीतरी वर नंबर मारला आहे परंतु त्याच्या फिल्ममध्यें पात्रें, देखावे, सजावट, फोटोग्राफी रेकॉर्डींग या सर्व बाबीत त्याना जितके यश मिळालें आहे त्या मानाने त्याचीं कथानकें अगदींच नीरस, कमी प्रतीची व कलाहीन असतात दिग्वीर, मेनका, छत्रपति, जगन्नाथ इत्यादि महाराष्टीय कंपन्या हिंदी चित्रपट काढीत असतात त्यांच्या कथासंबधानेंहि निराशाच वाटते.

नाटक किंवा टॉकींचें वाङ्मय कादंबरी व इतर वाङ्मय याहून निराळें व श्रेष्ठ दर्जाचें असतें अभिनय करता येण्यासारखेंच म्हणजे नटाचें नाट्य दिसावे असेंच तें असलें पाहिजे. ज्याचा नाट्याशीं संबंध नाहीं त्याला तें कळणार नाहीं व लिहिता तर मुळींच येणार नाही. नटाला कृतीनें दाखविण्याला अशक्य होईल किंवा नटाला उठाव येईल इतके सुटसुटीत भाषण म्हणजेच टॉकींचे वाङ्मय उपमा, अलंकार, शब्दावडंबर, पाल्हाळ, लाबलचक वर्णनें याचें त्या वाङ्मयाला वावडें आहे यामुळें निव्वळ नाटककाराला सुद्धा मोजक्या शब्दात टॉकीचा कार्यभाग साधण्यासारखें लिहिणें अवघड जाते साधी सरळ भाषा हेंच टॉकींचें खरें यशस्वी वाङ्मय

उत्तम कथेची निवड केल्यानंतर दिग्दर्शकानें कथालेखकाकडून सर्व कथा समजावून घेऊन त्याच्या संमतीनें ‘ वर्किंग सिनरिओ ’ तयार करावा. नंतर योग्य पात्राची निवड करून नाटकाप्रमाणें त्या टॉकीकथेच्या निदान एक महिना तरी तालमी घ्याव्यात तरच नटाकडून त्या त्या भूमिकेचे अभिनय योग्य होतील शूटींगपूर्वी

तालमी न घेतां आयत्या वेळीं तालमी घेण्यात जो वेळ फुकट जातो त्यामुळें टॉकी-वर खर्चाचा बोजा वाढतो कारण त्यावेळीं कॅमेरामन व रेकॉर्डिस्ट सारखीं माणसें रिकामी बसतात, व सारखें काम न झाल्यामुळें स्टुडिओचें भाडेंही अंगावर चढतें इतकेंच नाहीं तर पुन पुन शॉटचा ' रीटेक ' घेण्यानें शेंकडो रुपयाचा चुराडा होतो या करिता अगोदर तालमी घेतलेल्याच बऱ्या आयत्या वेळीं नटाला एक-दोन वेळा ' टायल ' दिली कीं नट चुकत नाहीं व दिवसात फील्मचें काम बरेंच आटपतें.

नाट्यकलेचा खरा शत्रु म्हणजे संगीत या संगीतानें नाटकाचा तर चुथडा उडविताच, पण टॉकीचाही चुथडा करीत तें चाललें आहे टॉकींतून याची कायमची हकालपट्टी होईल तो सुदिन ! पण संगीत घालणें भागच असलें तर चार गाणाच्यापेक्षा जास्त घालूं नये

टॉकीचें खरें प्रदर्शन फोटोग्राफी व रेकॉर्डींग यानींच असल्यामुळें या दोन गोष्टीचें महत्व टॉकीत अधिक आहे उत्तम कथा, लायक नटवर्ग, कसबी दिग्दर्शक कलायुक्त फोटोग्राफी, रेकॉर्डींग म्हणजे ध्वनिलेखन नीट न झाल्यामुळें फुकट जातात टॉकीचें यश अगदीं सामान्य वाटणाऱ्या गोष्टीपासून अत्यंत महत्वाच्या गोष्टीपर्यंत सर्वांवर अवलंबून आहे.

टॉकीच्या सृष्टींत डायरेक्टरलाहि वाकावयाला लावणारा व आपल्या शब्दावर नाचविणारा एक प्राणी आहे आणि तो म्हणजे भाडवलवाला. उत्तम टॉकी काढणें असल्यास भाडवलवाल्याचे तोंडसुद्धा स्टुडिओंत दिसता कामा नये, त्याचा पैसा उपयोगी आहे. पण त्याचें दर्शन तितकेंच नाशकारक आहे काहीं टॉकीचे हौशी भाडवलवाले असतात पण ते कलावंताना लाभत नाहींत. ते नेमके नालायक लोकाच्या हातीं जातात व पैसा व कीर्ति दोन्हीही त्याना न लाभल्याकारणाने सिनेमा सृष्टीला कायमचा रामराम ठोकतात भाडवलवाल्यानी खऱ्या कलावंत व लायक माणसाना सहाय केलें तर त्याच्या पैशाचें चीज होऊन त्याच्या मनाचें समाधानही होईल

तमाशा हेंच खरे म्हटलें तर नाट्यकलेचें पहिले मूल पण नाटकाचा जन्म होऊन त्याची मोठमोठ्या लोकात प्रतिष्ठा वाढलेली पाहिल्याबरोबर ते कर्णासारखें आवडेनासें होऊन कुंतीप्रमाणें तिने तें टाकून दिलें तें टाकलेलें पोर अडाणीच राहिलें यांत आश्चर्य नाहीं परंतु उपजत गुणाच्या जोरावर ते लोकरंजन करीत राहिलें. नाटक सिनेमाप्रमाणें त्याच्याही अंगीं आकर्षकशक्ति आहे पेशवाईंत

तमाशाना फार महत्व असे नाना फडणीस व सखाराम बापू तमाशे पहात असत निजामच्या दरबारात एका तमाशात नाना फडणीसाचे सोंग आगल्यामुळें खर्ड्याची लढाई झाली ' प्रभाकरकवि रामजोशी या तमासगीराचे तमाशाचे ताफे असत असा इतिहास आहे ते स्वत तमाशाचा तर्जुमा तयार करून स्वत रचलेल्या लावण्या त्यात ह्मणत ते तमाशे ह्मगजेच हल्लीच्या संगीत नाटकाचें खरे मूळ ' प्रभाकराच्या व रामजोशाच्या लावण्याना साहित्यात मान आहे कै गडकऱ्याच्या भाषेंत प्रतिभा गडकऱ्याची व शब्द प्रभाकराचे असा संगम मला दिसतो मराठी साहित्याच्या दृष्टया तमाशाच्या वाङ्मयाकडे साहित्यसेवकानी अवश्य लक्ष्य घालावे शेतकरी कामकरीलोक तुमच्या नाटकाना येत नाहीत तमाशाकडेच ते धाव घेतात सत्यशोधकानीं तमाशाच्या साह्यानेच ब्राह्मणेतरात जागृति केली ही गोष्ट आपल्या दृष्टीसमोर आहेच शेतकरी वर्गाला शिक्षण देऊन त्याच्यात जागृति करण्याला तमाशासारखे साधन नाही नाटके लयाला गेली पण खेड्यापाड्यात तमाशानीं आपलें स्थान सोडले नाही कारण शेतकऱ्याच्या करमणुकीचे ते स्वाभाविक साधन आहे. आह्मी पाढरपेशे ग्रंथकार तमाशा व लावणी हलकट समजतो यामुळें लावण्याच्या चालीवर पदें करून त्याना भावगीतें असे प्रतिष्ठित नाव आह्मी देतो तंतुवाद्यावर गायच्या गाण्याला ' वीणागीत ' असे नाव एका संस्कृत प्रोफेसराने सुचविलें आहे पण तुणतुण्यावर ह्मटल्या जाणाऱ्या गाण्याला ' लावणी ' हें शुद्ध मराठी नाव असताना हा संस्कृताचा द्राविडी प्राणायाम् का ' लावणी ह्मणजे हलकट हीच समजूत याच्या मूळाशी आहे, दुसरे काय ? कै तात्यासाहेब कोल्हटकरानीं ह्मटलेंच आहे ' कुनबाऊ बोलीत बोललं ह्मंजी वंगाळ लागतं पन् तेच संस्कृतात ह्मटलं ह्मंजी ह्मोटं वाटतं ' लावण्या अश्लील तमाशे अश्लील ह्मणून नाके मुरडण्यापेक्षा त्या सुधारण्याच्या उद्योगाला लागावें. शेतकरी कामकरी वर्गाच्या दृष्टीने जे अश्लील तें दूर करून तमाशे तयार करण्यात साहित्यसेवाच आहे या नाट्यकलेने टाकलेल्या पोराचा विचार बाजूला ठेऊन मीही नाटकसिनेमाकडे पुन वळतो

' नाटक व टॉकी ही भावंडें आहेत ही गोष्ट निर्विवाद सत्य आहे. दोघाचीही मदार नटानटीवर ! नटाला पद्धतीशीर शिक्षण मिळण्याची व्यवस्था होणें जरूर आहे. अलिकडे बरेच सुशिक्षित बेकार होऊन फिरत आहेत व टॉकीचा व नाटक कंपन्याचा आश्रय घेत आहेत अशावेळी युनिव्हर्सिटीच्या अभ्यासक्रमात जर नाट्यशिक्षणाला स्थान असतें तर मोठेच कार्य झालें असते हल्ली नाटक कंपनीत किंवा सिनेमांत मनुष्य जातो व हळुहळु लहान मोठी कामे करून अनुभवानें तो साधारण किंवा मोठी नट होतो. पण नाटक कंपनीत किंवा सिनेमात शास्त्रीय पद्धतीनें

शिक्षण देण्याची व्यवस्था नसल्यामुळे नटाला शास्त्रीय ज्ञान मुळीच मिळत नाही. आता कोणी म्हणतील की नुसते शास्त्रीय ज्ञान मिळून नटाला चागले काम थोडेंच करता येणार आहे ? कै गणपतराव जोशी, कै केशवराव भोसले, बालगंधर्व, पेंढारकर, केशवराव दाते, नाना फाटक वगैरे प्रसिद्ध नट नाट्यशास्त्र शिकावयाला कोठे गेले होते ? खरें आहे परंतु गणपतराव जोशी, दाते व फाटक याच्यावाचून बाकीचे नट गाण्याकरिता प्रसिद्ध आहेत व त्यानी कमी अधिक प्रमाणात गाण्याचें शिक्षण घेतल्यामुळेंच त्याच्या गाण्यात नीटनेटकेपणा व तानात सफाई आहे

बैठका, जोर, जोडी, मल्लखाब, कुस्ती वगैरे शास्त्रीय रीत्या मल्लविद्येचें शिक्षण घेतल्यावाचून कोणी ईसम पहिलवान होईल का ? व तो कुस्ती जिकील का ? जी गोष्ट मल्लाची व गवयाची तीच नटाची आहे नटाला नाट्यशास्त्र शिकणे अगदी अवश्य आहे, व ते शिक्षण देण्याकरिता लागणारी अधिक पुस्तकें तयार करून युनिव्हर्सिटीच्या शिक्षणक्रमात नाटककलेचा शिरकाव झाला पाहिजे

भारतमुनीचे नाट्यशास्त्र संस्कृतात आहे कै प्रो भानु यानीं त्याचें भाषातर करून ते रंगभूमी मासिकात प्रसिद्ध केलें पण हल्ली ते मिळत नाही. दुसऱ्या कोणत्याही अधिकारी विद्वानाला मराठीत त्यावर ग्रंथ लिहिण्याची बुद्धि झाली नाहीं मात्र एका विद्यार्थिनीने कु गोदावरी केतकर यानी भारतवर्षीय महिला विद्यापिठाच्या ' प्रदेयागमा ' परिक्षेसाठी ' भारतीय नाट्यशास्त्र ' या नावाचा एक प्रबंध लिहून तो प्रसिद्ध केला हे काय ते मराठीत एकुलते एक पुस्तक नाट्यशास्त्रावर आहे कु. गोदावरीबाईने हे पुस्तक लिहून महाराष्ट्रावर खरोखर मोठे उपकार केले आहेत नटाच्या अभ्यासाला जरूर अशी शास्त्रीय माहिती या पुस्तकात आहे स्त्रियानीं रंगभूमीवर काम करावे की करूं नये ह्मणून वाद चालले असता एक कुमारी नाट्यशास्त्रावर पुस्तक लिहून रंगभूमीची भरीव सेवा करते ही गोष्ट लक्ष्यात ठेवण्यासारखी आहे. कु गोदावरीबाईचा रंगभूमीशी प्रत्यक्ष संबंध न आल्याकारणानें त्याच्या लेखनात अल्प स्वल्प चुक्या होणे सहाजिक आहे, पण पुस्तकाच्या महत्वाच्या व गुणाच्या मानाने त्या क्षम्य आहेत, उद्या युनिव्हर्सिटीनें आपल्या शिक्षण क्रमात मॅट्रिकपासून बी ए.पर्यंत नाट्यकला हा विषय ठेवला तर हें पुस्तक उपयुक्त आहे

उत्पन्नाच्या दृष्टीने टॉकीत काम करणाऱ्या नटाना मोठमोठे सरकारी नोकर, व्यापारी नोकर, व वकील डॉक्टर यांच्या बरोबरीने प्राप्ती होत आहे, व त्यामुळेच शेंकडो तरुणाचे लक्ष्य टॉकीकडे गेले व नटाचा धंदा करणाराने पोट टॉकीवर

चागलें चालतें असें नजरेस आलें अशावेळीं युनिव्हर्सिटीनें जर नाट्यकलेचें शिक्षण देण्याची व्यवस्था केली तर हजारो लोक त्याचा फायदा घेतल्यावाचून राहणार नाहींत. नाट्यकलेच्या अभिमान्यानी युनिव्हर्सिटींत खटपट करून ही गोष्ट धसास लावावी

भारतवर्षीय महिला विद्यापीठानेही आपल्या शिक्षणक्रमात नाट्यकलेला स्थान द्यावें त्यामुळें पुष्कळ मुलींना नाट्याचे शास्त्रीय शिक्षण मिळेल व रंगभूमीवर व टॉकींत काम करून कीर्ति व द्रव्य मिळवण्याचा त्याचा मार्ग मोकळा होईल. नाटकात व सिनेमात स्त्रियाची कामे स्त्रियांनीच करावी हे आता लोकाना पटूं लागलें आहे उत्पन्नाचा एवढा चांगला प्रामाणिक धंदा स्त्रियानी पत्करण्यास काय हरकत आहे ? स्त्रियाची नीतिमत्ता बिघडेल, आमची सासारिक संस्कृति र्‍हास पावेल, असल्या फाजील सोवळया खुळया समजुतीना मुळीच थारा देऊं नये, चालकानी या गोष्टींचा अवश्य विचार करावा.

रंगभूमी व टॉकी यानी आपमातली भाऊबंदकी बंद करून एकजुटीनें आपल्या शत्रूंना—नाट्यकलेच्या वैऱ्याना ताळयावर आणण्याच्या उद्योगाला लागावे कारण नाट्यकलेचे शत्रू तिचे धिडवडे करीत आहेत.

नाट्यकलेचे शत्रू ? नाट्यकलेचे वैरी ? कोण ?—हल्लींचे काहीं वर्तमानपत्री टीकाकार ! बेजबाबदार संपादक ! त्यानी छू म्हणताच धावणारे त्याचे बगलबच्चे ?

एकाकाळी ज्ञानप्रकाश, इंदुप्रकाश, मुंबईवैभव, राष्ट्रमत वगैरे भारदस्त वर्तमानपत्रात व मनोरंजन, रंगभूमीसारख्या मासिकात नाटकाच्या पुस्तकावर व प्रयोगावर विस्तृत टीकापरिक्षणे येत असत. ती कधी अनुकूल तर कधीं प्रतिकूलही असत पण ती परिक्षणे व टीका निरपेक्ष बुद्धीनें केलेली असत नाटककार व नाटकवाला याच्यावर व्यक्तिविषयक टीका त्यांत नसत नाट्यकला सुधरावी हा एकच एक हेतु त्यांत दिसत असे तीं परिक्षणे कधी कधीं खरमरीत असलीं तरी त्यात सूडबुद्धि नसे समाजाची आस्था, सदभिरुचि, व रंगभूमीची सुधारणा हीच त्या टीकांच्या मूळाशीं असत श्री. गद्रे याच्या मौज पत्रातही सहानुभूतिपूर्वकच टीका येत असत. मौजेच्या यशाला तें पोषकच झालें अद्यापही नवाकाळ, ज्ञानप्रकाश, नवशक्ति वगैरे काहीं पत्रात समतोल टीकानाच स्थल दिलें जातें, ही गोष्ट लक्ष्यात ठेवण्यासारखी आहे.

संदेशमित्र कोण शत्रू कोण हें पाहूं लागला व नाटकावर किंवा प्रयोगावर टीका करताना व्यक्तिविषयक टीका होण्याला सुरुवात झाली. पण नाटककार किंवा

नाटकवाले यांचें नुकसान होणार नाही इतकी खबरदारी त्यात जरूर घेतली जाईल कै गडकऱ्याच्या नाटकाचें खरें महत्व कै अच्युतरावानींच गडकरीवाङ्मयावर अंकामागून अंक काढून लोकाना पटवून दिलें व नाट्यकलेची फारच मोठी सेवा केली

पुढे पुढें मात्र कित्येक संपादकाच्या डोक्याचे स्क्रू ढिले पडले त्याच्यात टारगट वृत्तीच्या लेखकाचा भरणा होत चालला, व वारेमाफ टीका येऊं लागल्या एखाद्या नव्या नटाने संपादकाला चहाकॉफी दिली कीं तो ' रंगभूमीच्या क्षितिजा-वरील उदयोन्मुख तारा ' ठरू लागला काल काम करूं लागलेल्या प्रसिद्ध नट नटींच्या मुलाखती येऊं लागल्या त्याच्या अभिनयनैपुण्याची कॉलमच्या कॉलम स्तुति येऊं लागली रंगभूमीची दहापाच वर्षे सेवा केलेल्या नटापेक्षा कालचे नव-शिकेच प्रसिद्ध नट ह्मणून मिरवूं लागले नाटकवाल्यानें एक लहानशी जाहिरात देऊन संपादकाला आमंत्रण दिले की त्या कंपनींतील हुजऱ्या देखील मोठा नट ठरूं लागला.

सिनेमा टॉकी बद्दल तर विचारूंच नका टॉकीच्या मोठमोठ्या जाहिराती मिळूं लागल्यापासून नाटकाप्रमाणेच सिनेमाही त्याना फुकट पहायला मिळूं लागला आहे सिनेमानटाची अवास्तव स्तुती होऊं लागली आहे जाहिरातीच्या जादूच्या काडीवर वर्तमानपत्री भुते नाचूं लागलीं आहेत

हल्लीं वर्तमानपत्राचे निरनिराळे कंपू झाले आहेत व ते आपसात भाडूं लागले आहेत. एकानें एका नाटकाबद्दल अनुकूल लिहिले की दुसऱ्याने प्रतिकूल लिहिलेच कालचा शत्रु संपादक आज टॉकीप्रोड्युसर होऊन त्यानें एक जाहिरातीचा तुकडा अंगावर फेकला कीं त्याच्या चित्रपटावर स्तुतीचा वर्षाव ! कारण काय ? तर एक जाहिरातीचा तुकडा ? सर्रास टॉकीच्या जाहिराती मिळूं लागल्यामुळे त्याच्यावर त्याच्या नटनटीवर नसत्या गुणाचा वर्षाव होऊं लागला आहे. साऱ्याच टॉकी अपूर्व ! एक देखील वाईट नाही ! कारण जाहिरातीची लाच !

प्रेक्षकाची व्यर्थ दिशाभूल होत आहे वर्तमानपत्रावर विश्वासून काहीं तरी अजब पहयला मिळणार म्हणून पैसे खर्चून जावे तर सिनेमातून शिव्या देत बाहेर पडण्याची पाळी येते. स्वर्ग दिसेल म्हणून धडपड करावी तर तेथे नरकच ! हीं का वर्तमानपत्रे का लोकाचे खिसे कातरणारी सोनेरी टोळी आता मात्र लोकांचा वर्तमानपत्रावरचा विश्वास उडत चालला आहे हें संपादकानी नीट ध्यानात ठेवावें

हें नवें नाटक उद्या निघणार आहें—नाटक रंगभूमीवर येण्याअगोदरच त्यावर

हल्ला ! ही वर्तमानपत्री भूतें नाटकाच्या पुस्तकावर किंवा प्रयोगावर टीका करीत नाहीत. नाटककाराच्या फाटक्या जोड्यावर, तिरव्या डोळ्यावर, घरच्या जेवणावर टीका करतात ' कंपनीच्या मालकाच्या गाडीघोड्यावर, त्याच्या कंपनींतील खासगी गोष्टीवर तुटून पडतात त्याच्या नव्या खेळाला जाऊं नये, गेल्यास तुमचे पैसे फुकट जातील, तुमची निराशा होईल, अशी उघडपणे लेखामागून लेख लिहून त्याची बदनामी करतात, आणि त्याच्या धंद्यावर गदा आणतात ! हेतु हाच की नाटककार व मालक यानी आपल्याला एक जाहिरातीचा तुकडा टाकावा

यामुळे होतकरू नटाची नासाडी होते ! कलायुक्त नाटकाकडे दुर्लक्ष्य होतें ! थचाळ नाटकाची निपज वाढते ! कंपनीची दुर्दशा होते ! या संपादकानी फुकट पासाची का अपेक्षा करावी ? टॉकी, नाटकावर निस्पृह टीका करण्यासाठी पैसे खर्चून जाणे त्याचे कर्तव्य नाही काय ?

वर्तमानपत्रानी आपली पायरी सोडली, ती पैसापासरी झाली वर्तमानपत्रात गटारगंगा वाहूं लागली ! शिमगा वाङ्मयाला, नटाच्या व नाट्यकलेच्या अवनतीला कारण हल्लीची वर्तमानपत्रे !

नाट्यकलेचा दुसरा शत्रु म्हणजे सरकारी सेन्सार ! या सेन्सारच्या भीतीने धडधडत असतानाच नाट्यकर्त्याला नाटक किंवा टॉकी लिहावी लागते सेन्सार हे गाळील काय, ते कापील काय, नाटक किंवा चित्रपटच बंद करील काय, ही भीती लेखकडायरेक्टरापासून भाटवलवाल्या मालकापर्यंत सर्वांच्याच पुढे उभी असते सिनेमाकरता एक सेन्सार बोर्ड आहे त्याने परवानगी दिल्यावर साऱ्या हिंदुस्थानात कोठेही तो चित्रपट चालतो पण नाटकाला प्रत्येक गावी पुन नवीन परवानगी काढावी लागते या गावी हे गाळा, त्या गावी ते गाळा असे करता करता सारें नाटकच गाळण्याची पाळी येते अधिकारी सागतील तसा फरक केला तरच नाटकाला परवानगी मिळते

यावरून काय सिद्ध होते ?—जनतेच्या राष्ट्रीय वृत्तींना पोषक असें नाट्य सरकारला नको आहे आणि म्हणूनच तें निर्माण करण्याला आणि निर्माण झालेंच तर ते मुळातच चिरडून टाकण्यासाठी सेन्सारशिपची गदा घेऊन सरकार उभे असतें नाटकसिनेमा ही लोकशिक्षणाची अत्यंत प्रभावी साधने आहेत, या साधनानीं देश आपली उन्नति करून घेईल, लोकात राष्ट्राभिमान जागृत करील, सरकारच्या दडपशाहीला तोंड देईल, राजकारणात क्रांति करून आपल्याला चंबूगवाळे आटपून जायला लावील, अशी सरकारला धास्ती वाटते काय ? नाटक सिनेमा ही

जनतेची शस्त्रे बोथट केली तरच आपला निभाव अशी सरकारची समजूत आहे काय ? पण हें खरेंच आहे सोव्हिएट राजक्रांतीच्या वेळीं बोल्शेव्हिक मताचा प्रसार विशेषत रंगभूमीच्या द्वारें झाला नाटक सिनेमाचा असा प्रभाव दिसल्या-मुळेच रशियानें आपल्या पंचवार्षिक कार्यक्रमात त्याच्या वाढीला प्रमुख स्थान दिलें पूर्वीच्या अठरा हजार सिनेमाच्या जागीं चार वर्षां पूर्वींच अडसष्ट हजार टॉकीगृहे रशियात वाढलीं आहेत या नाट्यकलेच्या सामर्थ्यामुळेच भलत्याच मतांचा प्रसार रशियात होऊं नये म्हणून नाट्यकला खात्यावर स्वतः सोव्हिएट अध्यक्षाची बारकाईने नजर असते इटलीमध्यें फॅसिझमचा प्रसार मुसलोनीनें नाटक सिनेमाच्या जोरावर केलाच फॅसिझमच्या बाधक मताचा इटलीत प्रसार होऊं नये म्हणून स्वत मुसलोनीनें नाटकसिनेमाचें खाते आपल्या हातात ठेवलं आहे नाट्यकलेचे सामर्थ्य इतकें जबरदस्त असल्यामुळेच आमच्या सरकारानीं ही सेन्सारशिप इतक्या कडक स्वरूपात ठेवली आहे ती उठवल्यावाचून नाट्यवाङ्म-याला स्वातंत्र्य मिळणार नाही व खरें तेजस्वी वाङ्मय निर्माण होणार नाहीं या सेन्सारच्या समशेरीमुळेच आमच्या नाट्यवाङ्मयाची वाढ खुंटली आहे व नाट्य-कलेची लेंकरे नेभळी, अशक्त, कुबडी, खुजी निघूं लागली आहेत हा प्रश्न महा-राष्ट्र साहित्य समेलनानें हातीं घेतला पाहिजे व हें सेन्सारचे भूत गाडून टाकलें पाहिजे राजकारणाचा वाङ्मयाशीं असा संबंध असल्याकारणाने राजकारण व वाङ्मय याची फारकत कशी होणार ?

नाट्यकलेला कैदखान्यात टाकून तिच्यावर सेन्सॉर हा जेलर ठेऊनच सरकार स्वस्थ नाही, तर काहीं विविक्षित नाटकाचा परिणाम जनतेवर काय होत आहे हे सरकारचे सी आय. डी. खाते पहात असतें एखादे तेजस्वी नाटक लोकात खळबळ उडवते असें दिसताच सी आय डीचे डोळे फाटतात व तें नाटक सरकार जमा होते त्याच्या प्रयोगाला तर बंदी होतेंच पण नाटकाची पुस्तकेंही जप्त करून ती जाळून टाकली जातात व नाटककाराला आपल्या पोटच्या पोराच्या प्रेताचा दहनविधि दाखविला जातो. नाट्यवाङ्मयाच्या वाढीला हा केवढा अडथळा ! जन-तेला वाङ्मय म्हणून तें वाचायलाही मिळूं नये, साहित्य सेवकाना पाहयलाही तें सांपडूं नये ही मराठी साहित्याची हानी नाही का ? ही हानी थाबविण्यासाठी महाराष्ट्र साहित्य संमेलना जवळ एकच उपाय आहे, तो सरकारजमा नाटकें कर-ण्याबद्दल सरकारचा निषेध करणें हाच !

नाट्यकलेचा तिसरा रिपु म्हणजे एन्टरटेनमेंट टॅक्स ! हा करमणुकीवर कर बसविण्याला कारण नामदार परांजपे ! रॅंग्लर साहेबाना शिक्षणाबद्दल खरोखरच

कळकळ ! ते मिनिस्टर झाल्यावर प्राथमिक शिक्षण सक्तीचे व मोफत करण्यासाठी हा कर बसविला सरकाराला पैसे हवे असतात, कशासाठी हा तेथें प्रश्न नसतो. प्राथमिक शिक्षणासाठीं बसविलेल्या कराचे पैसे निराळयाच कामासाठीं खर्च होऊं लागले तेव्हा पराजप्याचे डोळे उघडले. आजपर्यंतचे सारे कर अशाच लोक-कल्याणाचा निमित्तानें बसविले पण ते दुसऱ्याच सत्कार्याच्या कारणी लागले ! प्रथम मोठमोठ्या शहरी तेवढा हा कर होता परंतु आज पक्के थिएटर असलेल्या प्रत्येक गावीं त्याची अम्मल बजावणी होऊं लागली आहे आज सहा आण्याच्या तिकिटा पर्यंत कर आहे, उद्या चार आणे, दोन आण्याच्या तिकिटावर देखील बसेल. या करमणूकीच्या करामुळें नाटक सिनेमाच्या उत्पन्नात खोट आली, महाराष्ट्र साहित्य संमेलनाने हा कर उठविण्याचा प्रयत्न करावा व ना पराजपे यानीं त्या प्रयत्नाला मदत करून पायश्चित घ्यावे

माझें भाषण संपलें मी मागितलेल्या गोष्टीचा आपण विचार करावा

श्री.

# मराठी साहित्य संमेलन

## अधिवेशन १९ वें, बडोदें.

---

सन १९३४.

---

काव्य विभाग.

अध्यक्ष :

## प्रो. माधव त्र्यंबक पटवर्धन

## यांचें भाषण.

---

काव्यप्रेमी मित्र हो,

या महाराष्ट्र साहित्य सम्मेलनांतील काव्यविभागाचे अध्यक्षपद देऊन, आपण जो माझा सन्मान केला आहे त्याकरिता मी आपला फार ऋणी आहें हा सन्मान कोठेहि झाला असता तरी त्यापासून आनन्दच झाला असता, परन्तु हा सन्मान येथे अनुभविण्यात मला विशेष आनन्द वाटतो गेली अठरा वर्षे चरितार्थासाठीं जरी निरनिराळ्या ठिकाणीं मी वसणूक केली असली तरी माझा जन्म, माझें शिक्षण आणि संस्करण हीं येथेच झाली आहेत तेव्हा व्यक्तिश मी मूळचा बडोदेकर आहें हे आपल्यापैकी पुष्कळ जणाना विदित नसेल, हें तसें विदित असतें तर हें पद आपण अेखाद्या निर्भेळ परस्थाला दिले असतें आणि तसें अुचितहि झालें असतें पण मग, घरच्यानी स्वयंस्फूर्तीने आपले काड कौतुक केलेले पाहण्याचा हा दुर्मिळ योग मला लाभला आहे त्याला मी मुकलों असतो असो, झालें तें माझ्या दृष्टीने हितावेंच झालें तथापि आज आपल्या पुढे अुभे राहून हें भाषण करिताना मला खरोखरीच फार सङ्कोच वाटतो कारण, माझ्यापेक्षा वयानेच केवळ नव्हे तर वृत्तीच्या सहृदयतेने आणि कृतीच्या सरसतेनेहि श्रेष्ठ असे जे अेक कविराज आपल्या या राजधानींत राजकवि आहेत त्याचा मला विसर पडूं शकत नाही आणि या अुच्चपदावर चढल्यावरहि डोळे फिरून जाअूं शकत नाहीत

काव्यप्रेमी जन हो, या स्थानावरून भाषण करायला जरी मला सङ्कोच वाटत असला तरी जे अंत:करणाला पटते तच निर्भीडपणाने बोलण्याचें माझें कर्तव्य मी करणार आहे मी स्वत पद्यरचना केली आहे आणि तिच्याच भाग्याने मी आज येथे आपल्यापुढे अुभा आहे आधुनिक कवितेविषयी मी जें काही म्हणेन तें माझ्याच पद्यरचनेला लागूं पडण्याचा पूर्ण सम्भव आहे हे मी जाणतो तेव्हां माझ्याच विचारसरणीचा अवलम्ब करून अुद्या कोणी जर प्रामाणिकपणाने माझ्या कवितेची सम्भावना केली तर मला त्याचा राग येअूं नये आणि तो येणारहि नाही. वैयक्तिक स्वार्थाला केव्हाहि तत्त्वचर्चेच्या क्षेत्राबाहेरच ठेविलें पाहिजे.

मराठी कवितेची स्थिति अेकन्दरीने पाहता असमाधानकारक सुतराम् नाही कादम्बरीच्या क्षेत्रात जशी अेकदम पिछेहाट झालेली दिसते तशी काव्याच्या क्षेत्रात अगदी दिसत नाही हळुहळू का होअीना पण अुत्तरोत्तर स्पृहणीय अशी प्रगतिच होत आलेली आहे या क्षणी मात्र लघुकथेला पूर आल्यामुळें काव्याचा प्रवाह अरुन्द आणि मन्दावल्यासारखा दिसतो संस्कृत सारस्वताचा आस्वाद घेतल्यावर तशा प्रकारची प्रौढ, भव्य आणि सालङ्कृत रचना मराठींत व्हायला हवी अशी सदिच्छा अिङ्ग्रजी राजवटीच्या प्रथमावस्थेत शास्त्रिकवींना होअून त्यानी भाषान्तरित वा स्वतन्त्र रचना केली परन्तु अिङ्ग्रजी राजवटीत अिङ्ग्रजी वाङ्मयाचा परिचय स्वाभाविकपणेच अधिक प्रभावी ठरला ख्रिस्तशकाच्या विसाव्या शतकाच्या पहिल्या पादातील काही कवीशी झालेल्या त्रोटक परिचयामुळें हुरळून जाअून तशाच धर्तीची परन्तु मराठींत अभिनव, अशी त्रुटित भावगीते, व्यक्तीच्या आणि सृष्टीच्या संसारातील सामान्य गोष्टींवर लिहिण्याचा सम्प्रदाय स्थापन झाला आणि केशवसुताच्या कामगिरीमुळें या सम्प्रदायाला केशवसुताचे नाव मिळालें आपल्या भावना भावगीतात अधिक निर्भीडपणाने, अधिक अुघडपणानें आणि अधिक खरेपणाने माण्डणारे कवि १९२० च्या सुमारास पुढें येअूं लागले याच्या पैकी ताम्बे आणि यशवन्त यानी अपूर्व यश मिळविलें आणि ते यश अद्यापि अम्लान आहे. गिरीश यानी ' अभागी कमल ' प्रसिद्ध करून वाचनीय दीर्घ काव्याला पुन्हा चालना दिली रविकिरण मण्डळातील कवींच्या भावगीताचे विलक्षण यश डोळ्यावर आल्यामुळेच केशवकुमाराना काव्य प्रान्तातील आपले क्षेत्र मापडलें आणि त्यानी ' झेण्डूची फुले ' फुलविली दत्त, ताम्बे, मायदेव अित्यादिकानी शिशुगीताच्या क्षेत्रात स्पृहणीय कामगिरी करून कवितेची रज्जकता मुलापर्यन्त पोचविली निशिगन्ध कवींनी आपल्या प्रेमोद्गारात स्वभावोक्तीची नवलाअी दाखविली आहे भाषान्तराचे महत्त्व थोडे नाही, परन्तु भाषान्तरापासून कार्याच्या बिकटपणाच्या मानाने लाभ होत नाही भाषान्तराकडे कवींचे लक्ष्य फारसें जात नाही अलीकडील भाषान्तरात श्रीखण्डेकृत सुश्लोक गोविन्द हें गीतगोविन्दाचे भाषान्तर सरस, वाचनीय आहे आत्मप्रकटीकरणात अनन्त काणेकर यानी हृदयङ्गम वैशिष्ट्य व्यक्त केल्यामुळें रसिकानी त्याच्या ' चान्दराती ' त संस्मरणीय कोजागरी साजरी केली आजही काही होतकरू कवि ललित लुलित प्रेमकूजन करून आपल्या भवितव्याविषयी मोठी आशा अुत्पन्न करीत आहेत. होतकरू हें विशेषण कदाचित् त्यांच्या स्वाभिमानाला बोचेल ह्या भीतीने त्यांची नावें आता घेत नाही तथापि सुसंस्कृत ' विरहिविलापा ' पासून अशिक्षित ' कोळ्याच्या गाण्या ' पर्यन्त

मराठी कवितेचें पाअुल पुढेच पडत आलेले आहे अुत्कृष्ट आधुनिक भावगीताचा सङ्ग्रह छापून प्रकाशित केल्यास तो दोनशे-अडीचशें पृष्ठाचा ग्रन्थ होईल अशी आशा आहे

छन्दाच्या विविधतेंत तर आश्चर्यकारक वाढ झाली आहे. वृत्ताच्यावरील आपले प्रभुत्व न गमाविता कवींनी विविध जातींत, जुन्या नव्या चालींवर म्हणावयीचा अशी विपुल रचना केली आहे अक्षरसङ्ख्याक छन्दाचाहि योग्य पुरस्कार यवतमाळचे कवि वामन नारायण देशपाण्डे हे करीत आहेत मुक्तछन्दासाठीहि श्री व्यङ्कटेश शङ्कर वकील, आत्माराम रावजी देशपाण्डे, भवानी शङ्कर पण्डित अित्यादि कवि निरनिराळे प्रयोग करून पहात आहेत कवि टेकाडे, मायदेव, यशवन्त, गिरीश, सोपानदेव चौधरी, कु सञ्जीवनी मराठे अित्यादिकाच्या काव्य-गायनाला अलोट जनसमूह-स्त्रीपुरुषाचा मिश्रसमाज लोटताना दिसत आहे सारेच रसिक आता फुकटखाअू राहिले नाहीत तीस वर्षांपूर्वी प्रसिद्ध झालेल्या अेका कविद्वयाच्या काव्यसङ्ग्रहाच्या अवघ्या तीन प्रति तेव्हा खपल्या म्हणजे विकत गेल्या असें अैकतो आणि अुर्वरित प्रति मग खपवाव्या लागल्या ती स्थिती आता पार पालटली आहे केशवसुत, विनायक, गोविन्दाग्रज, मायदेव, यशवन्त, गिरीश आणि केशवकुमार याच्या कृतींना पुनरावृत्तीचे भाग्य लाभले आहे, आणि जळगावचे कवि तिवारी, याच्या सङ्ग्राम गीताची तर सातवी आवृत्ति चालू असून आतापर्यन्त सात सहस्रावर प्रति खपल्या आहेत कविताना मूल्य मिळणार नाहीं असे छातीठोकपणे बजावणाऱ्या मासिकाच्या प्रकाशकाला आता, क्रमिक शालेय पुस्तकें करिताना का होअीना पण आधुनिक कवींना पैका वेचावा लागत आहे. अेकीकडे अज्ञात राहून भीत भीत पण अुत्कट अुत्साहाने व भाषाभिमानाने आपल्या आणि आपल्या सारख्या चार स्नेह्याच्या रञ्जनासाठी कविता रचीत रहाण्याचा काळ सम्पून कवींचा सञ्चार यशस्वी होअूं लागला आहे. राजसभातूनहि कवीची सम्भावना होअूं लागली आहे. काही महिन्यापूर्वी औन्धास, थोरल्या महाराजाच्या अुत्सवांत राजपौत्री कुमारी अक्कारजे पन्त याना आपल्या सुश्राव्य कविता आरावरङ्क श्रोत्यापुढे ह्मणून दाखविताना पाहून मराठी कवितेचा विजयकाल आला असेच माझ्याप्रमाणे तेथे बसलेल्या प्रत्येक कवितेच्या कैवाऱ्याला वाटलें असेल

हें सारें खरें; तथापि अेकन्दरीने पाहता मराठी कविता ही अेका मोठ्या दोषाने ग्रस्त आहे आणि त्यामुळेच तिचा प्रभाव अत्यन्त मर्यादित राहिलेला आहे हेहि काही खोटें नाही. ज्याच्या मनावर अिङ्ग्रजी वाङ्मयाचा थोडासा संस्कार झाला आहे आणि जे संसाराच्या झळीपासून दूर अशा कौमारकालातील काव्यात्म शीतळ

वातावरणात गुङ्गत आहेत अशा अल्पसङ्ख्य लोकानाच आधुनिक कवितेची थोडी-वटक लागलेली दिसते. या बहुरङ्गी जीविताचे जे प्रत्यक्ष कडूगोड अनुभव घेत आहेत अशाना आधुनिक कविता अद्यापि जिव्हाळयाची वाटत नाही ज्याचा अिङ्ग्रजीशी काही परिचय नाही अशाना आधुनिक कवितेत काही गम्य वाटत नाहीं आणि ज्याचा अिङ्ग्रजी वाङ्मयाशी दाट परिचय आहे अशाना तीत काहीच नवीन व रम्य वाटत नाही

याचें कारण काय ? परपुष्टता, अनुकरणशीलता हा प्राचीन मराठी कवितेचा मोठा दोष ह्मणून दाखविण्यात येतो, परन्तु आधुनिक कविता हीहि या या दोषा-पासून अलिप्त दिसत नाही. शास्त्रिकवींनी संस्कृत आदर्शभूत काव्याच्या धर्तीवर मराठी काव्यें रचण्याचा प्रयत्न केला तर केशवसुतादि कवींनी काही अिङ्ग्रजी कवींच्या थोड्या कवितांच्या धर्तीवर मराठीत रचना करण्याचा अुद्योग केला ही दोन्ही प्रकारची रचना जेथे ती भाषान्तरित नाही तेथे ती भाषान्तरित नाही अेवढ्या अेकच कारणासाठी स्वतन्त्र मानावयाची असते परन्तु वस्तुतः तिच्यात पृथगात्मता नाही तिच्यात ध्वनि नाही, प्रतिध्वनि मात्र आहेत खेड्यातील जीवन नागर जीव-नापेक्षा अधिक निरामय व सुखकर आहे सृष्टीशी तादात्म्य पावल्याने सृष्टि गूढ तत्त्वें शिकविते, बालपणात व्यक्ति स्वर्गाच्या जवळ असल्याने तिच्या निष्पाप दृष्टीला स्वर्गातील दृश्यें दिसत असतात, रूढिभन्जनाविना तरणोपाय नाहीं, स्त्रियांना पारतन्त्र्यात ठेवून राष्ट्र स्वतन्त्र व पराक्रमशील होअूं शकत नाही, जगभर समता, बन्धुता आणि शान्तता या त्रयींचे साम्राज्य स्थापिलें पाहिजे अित्यादि कल्पना अिङ्ग्रजी वाङ्मयातून, कित्येकतर जवळ जवळ शम्भर वर्षांच्या शिळ्या आणि टाकाअू झाल्यानन्तर, महाराष्ट्रीय कवींनी अूनअून ह्मणून मोठ्या अुत्साहाने अुच-लल्या आणि नव्या जोमाने मराठीत माण्डल्या. या कल्पना अिङ्ग्रजी वाङ्मयावरून सुचल्या त्या कवींच्या वैयक्तिक व राष्ट्रीय संसारातून स्फुरल्या नाहीत त्या कित-पत साधार आहेत, मराठी जीवनाशी कितपत सुसम्बद्ध आहेत याचा विचारच झाला नाही आमचे कवि या कल्पनांना भाळले आणि त्यानी त्याचा अनुवाद केला ही हुरळणूक ज्या मानाने हार्दिक होती त्यामानाने कृति हृदयङ्गम वठली, परन्तु ज्या मानाने ती बहुजन समाजाच्या प्रत्यक्ष जीवनाशी अलग व विसङ्गत राहिली त्या मानाने तिचा प्रभाव मर्यादित राहिला. केशवसुतांची हुरळणूक हार्दिक आहे. ते मूळ अिङ्ग्रजी कवितेवर भाळले खरे पण त्यांनी भोवतालच्या सृष्टीचे थोडें तरी ममत्वाने निरीक्षण केले होते हें ' नैर्ऋत्य दिशेकडील वारा ' आणि ' वातचक्र '

अित्यादि कवितावरून स्पष्ट दिसते, पण अितरानी केशवसुतांचाच अनुवाद करायला आरम्भ केला पाश्चात्य कल्पनाचा हा प्रवाह आमच्या राष्ट्रीय जीवनात भिनून नवीन जिवन सृष्टि निर्माण होण्याच्या पूर्वीच बाष्पीभूत झाला, आणि अनुकरणाची अनुकरणे होअू लागली. दुथडी समृद्धि पिकविणाऱ्या जिवन्त काव्यगङ्गेच्या ओघाच्या ठिकाणी मृगजळाचे विलास मात्र दिसू लागले.

पुस्तकातून स्फूर्ति घेअून अनुकरणाचे अनुकरण करण्याची ही सवय फार खोल रुजलेली आणि फार दूरवर पसरलेली आहे. अेका कवीने यशस्वी रीतीने 'तुतारी' फुङ्कल्याक्षणी दुसऱ्याला ' शिङ्ग ' वाजवावेसे वाटले तिसऱ्याने ' चौघडा ' बडविला तर चौथ्याने ' कम्बुनाद ' केला ! ' झपूर्झा 'च्या ' व्यर्था अधिकचि अर्थ असे ' असे दिसताच कोणी ' फुगडी ' खेळूं लागला, कोणी ' पिङ्गा ' घालूं लागला तर कोणाला ' झिम्मा ' आठवला केशवसुताच्या ' घुबडास ' या कवितेनन्तर गोविन्दाग्रजाला त्याच विषयाने आकृष्ट केले, आणि लौकरच जिकडे तिकडे श्मशानगीते हुङ्कार करूं लागली. काव्यनिर्मितिक्रियेच्या गूढ विवेचनातून गूढ गुञ्जनाची म्हणजे अर्थशून्य नादमधुर गुञ्जनाची कविता निर्माण झाली. आणि तिच्यातूनच, रविन्द्रनाथ ठाकूराच्या गीताञ्जलीला जगत्प्रसिद्ध नोबेलपरितोषिक मिळाल्यानन्तर, भक्तिवादी पण भक्ति या शब्दापासून अलिप्त रहाणारी, प्रीतिभक्तीचा समन्वय करूं पहाणारी पण भावनादृष्ट्या मानवी प्रीति आणि अीश्वरी भक्ति या दोन्हीपासून सारखीच दूर भ्रमणारी, आणि फार तर रूपकाने वेदान्त शिकविणारी अशी ठरावीक ठशाची कविता रेन्दाळकर, सुमन्त आणि त्याचे अनुचर याच्या हातून निर्माण झाली. कवि माधव केशव काटदरे यानी कागदोपत्री विखुरलेली अैतिहासिक माहिती कष्टाने मिळवून, जुळवून ' गोखलखा लढनेवाला ' सारखी अैतिहासिक कविता लिहिली तर अितरानी हातार्शी असलेल्या बखरी पद्यात अुतरून ' गोखलखा बापू है ये ' सारखी कवितेची टाकसाळ चालूं केली आणि देशातील वाढत्या देशभक्तीच्या लाटेचा अुपयोग करून घेअून, आपल्या प्रेमवावड्या देशभक्तीचें प्रदर्शन केलें पुढे युवतीच्या रूपाचे आणि वेषभूषेचे निःसङ्कोच रसिकतेने केलेले यथातथ्य वर्णन रसिकाना मोहून टाकिते हे पाहताच कोणी कोणी रस्त्यातील आणि खिडकीतील दृश्याकडे शोधक दृष्टीने पाहून पद्य रचूं लागले तर कोणी कोणी तारीख-तक्त्यावरील चित्रातील सुन्दरीची आराधना करण्याचा कमी भयङ्कर असा मार्ग पत्करिला अगदी अलीकडे रशियातून अिकडे आलेले समाजसत्तावाद आणि भौतिकवाद या दोन शब्दाचे मोहक प्रतिध्वनि अुमटूं लागले आहेत. आणि

नव्या दमाचे कवि ' सवगडी ' होऊन तटस्थ राहून भाण्डवलवाल्याच्या दास्यात खितपणाऱ्या जीवाची शब्दचित्रें काढूं लागले आहेत अवञ्च काय तर ज्यावेळीं जे खूळ पिकेल त्यावेळीं त्याचे पडसाद आपल्या कवितेंत न अुमटविल्यास यशाच्या घोडदौडींत आपण मागे राहूं या भीतीने ते ते सूर काढीत आलेले दिसतात.

भाषेच्या आणि वृत्तयोजनेच्या प्रकरणींहि हीच अनुकरणशीलता आढळते राजकवि चन्द्रशेखरकृत ' काय हो चमत्कार ! ' हें दीर्घ काव्य प्रकाशित झाल्या-नंतर किती तरी वर्षांनी आम्बराईतील जानपदगीताच्याहि मागून ' न्ह्यारीचा वकूत ' हें भावगीत प्रकाशित झाले राजकवींनी जानपद जीवनातील अेक अद्भुत रम्य चित्र काढिले असून कुणबाअु भाषेचा अुपयोगहि फार मार्मिकपणाने केला आहे पण कुणबाअु भाषेत जानपद गीतें रचण्याची द्रूमच निघाली ती कवि यशवन्ताच्या तोण्डून ' न्ह्यारीचा वकूत ' लोकप्रिय झाल्यानन्तर याच्या थोडें आधी सुनीत गज्जलाची दोन खुळे आली आणि गेली अिङ्ग्रजी काव्यातील ब्लॅङ्क् व्हर्सचे स्थान पाहून निर्यमकतेचा पुरस्कार झाला, आणि ' फ्री व्हर्स 'ची म्हणजे स्वैरपद्याची दूम दृष्टीस पडताच बेबन्द छन्द, मुक्तछन्द अित्यादी प्रयोग होअुं लागले ' राजहंस माझा निजला, ' ' कोठे हा हैदरअली ' या दोन कविता प्रसिद्ध होताच जो तो कवि या जातीचा पिच्छा पुरवू लागला गिरीशकृत ' मन मोहन वाजवुनी सारङ्गी काढी मञ्जुळ सूर ' ही कविता लोकप्रिय होताच त्या जातीचीच नव्हे तर यमकबान्धणीचीहि पद्ये बाहेर पडूं लागली. [ आता मनोहर कृत ' भावभेट ' या पुस्तकातील या जातीच्या कवितांच्या खाली मूळ कवितेच्या रचनाकालपूर्वील तारखा आढळतात तो मुद्रणदोष असावा ] मायदेवाना ' चला सुटी झाली ' या कवितेची जाति ' स्थानिक स्वराज्या'तील ' मोहतूर झाल्यावरी ' या पदा वरून सुचली असावी याला साक्ष यमकाची धाटणीच देते ' झिम्मा ' या कवितेच्या छन्दात केलेल्या वहुतेक कवितातील कडव्याच्या अन्ती अमुक करूं या, तमुक करूं या असेच म्हटलेले आढळतें मुद्रणप्रकरणींहि, हिरव्याशाअीने छापलेलें, छोट्या आकाराचें, कविद्वयाच्या कवितांचे पुस्तक ' वीणा—झङ्कार ' हे प्रसिद्ध होताच, तसेंच हिरव्याशाअीने छापलेलें दोन कवींच्या कवितांचें पुस्तक ' काव्य तुषार ' हें प्रकाशित करण्यांत आलें ही अनुकरणशीलता अितक्या थराला गेलेली आहे की रविकिरणमण्डळाच्या आठ सदस्यात अेक आचार्य आणि अेक स्त्री आहे हें पाहून धवलगिरी नामक कविता सङ्ग्रहाच्या ग्रन्थांत ज्या मण्डळाचें प्रकाशन आहे त्याच्या आठ सदस्यांत अेक आचार्य आणि एक स्त्री समाविष्ट करून घेण्यात आललीं दिसतात, या मण्डळांतील दोन सदस्यांत वसिष्ट–अरुन्धतीचें नाते

जोडता आलें नाही त्याला सम्पादकाचा निरुपाय झाला असावा ! याहून हि हास्यास्पद गोष्ट ही की अेका साहित्यिकाला फुरसें चावल्याचा जिकडे तिकडे बोभाटा झालेला पाहून दुसऱ्या अेका प्रथितयश साहित्यिकाला, मलाहि फुरसें चावलें होतें अशी अेक आठवण सोडून द्यावीशी वाटली

ही जी अनुकरणशीलतेची कीड आपल्या प्रवृत्तीस लागलेली आहे तिचा बीमोड केल्याविना आपली निरोगी वाढ होणार नाही यावर कोणी असा आक्षेप घेअील की काव्यकला ही जर अितर ललितकलाच्या प्रमाणे अनुकरणात्मक ललित-कला आहे तर हिच्या वाढीस अनुकरणशीलता ही बाधक का व्हावी ? अेखाद्या कलेच्या प्राथमिक अवस्थेंत जरी निसर्गाची प्रतिकृति अुतरविण्यात मनुष्याला समाधान वाटत असलें तरी पुढे त्याला आपल्या संयोजनेच्या गूढ प्रभावाने नवी सृष्टि निर्माण केल्यावाचून कलेचा अुत्कर्ष झाला असें वाटत नाही ही नवी सृष्टि प्रतिबिम्बरूप नसते. वास्तवाचा स्पष्ट आभास अुत्पन्न करण्याअितकी ती निसर्गास धरून असावी लागते त्यातून कलेच्या प्राथमिक अवस्थेंतहि निसर्गाचेंच अनुकरण असतें व तेंच कलायुक्त ठरतें अनुकरणाचें अनुकरण हे अभ्यासासाठी अुपयुक्त ठरलें तरी तें कलेचें विलसित ठरत नाही कलात्मक नवी सृष्टि ही सुद्धा काही शून्यातून अेकदम अवतरत नाही पन्चेंद्रिय द्वारा मिळणाऱ्या अनुभवाचे जे ठसे अुमटलेले असतात त्यांचीच संयोजना अेका गूढ रीतीने होते, म्हणून अुत्कृष्ट वाङ्मय हें जसें अननुभूताचें सूचक असते तसेंच तें अनुभूताचें स्मारकहि असतें स्वातन्त्र्याच्या वातावरणात कल्पकतेला कितीजरी अलौकिक फुलें फळें लगडलीं आणि तीं कितीजरी अज्ञातापर्यन्त अुन्च भरारलीं तरी तिचा अुद्गम हा अनुभूतातूनच होतो

वाङ्मयाच्या वाचनाने अुमटणारा ठसा हा आधीच अस्पष्ट असायचा कारण तो ठशाचा ठसा असतो, आणि त्याच्यावरून अेखादी प्रतिकृति काढली तर ती किती पुसट आणि कदाचित् किती विकृत निघण्याचा सम्भव आहे याची कल्पनाच करावी. अिङ्ग्रजी वाङ्मयांत फुलें, झरे, पक्षी, समुद्र याच्यावर हृदयङ्गम कविता लिहिलेल्या आहेत त्या वाचून मराठीतहि अशी सृष्टिविषयक कविता असावी ही अिच्छा होणें अगदी स्वाभाविक आहे, पण To a Skylark ही कविता वाचूनच 'चण्डोलास' नावाची कविता लिहिली तर तिला अनुभवाचा काही आधार नसल्याने ती हृदयङ्गम वठणार नाही. टेनिसनचा ओढा जिवन्त वाटतो, तसा ताम्बे, याचा झरा वाटत नाही याचें कारण विशिष्ट अनुभूतीचा अभाव हेच होय अुलटपक्षी बाळकवींचा निर्झर कसा चैतन्यपूर्ण वाटतो मराठी कवि ज्या भागात रहात

असेल तेथील विशिष्ट फुलें झाडें ओढे नद्या डोङ्गर अित्यादिकांशी तो जेव्हा समरसेल, या सृष्टीचे विशिष्ट ठसे जेव्हां त्याच्या अन्तरङ्गावर अुमटतील तेव्हा त्या ठशाच्या संयोजनेने जी सृष्टि आपोआप निर्माण होअील ती स्पष्ट, वास्तव, आणि अितराच्या अन्तराचा ठाव घेणारी अशी होअील, तेव्हाच त्या कवीच्या शब्दात, रसिकाच्या अन्त करणात पडसाद अुमटविण्याचें सामर्थ्य येअील. सृष्टीचा प्रत्यक्ष अनुभव घेतल्याने जे ज्ञान होते ते बहुश बिनचूक असतें, परन्तु ग्रन्थद्वारा सृष्टीविषयी शास्त्रीय ज्ञान मिळविल्याने फार तर वर्णनात चुका होणार नाहीत, परन्तु वर्णन हृदयङ्गम होअीलच असें नाही बाळकवींचा ' अरुण ' तसा अस्पष्ट आहे, परन्तु त्याच्या हुरळणुकीच्या प्रभावाने तो हृदयङ्गम वाटतो गोविन्दाग्रजाच्या अरुणाला तर अनुभूनाची आवश्यकताच नव्हती कारण त्याना केवळ कल्पनाचमत्कार करून दाखवायचा होता अशा हठाकृष्ट चमत्काराच्या प्रकरणीं त्याच्यावर मात करून केशवकुमारानी भयङ्कर अरुण निर्माण केला हें विडम्बन यथा योग्यच झालें आगरकराचे लेख वाचून लिहिलेल्या समाजसुधारकी कवितेपेक्षा प्रत्यक्ष सामाजिक अन्याय पाहून अन्त क्षोभ होअून जी कविता बाहेर पडेल तीच अधिक प्रभावी होअील कविता केवळ सृष्टिवर्णनपर वा सुधारकी वा युयुत्सुवादी वा समाजसत्तावादी आहे अेवढ्याने ती हृदयङ्गम वठतेच असें नाही हृदयङ्गम व्हायला ती हृदयापासून स्फुरायला हवी गूढ कवितात ताम्बे याचीच गीते सरस, जिवंत वाटतात याचें कारण तीं प्रचीतीचीं स्फुरितें आहेत हेच होय. भावगीताच्या प्रचण्ड राशींत जीं गीतें हार्दिक आहेत, स्वभावगीतें आहेत, तीच तेवढी चटका लावितात प्रेम करणें अिष्ट आहे आणि प्रेमगीत मिष्ट वाटतें म्हणून प्रेमाच्या कल्पनेने रचिलेलें भावगीत सुश्लिष्ट दिसलें तरी काय प्रभाव दाखविणार ? जेथे कवीला स्वत च्या अन्त करणाचा ठाव घेता येत नाही तेथे तो परहृदय प्रवेश करून त्याच्याशी तादात्म्य पावून काय भूमिकागीत लिहिणार ? अुत्कृष्ट स्वभावगीतांचीच सङ्ख्या जेथे मर्यादित आहे तेथे अुत्कृष्ट भूमिकागीतें दुर्मिळ झाल्यास आश्चर्य नाही.

यशस्वी दीर्घ काव्य लिहिणें हें तर भूमिका गीत लिहिण्याहूनहि कठिण आहे दीर्घ काव्यात भूमिका अनेक असतात त्या पृथगात्मपणें वठवायच्या आणि त्या सर्वांच्या पराक्रमाला ज्यात वाव मिळेल असें सरस कथानक निर्माण करून तें पद्यात वर्णावयाचे म्हणजे काही सोपें काम नव्हे प्रतिभा असली तरी पुन्हा पद्यरचना ही प्रकृतीला मानवायला पाहिजे. तेव्हा अनुभव अति मर्यादित, वाचन थोडें, परिश्रमशीलता अल्प आणि प्रतिभाहि बेताचीच अशा स्थितींत अुत्कृष्ट दीर्घ काव्य कसें

निर्माण व्हावें ? तरीहि ' अभागी कमल ' आणि ' आम्बराअी ' यासारखी सरस वाचनीय दीर्घ काव्यें निर्माण होतच आहेत ही समाधानाची गोष्ट आहे काव्य-प्रान्तातील हरिभाअू आपटे मात्र अद्यापि अवतीर्ण व्हावयाचा आहे दीर्घ काव्याचा काळ गेला असें मुळीच नाही रसिकाची अुणीव नाही आणि त्याना सवडहि आहे. दीर्घ काव्याचें तन्त्र कादम्बरीच्या तन्त्रापेक्षा साहजिकपणेंच वेगळें असणार परन्तु तीनशे पृष्ठाची ह्मणजे पन्चाहत्तरशें ओळींची कादम्बरी वाचायला जेथे वाचक मिळूं शकतात तेथे पाच सहस्र ओळींचें दीर्घ काव्य वाचायला वाचक मिळणार नाहीत हें सम्भवनीय वाटत नाही लेखनाचा प्रभाव मात्र असा पाहिजे की धारेला लाग-लेल्या वस्तूप्रमाणे वाचक कथानकाच्या ओघासङ्गे वहावत गेला पाहिजे.

आधुनिक मराठी कविता वाचकाच्या मनात पडसाद अुत्पन्न करूं शकते की नाही, आणि ती पडसाद अुत्पन्न करीत नसल्यास त्याचें कारण काय असेल याचाच मी येथे विचार केला आहे सामाजिक वा राजकीय बन्धनाविषयी जे विचार प्रसृत होत आहेत ते मला व्यक्तिश कितपत मान्य आहेत यावरून मी काव्याचें, ललित वाङ्मयाचे महत्त्व ठरवीत नाही प्रतिपादित विचाराच्या मान्यतेवरून वाङ्मयाचें महत्त्वमापन करणें सुतराम् चुकीचें आहे, आणि अमान्य वाङ्मयाला तात्त्विक विरोध नव्हे तर कायदेशीर प्रतिबन्ध करणें हे तर अनर्थावह आहे कालचें मान्य आज अमान्य होअूं शकतें आणि आजचें मान्य अुद्याहि मान्यच राहील असा भर-वसा नाही हा प्रश्न वैयक्तिक आवडीनावडीचा न राहता तो सत्ताधीश पक्षाच्या आवडीनावडीचा राजकीय प्रश्न झाला तर प्रत्येक क्रान्तीच्या वेळीं पूर्वील वाङ्मयाला अग्न्यर्पण करण्याचा समारम्भ अुरकावा लागेल आणि नवीन काही लिहूं अिच्छि-णाऱ्याचे हात तोडावे लागतील आणि जिभा अुपटाव्या लागतील कालीदास शेक्स पिअरादि कवीना राजसत्तावाद मान्य होता ह्मणून त्याना समाजसत्तावाद्यानी नाम-शेष करण्याचा प्रयत्न करणे हें जसें वेडेपणाचे होअील तसेच, आधुनिक कवितेंत व्यक्तिस्वातन्त्र्यवाद भलत्याच थराला जात आहे या समजूतीने तिला अनीति प्रसा-रक ठरवून कायद्याने तिला जिवन्त समाधि देअूं अिच्छिणाऱ्याचें वर्तनहि वेडे-पणाचें होअील

जुन्या नव्या विचाराचें झुन्ज हें प्रवृत्ति निवृत्तीच्या झुन्जाअितकेंच सनातन आणि शाश्वत आहे अमुक अेक गोष्ट झाली तर स्वैराचार माजून समाजाचा प्रळय होअील ही भीति जितकी स्वाभाविक आहे तितकीच निराधार आहे. हिन्दु विधवा कॉलेजांतील वातावरणांत अेका समवयी युवकावर प्रेम करिते, पतिपत्नींची घट

स्फोटास सम्मति आहे परन्तु घटस्फोट कायदेशीर होण्यास अवश्य असणाऱ्या व्यभिचाराचें सोङ्गहि आणणें त्यांस मान्य नाही म्हणून दोघेहि आपआपल्या आवडीच्या योग्य व्यक्तीच्यासङ्गे कर्तव्याची जाणीव ठेवून अलग अलग ससार करितात अशा धर्तीचीं चित्रें वाङ्मयात आढळलीं तरी त्याच्या योगाने समाजाच्या स्थायित्वाला, जिवटपणाला क्वचितच ढळ बसतो. अपरिचितपणामुळें आपण नव्या स्थितीला बिचकतों, घाबरतो आणि व्यामूढ होतो अिराणदेशात मुदतीची लग्नें धर्माने विहित आणि कायद्याने मान्य आहेत, व ब्रह्मदेशात काही ठिकाणी अेका स्त्रीला अनेक पति करिता येतात या गोष्टी हिन्दुसमाजास स्वाभाविकपणेंच भयङ्कर वाटतील पण ते ते समाज तेवढ्याने रसातळास गेलेले दिसत नाहीत हें ध्यानात ठेविले पाहिजे समाजात अेक प्रकारचे मूलभूत सौजन्य, सहकारित्व आणि स्थिति निष्ठता हीं असतात समाजाचे घटक हें बहुताशी अप्रत्यक्षपणे आपआपल्या मर्यादा पाळीत असतात कायद्याने स्वातन्त्र्य दिलें तरी प्रत्येक मनुष्य स्वैर वागूं लागणार नाही, स्वैर वागूं शकणार नाही हिन्दुधर्मशास्त्राने पुरुषाला बहुपत्नीकत्वाचे स्वातन्त्र्य दिलें आहे त्याचा अुपयोग किती लोक घेअूं अिच्छितात वा शकतात ?

पुन्हा, ‘ बन्धनापलीकडे ’ वाचून का कोणी बन्धनापलीकडे जातो ? अटकेपार जाणारे लोक ‘ अटकेपार ’ वाचायला मिळण्याची वाट पाहात नाहीत व्याख्यानाने आणि लेखनाने क्रान्ति घडवून आणिता येते असें म्हणण्यात धीर देणारी रम्य अतिशयोक्ति आहे, पण वस्तुस्थिति मोठी निराशाजनक असते हिन्दुस्थानात तर सत्य ही केवळ बुद्धीने आकळून नन्तर देव्हाऱ्यात सोवळयात ठेवून देण्याची गोष्ट असते असें दिसतें तिचा व्यक्तीच्या चारित्र्यावर आणि प्रचारद्वारा राष्ट्राच्या जीवनावर परिणाम घडलाच पाहिजे असें नाही ही दृष्टि बदललीच पाहिजे ती बदलेल तेव्हा बदलो, पण तों पर्यन्त तरी नवमतवाद्यांच्या लेखनाला भिण्याचे कारण नाही, त्याने समाजव्यवस्था यत्किञ्चित्‌हि बिघडणार नाही पुन्हा, नवमत-वाद्यानाहि बन्धनेंच नकोत असें नाही. त्याच्या पृथ्वीवरील स्वर्गात म्हणजे रशिया-देशात काही बन्धने तर अत्यन्त कडक आहेत नवमतवाद्यांना जुन्या मर्यादा तोडून नव्या मर्यादा घालायच्या आहेत, तेव्हा मूलत ते नीति हवी असेंच म्हणणारे आहेत. शेवटीं या प्रकरणीं साङ्गायचें ते हेंच की काव्याची वाङ्मयाची परीक्षा ही त्यातील मान्यतेवरून करावयाची नसून, त्यांत प्रचीतीचा जिव्हाळा किती आहे, तें मनुष्यमात्राला कितपत गम्य व रम्य वाटतें, किती खोल परिणाम करूं शकते यावरून वाङ्मयाचें महत्त्व ठरवायचें असतें.

नवमतवादामुळे अखाद्या पुस्तकाविषयीं कुतूहल वाटेल, काही प्रति खपतील, परन्तु तेवढ्यानें ते पुस्तक चिरायु होणार नाही त्यात कलेसाठी कला आहे अशी घोषणा केल्यानेहि त्या पुस्तकाला सन्जीवन मिळणार नाही कलेसाठी कला याचा अर्थ अेवढाच की कलोपासकाने खपावर व लोकप्रियतेवर दृष्टि ठेवूं नये. स्वत ला जें पटतें व जें अलौकिक आनन्ददायक वाटतें त्यापासून व्यावहारिक स्वार्थ सम्पादण्यासाठीं पराङ्मुख होअूं नये. त्याने स्वत शी प्रामाणिकपणें वर्तावें प्रामाणिकपणाचा समावेश नवनीतीतहि होत नाही व कलेंतहि होत नाही कलेला काही तसें प्रत्यक्षात स्वतन्त्र अस्तित्व नाही केवळ तन्त्रशुद्धता म्हणजे काही कला नव्हे प्रत्येक ललित कृतीतील चैतन्य हें तिचें विशिष्ट तन्त्र ठरवीत असतें म्हणून अत्यन्त कलापूर्ण कृतीचाहि अुद्गम हा प्रत्यक्षाप्रत्यक्ष मानवी अनुभूतींतून, संसाराच्या क्षेत्रातच व्हायला हवा बाह्यतन्त्राच्या दृष्टीने सदोष अशी हरिभाअू आपटे याची कृति वा कित्येकदा, तन्त्राचा विचारहि न करणारे डॉ श्रीधर व्यङ्कटेश केतकर याची कृति दुसऱ्या कित्येकाच्या तन्त्रशुद्ध कृतीहून अधिक प्रभावी वाटते याचें कारण तींत अधिक जिव्हाळा आहे, अधिक प्रामाणिकपणा आहे हेंच होय. या जिव्हाळ्याचा अभाव लपविण्याकरिताच कित्येकदा कलेसाठी कला ही घोषणा करण्यात येते काव्यात प्रसाद म्हणजे सरळ सुबोधपणा आहे अलङ्कार आहेत, छन्दोबद्ध सप्रमाण शरीर आहे, घोटीव गुळगुळीतपणा आहे, भिजलेल्या अङ्गवस्त्राचीं, अुरोजादि गूढ अवयवाची झिरझिरीत तलम वर्णने आहेत–कला आहे पण अर्थाची रमणीयता नाही नेत्र वेधून घेअून हृदयाशी संवाद करुं लागणारी अनुभूतिजन्य अुत्कटता नाही, चैतन्याची चमक नाही तर काय अुपयोग ? मनुष्यमात्राला जिवन्त चालत्या बोलत्या प्राण्याच्या सहवासाची अिच्छा असते, कलेच्या सुकुमार पण काल्याप्रमाणे गार अशा कलेबराला कवटाळून ती अिच्छा कशी पूर्ण होणार ? आनन्द मिळायला वाङ्मयांतहि जिवन्तपणा पाहिजे, त्याच्या जोडीस सर्वाङ्गसुन्दरता असली तर दुधात साखर पडली. पण चुनवणींत दुधाचें रङ्गसादृश्य आहे म्हणून त्यांत साखर टाकली तरी सुधेची गोड त्याच्या मिश्रणाला कशी येणार ?

नवमतवादाची नवलाअी वा तन्त्रशुद्धतेची कला ही जिवन्तपणाची अुणीव भरून काढूं शकत नाही तसेंच कालप्रतिनिधित्वहि ही अुणीव भरून काढूं शकत नाही. अेखादा कवि आपल्या काळाचा प्रतिनिधि कितपत असावा हें त्याच्या स्वभावावर, त्याच्या प्रवृत्तीवर अवलम्बून राहील. परिस्थिति ही न्यूनाधिक प्रमाणांत

नेहमींचें जाचक असतें नवे नवे प्रश्न, नवे नवे कलह नित्य अुपस्थित होत असतात कोणी कोणी या कलहापासून दूर अेकीकडे जाअून त्या कलहाची आच लागणार नाही अितकेंच नव्हे तर त्याची आठवणहि होणार नाही अशी रम्य तटबन्दी आपल्या भोवती करून घेअून आत सन्तोषाने कालक्रमणा करितात कोणी कोणी कलहात प्रत्यक्ष भाग घेत नाहीत, पण ज्या पक्षाविषयी त्याना सहानुभूति वाटत असेल त्या पक्षाला गुप्त साह्य करीत तटस्थ, सुखी आणि शान्त रहातात. कोणी कोणी वैयक्तिक सुखाचीच काय पण यशापयशाचीहि चिन्ता न करिता तत्त्वासाठी झुन्जात पडतात हे असे प्रकृतिभेद कवींत आणि अितर वाङ्मयसेवकातहि सम्भवतात प्रत्यक्ष मुखात पडलेल्या मनुष्याला वाङ्मयनिर्मितीसाठीं अवश्य असणारें स्वास्थ्य आणि सवड हीं क्वचितच लाभतात मुखात बौद्धिक भाग घेअून आपल्या पक्षाचे मण्डन, विरुद्ध पक्षाचें खण्डन आणि स्वमताचा प्रसार करण्याचें मोठे कार्य आता मुख्यत वक्त्याच्या आणि वर्तमानपत्राच्या अङगावर पडले आहे अेखादा कवि जर पद्यात हे कार्य करण्याचा अव्यापारेषु व्यापार करील तर त्याची भाषा कितीहि अुत्कट आणि घोटीव असली तरी त्याच्या काव्याला वर्तमानपत्राहून अधिक आयुष्य आणि महत्व हीं लाभणार नाहीत प्रचलित प्रश्नाचा निर्णय होण्याच्या आधीच त्या काव्याचा फटशा अुडेल अटीतटीने झुन्ज खेळताना अेकाङ्गीपणा येतो दृष्टीला विकृति होते. आणि जेथे विकृति आहे तेथे शाश्वति येअू शकत नाही ससारातील विविध कलहाकडे योग्य सहानुभूतीने पाहून जो ससारचित्रें रङ्गवील आणि कळकळीचे का होअीना पण नुसते उपदेशपाठ न देता वाचकाना आपली दृष्टी देअील· आणि आपल्या कलाकृतीच्या करवी सहानुभूतीच्या बळे, वाचकाच्या प्रवृत्तीला न कळत चाङगले वळण देअिल त्याची कृति आदर्शभूत व शाश्वत समजावी तो कवि धन्य होय खोल ज्ञानामुळे, व्यापक सहानुभूतीमुळे, सूक्ष्म व दूरवर निरीक्षणामुळे आणि अेक प्रकारच्या तटस्थपणामुळे अशा कवीची कृति जितकी मनोरञ्जक आणि हृदयङ्गम तितकीच ती अुद्बोधक आणि वास्तव वठते पण महाराष्ट्रात या प्रतीचे वाङ्मयसेवक दुर्मिळ आहेत मराठी लेखक सध्याच्या सामाजिक आणि आर्थिक परिस्थितीमुळे काही विशिष्ट वर्गांतूनच निर्माण होतात. अितर वर्गाविषयी त्याना कितीहि सहानुभति वाटली तरी निकट सहवासाच्या अभावी, त्याच्या कृतीत प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष अनुभूतीचा जिव्हाळा येअू शकत नाही. लेखकाच्या जीवनाचा, राष्ट्रीय संसारातील विविध कलहात पडलेल्या मनुष्यांच्या जीवनाशी निकट सम्बन्ध क्वचितच येतो, म्हणून श्रेष्ठ प्रतीचें प्रातिनिधिक वाङ्मय निर्माण व्हायला, निरनिराळया जातींतूनच नव्हे तर निरनिराळया वर्गातून 'लेखक

निघू शकतील अशी सामाजिक व आर्थिक स्थिति यायला हवी, आणि असें जेव्हा होअील तेव्हाच आपले वाङ्मय खरोखर राष्ट्रीय, खरोखर प्रातिनिधिक व्हायच्या मार्गाला लागेल. बाह्य घडामोडींचा वृत्तान्त वर्तमान पत्रात येतो तेव्हा वर्तमानपत्री लिखाणाचे सङ्कलन केलें तर तें अेका दृष्टीने प्रातिनिधिक दिसेल, पण वर्तमानपत्री लिखाण ह्मणजे वाङ्मय नव्हे.

जीवनातील विविध कलहापासून शरीरानेच नव्हे तर मनाने हि अलिप्त रहाणारे जसे काही लोक असतात तसेच काही कवि हि सम्भवतात कोणाची दृष्टि भूतकाळावर स्थिरावेल तर कोणाची अन्तर्मुख होअील त्याच्या कृतीपासून जर प्रत्यक्ष जाचक परिस्थितीचा क्षणैक विसर पडत असेल, श्रमाचा परिहार होत असेल, आणि काल्पनिक का होअीना पण जिवन्त व्यक्तीच्या सहवासाचें सुख लाभत असेल तर तिला कविता म्हणून योग्य स्थान, मान द्यायला प्रत्यवाय कोणता ? असतना कवितेत कवीच्याच मनसारङ्गाची चित्रे ? कवितेत तत्कालीन समाजाचें प्रतिबिम्ब असलेंच पाहिजे असें नाही असहकारितेची प्रचण्ड लाट देशभर खळबळ अुडवून देत असताना अेखाद्या कवीने शाकुन्तलाच्या प्रतीचें नाटक व मेघदूताच्या तोडीचें काव्य लिहिलें तर त्यात विलायती कापडाचा बहिष्कार, खादीचा पुरस्कार अित्यादि काही नाही म्हणून त्यास आपण टाकून देअूं काय ? अर्थात् नाही रवीन्द्रनाथ टागोराच्या ज्या गीतान्जलीचें स्वागत जगभर झालें तिच्यात आधुनिक सामाजिक राजकीय आन्दोलनाचे प्रतिबिम्ब कोठे आहे ? मोरोपन्ताची कविता अेकन्दरीने पाहता जिवन्त नाही याचे कारण, मराठी राअूत तिकडे भीमथडीच्या तट्टाना गङ्गथडीचें पाणी पाजून अटकेपार हुतुतु घालित असताना मोरोपन्त अिकडे स्वस्थपणे पौराणिक कथा सयमक पद्यात रचित राहिला हे होय असें काही लोक म्हणतात ते युक्त नाही मोरोपन्ताच्या कवितेची योग्यता, तींत त्याच्या काळाचें प्रतिबिम्ब किती अुमटले आहे यावरून ठरविणें हे ती पद्यसङ्ख्येवरून, वा संस्कृत शब्दप्राचुर्यावरून ठरविण्याअितकेंच चुकीचे होअील कवितेची योग्यता अन्तर्गत जिव्हाळयावरून, वैशिष्टयावरूनच ठरवायला पाहिजे

जीं आधुनिक भावगीते आज चटका लावून सोडीत आहेत त्याच्यात अेका सामाजिक असमाधानाचे मात्र प्रतिबिम्ब दिसतें सुशिक्षित समाजात जिकडे तिकडे स्त्रीपुरुषसम्बन्धविषयक, विशेषत पुरुषाचें स्त्रीसहवासविषयक असमाधान पसरलेलें दिसतें सामान्य माणसाची गतयौवनाची दृष्टि वैवाहिक व्यवहारापलीकडे क्वचितच जाते. परन्तु ज्या व्यक्तिसमूहाला आधुनिक मराठी कविता ही गम्य व रम्य वाटते

त्याला काही तरी निराळें, रूढींच्या बन्धनापलीकडील रम्याभ्दुत हवे आहे परन्तु पराक्रम नाही आणि सहिष्णुतेचें शान्त सामर्थ्यहि नाही तेव्हा हे असमाधान कवि मुखातून हृदयङ्गम अुच्छ्वसिताच्या रूपाने प्रकट होत आहे दुरून हुरहूर, दबलेली अुत्कण्ठा, क्षयी आशा याचे बोल निघत आहेत काव्यावर अेक प्रकारच्या निष्क्रियतेची, स्त्रैणपणाची छाया पडली आहे आता टीकाकारानी कवींना विषय नेमून देअूं नयेत आणि कवींनीं आपल्या आवडत्या विषयावरच काव्ये लिहावीत हे अुचित आहे, परन्तु बहुतेक कवि अेखादा विशिष्टच अेकच अेक सूर काढीत असले तर त्याना वाचकानी आपल्या आकाङ्क्षा अपेक्षा कळवायला काही प्रत्यवाय दिसत नाही अेका सुराने सङ्गीत सिद्ध होत नाही. वैयक्तिक लागणीचीं गीते अवश्यमेव हवीत, परन्तु बहुजन समाजाच्या सात्त्विक भावना रञ्जवितील, अुत्तेजित करितील, अशींहि गीतें हवीं आहेत स्त्रीपुरुष सहवास हा विषय कितीहि रम्य असला तरी तो ह्मणजे काही सारा संसार नव्हे. प्रीतिस पराक्रमाची जोड पाहिजे, कष्टाळु अुत्साहाची, दुर्दम्य झुन्जार विजिगीषेचीं स्फुरितें पाहिजे आहेत. महाराष्ट्राला मराठी देशगीताची,राष्ट्रगीताची फार अुणीव आहे. आम्ही विचार न करिता अर्धबङ्गाली 'वन्दे मातरम्' ह्मणतों हें मराठीच्या पुत्राना अभिमानास्पद नाही मराठीचे मराठपण जोपासून वाढविणारे कवि हवे आहेत पञ्चवीस वर्षांपूर्वी आपल्या 'काव्य आणि काव्योदय' या निबन्धाच्या शेवटी कै. वासुदेव बळवंत पटवर्धन यानी जा कळकळीचा अुपदेश केला आहे त्याची आवश्यकता अद्यापि नष्ट झालेली नाही ते ह्मणतात, "अद्याचे कवी हो ! महाराष्ट्राचें हृदय तुमचे हातीं आहे आपल्या प्रतिभासम्पन्नवाणीने तें नाचूं लावा, त्याची अुडी वाढवा आणि स्वत च्या जोराची व कर्तृत्वाची त्याला साक्ष पटवा त्याचे सामर्थ्य आणि भाग्य अूर्जितदशेस आणा आणि महाराष्ट्राचा संसार खरोखर संसार होअील अशीं गीतें गा ! "

श्री.

# मराठी साहित्य संमेलन, बडोदें.

## अधिवेशन १९ वें,

सन १९३४.

विभाग :

कथा.

अध्यक्ष :

श्री. वि. स. खांडेकर

## यांचें भाषण.

## सन्मान्य अध्यक्ष व थोर सभाजन हो,

यदाच्या साहित्यसंमेलनातील कथाविभागाचें हें अध्यक्षस्थान मी जितक्या आनंदानें तितक्याच साशंकतेने स्वीकारीत आहे अर्थात् यातील आनंदाचें श्रेय जसें आपणा सर्वांना तशी साशंकतेची जबाबदारी सर्वस्वी माझ्यावर आहे, हें सागायला नकोच वय व वाङ्मयकर्तृत्व या दोन्ही दृष्टीनीं लहान असलेला माझ्यासारखा कथालेखक आणि जनसमाजाला आपल्या जादूनें मुग्ध करून सोडणाऱ्या कथावाङ्मयासारख्या साहित्यविभागाचे अध्यक्षस्थान ! कुठे माडाचें चुडत आणि कुठें लक्ष्मीविलास राजवाडा ! केवळ आपल्या माझ्यावरील उत्कट प्रेमामुळें आज तें चुडत या स्थानी बसत आहे, त्याची मला पूर्ण जाणीव आहे गेलीं सतरा अठरा वर्षें मी गोमातकाच्या सान्निध्यात काढली आहेत त्यामुळें लॉटरीबरोबर माणसाचीं नशिबें उघडल्याच्या बातम्या वारंवार माझ्या कानावर पडल्या. पण लहरी लक्ष्मीच्या लॉटरीचे एक रुपयाचे तिकिट काढण्याचाहि अजून मला धीर झाला नाही. रुपया देऊन मोळा आणे फजिती करून घेण्यात काय हाशील आहे ? पण पधरा वर्षांपूर्वी पोरसवदा हौसेनें सरस्वतीदेवीने मंजूर केलेल्या सोडतीतील एक तिकीट मी काढलें. त्या तिकीटाला आजच्या अध्यक्षस्थानाइतके मोठें बक्षीस कधीं काळी मिळेल, अशी त्या वेळीं मला स्वप्नातही कल्पना आली नाहीं येणार तरी कुठून ? तेव्हा जीं स्वप्नें पडत त्यात मासिकांच्या संपादकाचे नाटकातील खलपुरुषासारखे दिसणारे चेहरे व त्यानीं केराच्या टोपल्यात फेकून दिलेल्या माझ्या कविता याच गोष्टी प्रामुख्यानें असत

### संशयरत्नमाला.

माझ्याहून ज्येष्ठ व श्रेष्ठ असे प्रो. वा म जोशी, डॉ केतकर, श्री गुर्जर, वरेरकर, प्रो फडके प्रभृति अनेक कथालेखक महाराष्ट्रांत आहेत. पण जोशी–केतकरांनीं मोठ्या संमेलनाचें अध्यक्षस्थान भूषित केलेलें. देवाला वाहिलेल्या फुलाचा वास घेण्याकडे उपयोग कोण करणार ? कथाविभागाचें अधिवेशन यंदाचें पहिल्याने होत आहे क्रिकेटमध्यें कॅप्टन अगर उत्कृष्ट खेळाडू यांना खेळाच्या तोंडीं देत नाहींत. आमच्या कथालेखकचमूंतील कॅप्टन प्रो० फडके व टोलेबाजी करणारे डावखुरे वरेरकर याना मागे ठेवून मला पुढें करण्यांतही बहुधा आपली हीच

दूरदृष्टि असावी. सागाकडून चावून घेण्याची जी दुष्ट खोड मला जडली आहे व वर्तमानपत्रांच्या कृपेनें जी जगजाहीर झाली आहे, तीही कदाचित् याच्या मुळाशी असेल. कारण काहींही असो, ही संशयरत्नमाला इथेंच गुंडाळून ठेवून आपल्या माझ्यावरील निरतिशय प्रेमाबद्दल मी आपले मन पूर्वक आभार मानतो.

आपण मला दिलेला हा मान पाहून ज्यांच्या डोळ्यात आनंदाश्रु उभे राहिले असते, ते गुरुवर्य श्रीपाद कृष्ण कोल्हटकर आज इथेंच नव्हे तर इहलोकांतही नाहींत, ही गोष्ट माझ्या इतकीच आपणालाही जाणवेल, असें मला वाटते. ' बबीची तयारी ' या त्याच्या छोट्या गोष्टींतील लहानग्या बबीसारखी माझी स्थिति झाली आहे. आजोबानीं बबीला दिलेल्या सुंदर खेळण्याप्रमाणें कोल्हटकरानीं दाखविलेल्या मार्गानें जाऊन मलाही शारदोपासनेचीं मधुर फळे मिळत आहेत. पण बबीच्या त्या खेळण्यानी आजोबाची चिरनिद्रा जशी भंग पावूं शकली नाहीं, त्याप्रमाणें या मधुर फळाचा रस तात्यासाहेबांना काळनदीच्या ऐलतीरावर आकर्षून आणूं शकणार नाहीं. त्याच्या पूज्यचरणीं कृतज्ञतेचे अश्रू वाहून मी माझ्या कामाकडे वळतो

## कथावाङ्मयाचा आढावा.

हें काम मात्र अत्यंत आनंदाचें आहे. सरस्वतीदेवी माझ्यासारख्या कथा-प्रदेशाच्या कुळकर्ण्याला ' तुझ्या भागांत यंदा कसं काय पीक आहे ? ' असा प्रश्न करणारच. या प्रश्नाचें उत्तर म्हणून ' खोटा रपोट ' करण्याचें मला मुळींच कारण नाहीं. यापेक्षां अधिक आनंदाची गोष्ट दुसरी कोणती असूं शकेल ? ' सोळा आणे पिकलंय यदा ' असें अभिमानानें सांगून त्या पिकाचा तपशीलच मी हजर करतों.

कथाक्षेत्रातील मुख्य पिकें दोन-जिराइती म्हणजे कादंबऱ्या आणि बागायती -लघुकथा व गोष्टी. चालू वर्षी गेल्या कित्येक वर्षांपेक्षा अधिक कादंबऱ्या प्रसिद्ध झाल्या, एवढेंच नव्हे तर वैचित्र्य व वाङ्मयगुण या दृष्टींनींही त्या डोळयांत भरण्या जोग्या आहेत. साठी उलटलेल्या अगर तिच्याकडे झुकलेल्या केळकर-जोशी-वरे-रकरापासून तिशीच्या आंत बाहेर असलेल्या दिवाकर कृष्ण, गांगल, विभावरी शिरूरकर प्रभृति ( विभावरीबाईचें वय मी सांगत आहे. अर्थात् त्यांची माझी खूपच ओळख असली पाहिजे असा तर्क लढवून वर्तमान पत्राचे बातमीदार माझ्यावर मुलाखतीचा मारा करतील हें मी जाणून आहे ! ) लेखकांनीं यंदा कादंबरीला करभार दिला आहे. वार्धक्यांत तरुणांची तडफ दाखविणाऱ्या वरेर

करांपासून तारुण्यात प्रौढाचें गांभीर्य दाखविणाऱ्या य. कृ. खाडिलकरापर्यंत विविध मनोवृत्तीचे लेखक या कादंबरीकारात आहेत.

श्री० तात्यासाहेब केळकरावर मराठी कादंबरी रागावलीच होती. तिनें तरी कां रागाऊं नये ? एखाद्या भावानें सात आठ बहिणींना बहुमोलाची ओंवाळणी घालुन खादीलाच वगळले तर तिला राग आल्याशिवाय राहील का ? ती दरिद्री अगर स्वभावाने वाईट असती तर गोष्ट निराळीं. पण बोलून चालून कादंबरी ती ! केळकरानी तिचा फार वर्षांचा राग लक्षात घेऊन तिच्या तबकांत यंदा संस्थानिकच घातला हे ठीक झालें. दिवाकरकृष्णाची लेखनकलिका म्हणजे जणुं काहीं किशोरीचे हृदयच ! ती फार वर्षांनीं यंदाच उमलली ! ' सुशीलेच्या देवा ' नंतर ' इंदु काळे व सरळा भोळे ' या दीड देवताचे ( पहिली अर्धी व दुसरी संपूर्ण ) पूजनही प्रो. वामनराव जोशानी याच वर्षी केलें विभावरीबाईनीं वाचकाना 'हिंदोळ्यावर' बसवून दिलेले झोके तर अगदीं ताजे आहेत. शिखरे–गागल –निरंतर प्रथमत च कादंबरी क्षेत्रात पदक्षेप करीत आहेत. उलट वेहरे, हडप कु. प्रभावळकर प्रभृतींना या क्षेत्रातील मार्ग सुपरिचित आहे गेल्या दशकातील अत्यंत लोकप्रिय कादंबरीकार प्रो. फडके याचे नाव या यादीत नाहीं असें पाहून वसुलाचा हिशेब घेणाऱ्या सरस्वतीदेवीला चुकल्याचुकल्यासारखे वाटलें असते. गेलीं दहा वर्षें सोने पिकविणारी ही जमीन यंदा पड राहिली म्हणून सागावे तर तर तिचा विश्वासमुद्धा बसला नसतां असल्या गोष्टीवर. सुदैवानें तसें सांगण्याचें कारण तितके उरलें नाहीं. प्रो. फडके यांची स्त्री जीवनातील एका महत्त्वाच्या विषयावरील कादंबरी ' किर्लोस्कर ' मध्ये नुक्तीच सुरू झाली आहे.

## कथावाङ्मयांतील वैचित्र्य.

या विविध कादंबऱ्याच्या अंतरंगाकडें वळले तरीहि हेच चमत्कृतिपूर्ण वैचित्र्य अनुभवाला येईल. वरेरकर वाचकाना गिरणीची हवा खायला नेत आहेत, तर केळकर त्यांना संस्थानांत सहल करायला लावीत आहेत. एकीकडे वामनराव जोशी गांधीचें शिष्यत्व पत्करलेल्या विनायकराव भोळ्यांच्या आयुष्याची करुणरम्य कथा सागत आहेत तर दुसरीकडे शिखरे देशभक्तीच्या पायी प्रणयिनीचा हात झिडकारणाऱ्या एका कॉलेजकुमाराच्या आयुष्याचे वर्णन करीत आहेत. ' सदानंद ' कर्ते खाडिलकर विवाहित पत्नीला सोडून परस्त्रीवर लुब्ध होणाऱ्या नायकाच्या चित्रणांत गुंग, उलट ' किशोरीच्या हृदयात ' हिराशीं चोरटा प्रेमसंबंध ठेवूनही

किशोरीला आपली पत्नी करूं इच्छिणारा नायक रंगविण्यांत दिवाकरकृष्ण दंग राजकीय काय अगर सामाजिक काय, दोन्ही प्रकारच्या कथाचित्रांत अद्भुत अनुभव मुळींच नाहींत असे नाहीं केळकरांच्या कादंबरीचा संस्थानिक नायक राज्यदानाला तयार झालला दिसतो, तर विभावरीबाईची अचला केवळ मातृपदा-करितां विरागाशीं लग्नविरहित संबंध ठेवीत असलेली आढळते हे टोले मोठे असले तरी चाराचेच आहेत 'नंदनवनात' कादंबरीच्या लेखकानें प्रेमळ पतिपत्नींचे जोडपें रंगवून त्यांतील पतीला जी दुसरी स्त्री आवडू लागते तिला सवत म्हणून पत्नी मोठ्या आनंदानें घरांत आणते, असें दाखविलें आहे जग पूर्णत्वाकडे चाललें आहे हेंच खरें ! प्रणयविषयक औदार्याचें सारें श्रेय अशा रीतीनें स्त्रीजातीकडे जात असलेलें पाहूनच की काय वसुंधराकर्ते रागणेकर यानी 'सीमोल्लघनां'त पति व प्रियकर या दोघांच्याही सहवास सुखाचा लाभ घेणारी नायिका रंगविण्याची घोषणा केली. 'बहुरत्ना वसुंधरा !' दुसरें काय ?

## पण हा संधिवात नव्हे.

कलागुणाच्या दृष्टीनेंही या कादंबऱ्या काही कमी विविध नाहींत. केळकरानीं हरिभाऊंच्या वेळीं रूढ असलेल्या धोपट कथापद्धतीचा अवलंब केला आहे तर वामनराव जोश्यांनीं पत्राचा आश्रय करून आपल्या कादंबरीला नावीन्यपूर्ण रम्यता आणिली आहे 'आसवाची माळ', 'हिंदोळयावर,' 'इदु काळे व सरला भोळे,' 'थोरली आई' इत्यादि कादंबऱ्याकडे पाहिलें, म्हणजे कादंबऱ्याचा कल हात पाय आखडण्याकडे होऊं लागला आहे असें दिसून येईल पण हा संधिवात नाहीं हे खास ! 'परत भेट' व 'किशोरीचें हृदय' या वरील कादंबऱ्यापेक्षा मोठ्या आहेत पण लहान मुलाचें जेवण मोठ्या माणसाच्या न्याहारीला पुरताना मारामार हा अनुभव मागच्या पिढीला त्यानाही आला असता एवढ्या पृष्ठसंख्येत हरिभाऊंच्या कथानकानें मध्य सुद्धां गाठला नसता ही अल्पविस्तार पद्धति वाई-टच आहे असें मी म्हणत नाहीं. अंगात घालायच्या कोटापासून ऊगात काढायच्या दिवसापर्यंत सर्वच गोष्टी सध्या लहान होऊं लागल्या आहेत. तिथे बिचाऱ्या कादं-बरीनें मोठें रहावें असें म्हणण्यांत हंशील काय ? पण लघु कादंबरी म्हणजे मुग्धा-वस्थेंतील कुमारिका ! आजारीपणामुळें लहान दिसणारी लेंकुरवाळी बाई नव्हे हे या पद्धतीनें लिहिणारानीं लक्षात ठेवलें पाहिजे पात्रें, कथानक, स्वभावविकास इत्यादि गोष्टींत लघुकादंबरी कादंबरीहून बरीच भिन्न आहे या भिन्नतेकडे दुर्लक्ष झालें म्हणजे केळीच्या झाडाला नारळ लागल्याचें अद्भुत दृश्य दृष्टीस पडतें

स्टीफेन झ्वीग या पाश्चात्य कथालेखकाच्या लघुकादबऱ्या या दृष्टीनें अभ्यसनीय आहेत. 'हिंदोळ्यावर' व 'इंदु काळे आणि सरला भोळे' या विशिष्ट दृष्टीनें अधिक सरस ठरतील.

कथावाङ्मय हा काही राक्षसी आरसा नव्हे की त्यांत समाजाच्या सर्व सूक्ष्म हालचालींचें यथार्थ प्रतिबिंब पडेल पण त्याचप्रमाणें कथावाङ्मय म्हणजे कांहीं नुसता संगमरवर नव्हे विविध लेखकाच्या बहुविध अनुभवप्रवाहाच्या या संगमात जीवनाचें प्रतिबिंब नेहमींच पडतें. पण तें आरशांतले इतकें स्पष्ट असत नाही. रंजन, कला, ध्येय, व्यक्तिवैचित्र्य इत्यादि लाटामुळें हे प्रतिबिंब निरनिराळे आकार धारण करते व मोडूनही जातें अशा पुसट दिसणाऱ्या प्रतिबिंबावरून १९३४ च्या आपल्या सामाजिक जीवनाची कल्पना कुणी तिऱ्हाइतानें केली, तर विवाहाचे वैषम्य व प्रणयाचा पुरस्कार हेच समाजापुढील महत्त्वाचे प्रश्न आहेत, असें त्याला निःसशय वाटेल वस्तुस्थिति तशी आहे की काय हें सागायलाच नको! हातच्या काकणाला इतर देशात कदाचित् आरसा लागत असेल पण आमच्या देशात सध्या तरी या प्रदर्शनाकरिता आरशाची जरूरी नाहीं.

## लघुकथांची बागाईत.

उत्पन्नाच्या दृष्टीनें लघुकथाची बागाईत यंदा बरी आहे. नियतकालिकातून प्रसिद्ध होणाऱ्या लघुकथालेखकांची सख्या पाहून सध्याच्या मंदीच्या काळात जिझिया करासारखा एखादा लघुकथाकर सरकारने बसविल्यास बरें होईल, असें सुद्धा एखाद्या वाङ्मयप्रेमी कलेक्टराला वाटण्याचा संभव आहे. पण नियतकालिकांतून प्रसिद्ध होणाऱ्या कथा म्हणजे पावसाचे पाणी. रजनाचा ओलावा त्याच्यामुळे मिळतो खरा, परतु तहानेच्यावेळीं प्यायचे थंडगार सुवासिक पाणी म्हणून त्याचा काहीं उपयोग नाही. कथासग्रहानींच ते काम होऊं शकतें. सौ. शिर्के व श्री. य गो. जोशी यानी कथासंग्रहाच्या रूपाने यदा वाचकाची पुनर्भेट घेतली असून, कृष्णाबाई, नाटयछटाकार दिवाकर, बोकील, सहस्रबुद्धे, प्रो. फडके, प्रो. लक्ष्मणराव सरदेसाई प्रभृति अनेक कुशल लघुकथालेखक तर सग्रहरूपानें वाचकाना प्रथमच भेटत आहेत या संग्रहात 'लपलेल्या खडका' पासून 'कल्पवृक्षाच्या छाये' पर्यंत वाचकाला कुठेंही आरामाने बसतां येईल. 'मानसलहरी' प्रमाणेंच 'ढळवाचे पाऊस' ही त्याला शीतल व सुखकारक वाटतील. या कथात कापडाच्या दुकानात दिसलेली बाई पुन्हां भेटताच ज्यांची कादंबरीलेखनाची प्रतिभा पल्लवित होते अशा फडक्यांच्या नायकाच्या मांडीला मांडी लावून आपल्या प्रेमाला

विरोध नाही या दु खाने बेशुद्ध पडणारा य. गो जोश्यांचा नायकही आहे सहस्र-बुद्ध्यांच्या गोष्टी वाचताना सामाजिक अन्यायाचे लपलेले खडक सुरुंग लावून कसे फोडतां येतील, ही मतपरिवर्तनाची तीव्र दृष्टी दिसते, तर मानसलहरींत कल्प-वृक्षाच्या छायेंत अगर प्रो फडके याच्या गोष्टींत कलेचे व वळवाच्या पावसात विनोदाचे नृत्य आढळतें. महाराष्ट्र लघुकथेला ' मोत्याची कुडी ' देऊन दौडकरांनी व ' रशना ' देऊन कुमारी आनंदकरांनीं नुकेंच शृंगारले आहे. कोकणच्या बऱ्यांनी तर हिवाळ्यातच वाचकाना ' कलमी आंबे ' दिले या शिवाय पुरोहित, जय-वंतराव सरदेसाई, नारायणराव कुलकर्णी, कुमार रघुवीर याचेही संग्रह प्रसिद्ध झाले आहेत. हे संग्रह लेखकाची मनोवृत्ती, रचना कौशल्य, भाषा इत्यादिकात एकमेकाहून कितीहि भिन्न असले, तरी त्या सर्वांचा गुच्छ सुगंधी व रमणीयच यांत शंका नाहीं. प्रत्येक संग्रहात अशा एक दोन तरी गोष्टी आढळतील की, 'मराठींतील निवडक गोष्टी ' म्हणुन एखादा कोशाशी स्पर्धा करणारा कथासंग्रह काढा-यचे कुणी धाडशी प्रकाशकाने ठरविलेंच, तर त्याचा त्यांत सहज समावेश होऊं शकेल.

या व्याही विहिणींच्या बरोबरच इष्टमित्राचा नियतकालिकातील लघुकथा लेखकांचा समाचार घेणे अवश्य आहे. मनोरंजनाकरिता निघालेलीं मासिकें व नियतकालिकें तर राहूं द्याच. पण भविष्यापासून विम्यापर्यंतच्या विविध विष-यांना वाहिलेल्या नियतकालिकाचे अंकही गोष्टीवाचून सध्यां छापखान्याच्याबाहेर पडूं शकत नाहींत. लघुघुकथारूपी फुलपाखरांनीं ' केसरीच्या ' आयाळीवर विहार करावा हें काळमहात्म्यच नव्हें का ! शारदेमध्यें म्हातारा भुजंगनाथ आम्ही आहोत तो पर्यंत आम्हाला बायको ही पाहिजेच असे कोदंडाला ठासून सांगतो. मराठी नियतकालिकाची स्थिति या म्हाताऱ्या भुजंगनाथासारखी झाली आहे त्याना लघुक-थारूपी कुटुंब हें हवेंच. मग त्या कुटुंबाचे रंगरूप कसेंही असलें तरी चालेल. प्रसंगीं विमाविषयक नियतकालिकातिल कसल्याही गोष्टीच्या नायिकेचें नाव विमल ऊर्फ विमा ठेवले म्हणजे लघुकथेच्या या बादरायण संबंधाचें समर्थन होऊं शकेल !

## कथावाङ्मयाचा हिणकसपणा.

अशा रीतीनें मराठी नियतकालिकांतून बाहेर पडणाऱ्या गोष्टींत कला व काव्य यांचा कस लावला, तर हाताच्या बोटावर मोजण्या इतक्यासुद्धां चांगल्या गोष्टी सापडणार नाहींत, ही टीका कांहीं अगदींच खोटी नाहीं. पण केवळ संख्येच्या दृष्टीनें पाहिलें तर त्या मोजायला सहस्रार्जुनाच्या हाताचीं बोटेंही पुरी पडणार

नाहींत. एका दृष्टीनें हें बरोबरच आहे आंब्याच्या झाडाला मोहराच्या मानानें फळें कधीच लागत नाहींत. नियतकालिकाच्या लेखकवर्गात होतकरू व हौशी माणसांचा मोठा भरणा असतो पण लोकलगाड्यात प्रवास करणारा गाडीत चढून जागा पकडतो न पकडतो तोपर्यंतच जशी त्याची उतरायची वेळ होते, त्याप्रमाणें अनेक हौशी लेखकाच्या लेखणीची स्थिति आहे असा प्रवासी वाडबिछायतीची कदर कशाला करील ? वाचन, मनन, अभ्यासपूर्वक केलेला कलाविकास इत्यादिकांचें अवजड ओझें अशा हौशा लेखकाशी क्वचितच दृष्टीला पडते तथापि अशा लेखकाचें लेखन पूर्वीपेक्षा अधिक विविध होत आहे, ही आनंदाची गोष्ट होय. या सर्व हौशी लघुकथालेखकाची नावे सांगू लागल्यास विष्णुसहस्रनाम वाचल्याचें पुण्य माझ्या पदरात सहज पडेल. थोडीशी निवडक नावे घेतली, तर या पूजेला संध्येचें स्वरूप प्राप्त होईल. तेव्हा त्या फंदात न पडता आजच्या सैनिकातूनच उद्याचे सेनापति निर्माण होतात या जाणीवेनें या हौशी लेखकाना सामुदायिक नमस्कार करूनच मी पुढे जातो

यंदाच्या पीकपाण्याचा हा त्रोटक अहवाल झाला. पण समाजाची सुस्थिति एका वर्षाच्या दुष्काळावर अगर सुकाळावर थोडीच अवलंबून असते ! वाङ्मयाचेंही तसेंच आहे. यंदा पुष्कळ कथासंग्रह प्रसिद्ध झाले असले तरी त्यातील कथा अनेक वर्षांच्या परिश्रमाची फळे आहेत. कादंबऱ्याची संख्या तर तिच्या कुंडलींतल्या अनुकूल ग्रहामुळेच वाढली आहे, असा फलज्योतिषावर विश्वास ठेवणारांचा समज व्हायचा अशा परिस्थितींत मराठी कथावाङ्मयाकडे भूतभविष्याच्या व्यापक दृष्टीने ओझरती नजर टाकणे आवश्यक आहे

## या पुराला भिऊ नका.

‘ या गोष्टींनी आणि कादंबऱ्यांनी विटविलें ’ असें ह्मणणारी माणसे आहेत, नाहीं असें नाहीं. पण त्यांचे समाधान ब्रह्मदेव देखील करूं शकेल की नाहीं, याची शंकाच आहे. बिचारा ब्रह्मदेव पडला वेदपठन करणारा ! आणि वेदांत तर पुष्कळच कथा आहेत. या आक्षेपकाना वाटतें कथावाङ्मयाला भयंकर पूर आला आहे. शृंगारामुळे त्याचे पाणी गढूळलें आहे मधून मधून नव विचारांचे सर्पही या पुराबरोबर वाहत येत आहेत. तीरावरील धार्मिक खेडीपाडीं आणि शांत राहणारीं नीतिवान माणसें यांची काहीं आता धडगत दिसत नाही हा पूर ओसरण्याचे लक्षण नसल्यामुळें जलप्रलयाच्या वेळीं जसा फंड उभारतात, त्याप्रमाणें

काही तरी योजना झटपट होणे जरूर आहे समाजाची काळजी वाहणाऱ्या या सर्व लोकाना मी नम्रतापूर्वक एवढेच सागतों कीं, पात्रातील पाणी थोडेंसें वाढू लागल्याबरोबर पुराचा बागुलवोवा उभा करण्यापासून फायदा काय ? नदीच्या पात्राप्रमाणें वाङ्मयालाही सामान्यत मर्यादा असतातच. त्या मर्यादेचे उल्लघन एखादे वेळीं होत असेल, पण पुरानें केलेलें नुकसान व पाण्यानें पिकविलेली शेतें याचे प्रमाण माडलें, तर पूर ही अपरिहार्य आपत्ति म्हणून तिचा स्वीकार करणेच योग्य ठरणार नाहीं का ?

आठवड्यातील सहा दिवस कामाच्या घाण्याला जुपलेला कारकून शनिवारीं सध्याकाळी वाचनालयातून एखादी कादबरी घेऊन आला, तर ती त्याच्या हातातून हिसकावून घेऊन त्याला शनिमाहात्म्य वाचायला देणें धार्मिकपणाचें असेल, पण शहाणपणाचे खास होणार नाहीं. कथावाङ्मयावर वाचकांच्या उड्या पडतात त्या रंजनासाठी त्यात गहन धर्मतत्वे नाहीत, प्रचंड ज्ञानपर्वत नाहींत, अफाट विज्ञान-सागर नाहींत, परलोकाला लागणारी उंच शिडी नाही, हें त्याना स्वत ला कळत नाहीं का ? पण संसारतापाने तापलेल्या व तहानेनें व्याकुळ झालेल्या सामान्य मनुष्याला रम्य काल्पनिक कथाचे शीतल पेयच हवें. व्हिटॅमिन्सनी परिपूर्ण असलेल्या जड ज्ञानान्नाचा काय उपयोग आहे ? सकाळपासून संसाराला जुपून घेऊन तिसऱ्या प्रहरीं घटकाभर अग टेकणाऱ्या सर्वसामान्य गृहिणीला एखाद्या गोष्टीच्या मासिकाचा अंक दिला, तर ती तो उघडून तरी पाहील ' अधिकस्य अधिकं फलं ' या न्यायाने ज्ञानकोशाचा एखादा विभाग या वेळी तिच्या हवाली केल्यास ती त्याचा उशीदाखल उपयोग करील हेंच अधिक संभवनीय नाहीं का ?

## कथावाङ्मयाचे उद्दिष्ट.

कथावाङ्मय हे मुख्यत बहुजनसमाजासाठीं, मानवी हृदयाशी क्रीडा करण्यासाठी जन्माला येतें. क्रीडेंत व्यायाम होतो, पण तो न कळत हरिभाऊ आपट्यानी कादंबऱ्या लिहिल्या त्या काहीं रानडे-टिळक-गोखले-आगरकर अशा मंडळीकरतां नव्हेत. हलाहल जसें शकरानेंच पचवावें अगर शिवधनुष्य जसें रामानेंच उचलावें, त्याप्रमाणें समाजांतील अत्यंत अल्पसंख्याक बुद्धिवान वर्ग शुद्ध ज्ञानसंवर्धनाच्या अगर त्याच्यासारख्या कठिण व्यवसायात गढलेला असतोच पण गिरिकंदरांत तपश्चर्या करणाऱ्या मूठभर ऋषिकडे पाहून संसार असार ठरविण्यात मतलब काय ? बहुजनसमाज बालकासारखा असतो त्याला खेळीमेळीनें सागितलेल्या गोष्टीच सर्वांत अधिक आवडतात. मनुष्यमात्राची ही प्रवृत्ति प्राचीन काळापासून

चालत आली आहे. धर्मग्रथ म्हणून आपण जे अत्यंत पूज्य मानतो ते वैदिक व पौराणिक वाङ्मय मुख्यत कथात्मकच नाही का? बायबलात ख्रिस्ताने रूपक कथाच्या द्वाराने केलेल्या उपदेशाची उदाहरणे अनेक आढळतील कथात्मक वाङ्मय उदात्त भावनाचा परिपोष करणारे असावे असे म्हणणे निराळे आणि शेतात उगवणाऱ्या गवताप्रमाणे ते निरुपयोगी आहे असे म्हणणे निराळे. धान्याला गवत मानणाराना काय म्हणायचे ?

ज्ञानप्रधान वाङ्मय हे पाणीदार मोत्यासारखे असते, ( मोतें खोटीही असू शकतात अगर प्रसंगी वेजी उतरतात ही गोष्ट अलाहिदा ! ) रंजनप्रधान वाङ्मयाची त्याच्याशी तुलना करून त्याला फळाफुलाची उपमा कुणी दिली, तर त्याबद्दल कुणाला वाईट वाटणार नाही पण या फुलाचा सुगंध मोत्यापासून कसा मिळणार ? मोत्याचें पाणी कितीही चागले असले, तरी फळाचा रस तीं कुठून देणार ? शिवाय या फळाफुलात कधी कधी कल्पवृक्षाची फुले व अमृतफळे असतात हेही विसरता कामा नये

## कथावाङ्मयाची शक्ति ओळखा

देशाचे पारतन्त्र्य, समाजाची परिस्थिति अगर शिक्षणाचा प्रसार याचें कथावाङ्मयाशी त्रैराशिक माडणेंच मुळात चूक आहे. या गोष्टींना कथावाङ्मयाचें स्वरूप बदलेल, पण त्याच्या निर्मितीच्या प्रमाणात काडीमात्रही फरक होणार नाही इंग्लड, अमेरिका अगर रशिया या देशाकडे पाहिले तर तेथील कथा-वाङ्मयात निर्झरिणीच्या नद्या व नद्याचे समुद्र झालेले दिसत आहेत शिक्षणाचा भरपूर प्रसार झालेल्या देशातही कथावाङ्मय वाढत्या प्रमाणावरच निर्माण होत आहे मग शिक्षणाचे अत्यत अल्पप्रमाण असलेल्या व त्यामुळें बहुजनसमाजाचे बालकाशी अधिक साम्य असलेल्या आपल्या देशात त्याची विशेष जरूरी आहे, हे सागायला काही ज्योतिःशास्त्रज्ञाची अगर नीतिशास्त्रज्ञाची जरूरी नाहीं गेल्या तीन चार पिढ्यातील रशियन कथालेखक अगर अपटन सिंक्लेअर, लुईस, याच्यासारखे अमेरिकन कथालेखक पाहिले की कथावाङ्मयाची शक्ति निर्भेळ उपयुक्ततावाद्यानाही कळून येईल

कथावाङ्मय सहेतुक असावे कीं असू नये या मुद्यावर आपल्याकडे रणें सुरू आहेत नि:शस्त्र लोकाचीं युद्धें म्हणजे दिवाणी दावे. कलावादी लेखक आपल्या नाजूक शिराची काळजी न करता तावातावाने म्हणतात- कथनकला ही वसंतसेने-

मारखी आहे विशिष्ट हेतु ह्मणजे शुद्ध शकार ! या हेतूनें कलेचा कितीही पाठपुरावा केला म्हणून ती त्याला वश होणार आहे का? आनंदरूपी चारुदत्तालाच ती माळ घालणार. या चारुदत्ताची नीति ह्मणून एखादी पत्नी असली तरी तिची कुणीच पर्वा करणार नाहीं.

## हेतुप्राधान्यावर भर देऊं नका

प्रत्येक कथेंत विशिष्ट उपदेशप्रधान हेतु असलाच पाहिजे, या कित्येकांच्या अट्टहासामुळेच कलावाद्यांना असा आक्षेप घ्यायला जागा मिळते. प्रत्येक कथा-लेखकाला काहीतरी विशेष सांगायचें असतें व तेवढ्यासाठीं तो लेखणी हातात घेतो, असें अनेकांना वाटतें जणु काही हरिभाऊसारखे कथालेखक व गीतारहस्य लिहिणारे लोकमान्य यांची भूमिका एकच आहे ! तसें पाहिलें तर तरुण कथा-लेखकापाशीं सांगण्यासारखीं गोष्ट एकच असते तो ह्मणतो, ' मी लिहितो ते कृपा करून वाचा आणि मला बरें ह्मणा.' झाडाला प्रथमत पालवी येते त्या प्रमाणे कथालेखकाची कृति पहिल्यांदा रंजक गुणानीच फुलणे योग्य ! तिला हेतूचें फळ येऊच नये, असें मी ह्मणणार नाही किंबहुना योग्य वेळी ते येतेच. पण बिचाऱ्या तरुण लेखकावर पदोपदी समाजाला संदेश सांगण्याची सक्ति करणे गैर आहे. आकाश कोसळू लागले म्हणून फुलपाखरें का तें सावरणार आहेत ? मनुष्य गायला शिकतो तो गोड गळा असतो व गाण्यापासून आनंद मिळतो ह्मणून. गायला यायला लागल्यानंतर त्याने भक्तिप्रधान भजने म्हणावींत की प्रणयपूर्ण गजल गावेत ( कीं दोन्हींचाहि लाभ श्रोत्यांना द्यावा ) हा प्रश्न पुढचा आहे होतकरू कथालेखाचेंही तेच ध्येय असलें पाहिजे कलापूर्ण रीतीनें लिहि-ण्याचा अभ्यास प्रथम त्यानें करणे आवश्यक आहे सहृदयता, आयुष्यातील विविध अनुभव, समाजशास्त्राचा अभ्यास इत्यादिकांमुळे प्रौढपणीं त्याला महत्वाच्या विषयांवर कथा लेखन करतां येईल किंबहुना तसें केल्याशिवाय त्याला राहवणारच नाहीं. पण आरंभीं आरंभीं तरी कथेला विषय घेताना त्यानें हत्तीचा आकार निश्चित करायला गेलेल्या आंधळ्याची गोष्ट विसरू नये. निकट सामाजिक प्रश्न म्हणजे चक्रव्यूह. त्यांत मतामतांचा गलबला नेहमी चाललेला ! प्रौढ कुमारिकांना पाहून कुणी नि:श्वास सोडील तर कुणी नाक मुरडील. तरुणतरुणींतील प्रणयावर एक मोहकपणाचा मुलामा चढवितो, तर दुसरा त्याला काळा रंग फासून त्याचें विडंबन करतो असल्या वादग्रस्त सामाजिक प्रश्नाची अननुभवी तरुणानीं केलेली उथळ चर्चा सहसा हेतुपोषक अगर विचारप्रवर्तक होत नाहीं. वरेरकरा-

मारख्या अनुभविक लेखकांनासुद्धा या बाबतीत तोल संभाळण्याची कला साध्य झालेली दिसत नाहीं 'स्वैरसचार' या कथासंग्रहातील 'कलिकेचे अश्रु' अथवा 'माडाचे पोर' या गोष्टी हेतुयुक्त नाहींत असे नाहा. पण दुधात मिसळून जाऊन त्याची गोडी वाढविणाऱ्या साखरेप्रमाणे या गोष्टींतील हेतूंनी तिची रंजकता द्विगुणित केली आहे उलट 'आमचे मालक' 'अबला' 'चिडलेली गाय', 'स्वदेशी विमल' इत्यादि त्याच्या लघुकथात हेतूचे खडक व त्याच्या बाजूनें तुरळक दिसणारी कलेची हिरवळ असे ओबडधोबड दृश्य दिसतें मानवी जीवनाशी अगर मनोवृत्तीशीं ज्याचा निकट संबंध आहे असा हेतू शोधून काढणें व सोन्याच्या अगठींत चिमुकला हिऱ्याचा खडा बसवावा त्याप्रमाणे त्याची कलेशा सागड घालणे याला कल्पकता, सहृदयता, मार्मिकता, अभ्यासवृत्ति इत्यादि गुणाची आवश्यकता आहे

## एक हास्यास्पद मासला.

हेतु साधल्यामुळे रुक्ष व ओबडधोबड दिसणाऱ्या कलाकृति पाहिल्या कीं, कलावादी लेखकांना साहजिकच मूठभर मास येतें, विभावरीबाईनी 'नि.श्वास' सोडल्या पासून अनेकाना निरनिराळ्या प्रकारचे श्वास लागूं लागले आहेत, असें दिसतें कित्येकाना तर प्राणायामही करण्याची बुद्धि झाली असावी त्या बहुविध श्वासोच्छवासापैकीं परवाच प्रसिद्ध झालेला 'माझे उच्छ्वास' हा कथासंग्रह पहावा. 'नियमन' गोष्टीचा हेतु संततिनियमनाचे तत्त्वप्रतिपादन करण्याचा आहे, त्याकरिता लेखकानी स्वीकारलेला मार्ग मोठा मजेदार आहे यात शंका नाहीं. एका तरुण शेतकऱ्याच्या कलिगडीच्या वेलाला वीस वीस फळे लागतात, त्याचा अनुभविक बाप त्याला विचारतो 'धर्मा, तुला कलिगडाना भाव यायला पाहिजे कीं भाजीला घट्टे काढून विकायची आहेत तीं?' 'भाव तिथे देव' ही म्हण सुप्रसिद्धच आहे! अर्थात बाप मुलाला उपदेश करतो, 'प्रत्येक ताण्यावर आठ आठ फळें ठेव. बाकीचीं खुडून टाक.' हा अनुभव पटताच तो तरुण शेतकरी एका पदवीधराला म्हणता "पण दादा, माणसाच्या बाबतीत नाहीं का असा कांहीं उपाय? दादा, दर वर्षाला एक बाळ घरात नादत आहे. शेतकीला सध्या बरकत नाहीं. आता नको तीं मुलें असें म्हणायची वेळ आली आहे."

'एष धर्मः सनातनः' असा संततिनियमनाचा एखाद्या स्मृतीत उल्लेख नाह. म्हणून ह्याचा चालू पिढीनें विचार करूं नये, असें म्हणणारापैकी मी नाहीं.

कथालेखकांनी आजारी माणसाप्रमाणे विशिष्ट विषयाचे पथ्य पाळले पाहिजे, असे ही मला वाटत नाहीं. चातुर्मासात सोवळ्या माणसाना जसे कादे वर्ज्य, त्याप्रमाणे प्रेमविवाह, घटस्फोट वगैरे विषयावर कित्येकाचा बहिष्कार असतो, तर देवळावरून जाता जाता सुद्धा हात वर उचलून नमस्कार करावयाचा नाहीं अशा बाण्याचा कट्टर नास्तिकाप्रमाणे कित्येक साध्या कौटुबिक प्रेमळ गोष्टीकडे पाहत असतात. कथालेखकाची दृष्टि अशी संकुचित असणे इष्ट नाहीं. न्यायाधिशाप्रमाणें त्यानें प्रश्नाच्या सर्व बाजू पाहिल्या पाहिजेत निकाल देताना त्याची वैयक्तिक सहानुभूति दिसली म्हणून हरकत नाहीं उत्कट भावना व व्यापक सहानुभूति हे कोणत्याहि कलापूर्ण कथेचे पेरवच असतात असें म्हटले तरी चालेल.

## मांडणी कलासुंदर असली पाहिजे.

या तत्त्वाप्रमाणें कथेला कोणताही विषय चालतो हे उघड आहे. तो विषय कलासुदर पद्धतीने माडला मात्र पाहिजे. ‘कलिगडाचा वेल व संततिनियमन’ ही गोष्ट त्या दृष्टीनें हास्यास्पद वाटत नाहीं का? आयुष्यातले प्रसग कितीही लहान व सामान्य असेनात, कलावत कथालेखकाच्या दृष्टीने त्यातील हृदयस्पर्शित्व अचुक शोधून काढलें पाहिजे गृहीत विषयातील आकर्षता जाणणें व ती सुदर रीतीने व्यक्त करणे हे कथालेखकाचे मुख्य कार्य आहे. कलाहीन लेखकानें लिहिलेल्या महायुद्धावरील कादबरीपेक्षा कलावत लेखकानें लिहिलेल्या लहान मुलाच्या भाडणावरील लघुकथाच वाङ्मयात अमर होईल. प्रो फडके अगर अत्रे याच्यासारखे लेखक कलाकृतीचे कार्य उपदेश नाही असे म्हणतात. याचा अर्थ तिच्यात गर्भित असलेल्या तत्त्वाचा मोहक विकास करण्याची शक्ति लेखकाच्या अगी असली पाहिजे, एवढाच घ्यायचा. अत्र्यानी लिहिलेल्या बालकथात काहींच शिकवण नाहीं असें कोण म्हणेल? प्रो० फडक्याच्या कथासग्रहात ‘इदुताईच्या चातुर्मासापासून’ ‘जगातील पहिलें पाऊल’ या गोष्टीपर्यन्त अनेक हेतुप्रधान कथा आढळतील मात्र या उल्लेखिलेल्या दोन गोष्टींतच तुलना करावयाची असेल, तर भावना व सूचकता या कलागुणामुळे दुसरी पहिलीपेक्षा सरस वाटते. सूक्ष्म भावनाचा आविष्कार, विविध सौंदर्याचे दर्शन, परहृदयप्रवेशाचा आनंद इत्यादि कलागुणाना शोभणारी तत्त्वाची पार्श्वभूमि असली, तर अशा कथाचित्राला कोण नाक मुरडील? पण मार्गे महालाचा देखावा व पुढे लक्तरें नेसलेल्या भिकाऱ्याचा संसार असले विसंगत दृष्य पहायला नाटकगृहात फुकटे प्रेक्षकसुद्धा जाणार नाहींत

## तिरंगी सामना.

कथावाङ्मय, प्रणय व नीति या तिरंगी सामन्याचाही इथेंच विचार केलेला बरा प्रचलित कथावाङमयावर स्वैर प्रणयाच्या पुरस्काराचा व पर्यायानें नीतीच्या खुनाचा नुसता आरोपच आला आहे, असे नाहीं हा खटला सेशन कमिट झाला आहे, अशी कित्येकाची समजूत आहे. कित्येक प्रणयाला फाशीची शिक्षा होणार या आनदात गर्क आहेत. एखाद्या दारूबाजाने आईबापापासून बायकापोरांपर्यंत सर्वांना बडवून घरातून घालवून द्यावे, ह्याप्रमाणें शृगारानें वीररसापासून वत्सल-रसापर्यंत इतर सर्व रसाची गळचेपी करून त्याची कथामंदिराबाहेर हकालपट्टी केली आहे, अशीच या प्रणयविरोधी आक्षेपकाची समजून झालेली दिसते, पण मला वाटते, ही समजूत नाहीं, हा समजुतीचा घोटाळा आहे

कथावाङ्मय म्हणजे काही कार्तिकेयाचे देवालय नाहीं कीं तिथें स्त्रीला मज्जाव असावा ! मानवी जीवनात जे जें रम्य, मधुर, सुंदर व हृदयगम असेल, त्याचें कलापूर्ण चित्रण कथालेखकाने करायचे नाही तर तो हातात लेखणी घेईल तरी कशाला ? कालिदास, शूद्रक, बाण याचें मोठेपण प्रणयप्राचुर्याचें आक्षेपक सुद्धा मान्य करतील पण शाकुंतल, मृच्छकटिक अगर कादंबरी ह्या सुदर रेशमी वस्त्राचा प्रणयाचा रंग वैराग्याच्या रिठ्यानी धुवून काढावयाचा ह्मटलें, तर तें शक्य आहे का ? या रंगाच्या मोहकपणामुळेच त्या वस्त्राचे मूल्य कितीतरी पटीने वाढले आहे असें ह्मटलें तर मुळीच चूक होणार नाहीं. शिवाय रवीद्रानी शाकुतलातून जेवढा उदात्त अर्थ काढला आहे, तेवढा सध्याच्या प्रणयरम्य कथातूनही निघूं शकेल, पण सद्य कालीन कालिदासाच्या वांट्याला ते भाग्य यायला दहा वीस शतके तरी जावी लागतील.

## समाजाची ससासारखी धांव.

हरिभाऊंच्या पूर्वीच्या अद्भुतरम्य कथावाङ्मयांत प्रणय भरपूर आहे पण त्यातील नायक-नायिका पडली राजपुत्र व राजकन्या ! तेव्हा त्यांच्या प्रणयलीलांची कोण निदा करणार ? हरिभाऊनी कथावाङ्मयाला वास्तवाचें वळण लावून त्याच्या वर पाव शतक तरी निर्विवाद अधिराज्य गाजविलें त्याच्या सामाजिक कादंबऱ्या-तून सध्याचा प्रणय नाही हे खरें. पण तो असावा तरी कसा ? बारा चवदा वर्षाच्या आतच ज्या नायिकेचें लग्न व्हावयाचें, तिला प्रणयालाप बोलायला लावायचे तरी केव्हा ? ती बोबडें बोलत असताना तर नाहीं ? त्यावेळचे

पुरुषसमाज व स्त्रीसमाजही अगदी निर्भेळ होते 'बायकात पुरुष लाबोडा' हे त्या काळचे मुख्य सामाजिक सूत्र त्या सूत्राच्या उत्तरार्धाची भीति पूर्वकाली पुरुषाना जितकी वाटत असे, तितकी आता वाटणार नाही. नादिरशहानें दिल्लीवर स्वारी केली, तेव्हा तिथे जेवढी धामधूम उडाली नसेल, तेवढी बायकाच्या बैठकीत एखादा पुरुष आल्यास व्हायची, अशी हरिभाऊंच्या काळची समाजस्थिति होती. दारात परका पुरुष आला की पत्नीने मागचें दार गाठलेंच म्हणून समजावे. आलेल्या पाहुण्याला घरधनीण लपडावाने आपल्याशी खेळत आहे की काय असा संशय सुद्धा यायचा ! प्रौढविवाहाचा पुरस्कार करण्याच्या त्या काळात प्रणयाचीं चित्रें रेखाटणें, म्हणजे डोमिनियन स्टेटस मिळण्याच्या आधीच साम्राज्यविस्ताराच्या गप्पा झोडण्यासारखे झालें असतें हरिभाऊंचा काळ व आजचा काळ यात अकदृष्ट्या केवळ वीस पचवीस वर्षाचें अतर पडलें असेल, पण सामाजिक स्थित्यंतर मात्र विलक्षण झालें आहे. काल कासवाच्या गतीने चालला, पण समाज सशाप्रमाणें धावत सुटला असें म्हणावे हवें तर ! याचा प्रत्यक्ष पुरावाच पहायचा असला तर वामनराव जोशी याची हरिभाऊंच्या काळातील 'रागिणी' व आजची 'इन्दु काळे व सरला भोळे' या दोन कादबऱ्याची तुलना करून पहावी. वामनरावजी समतोल वृत्तीचे व अध्यापनासारख्या सात्विक व्यवसायाला त्यागपूर्वक वाहून घेतलेले नीतिशास्त्रज्ञ आहेत. तेव्हा प्रणयाचा पावा वाजवीत बसण्याचा स्वच्छंदीपणा कुणीही त्याच्या गळी बाधणार नाही. पण कालमहात्म्य शनिमहात्म्यापेक्षाही मोठे आहे ! 'रागिणी' व 'उत्तरा' याच्या लग्नाची त्याना वीस वर्षापूर्वी जितकी काळजी वहावी लागली त्याच्या शतांश देखील सरला व इंदु याची करावी लागली नाहीं. मिश्रविवाहासारखा प्रश्न सुद्धा कसा चुटकीसारखा सुटला. या कादंबरीत पूर्वीच्या विवाहनाटकात वडील मंडळीकडे सौभद्रातील बळिरामाची भूमिका असे. ती सोडून नाटकाच्या शेवटी तेवढ यायचें व "नांदा सौख्यभरें । शोभो त्वत्कुल सत्कुमरें" असा गर्गाप्रमाणें आशीर्वाद द्यायचा, एवढेच काम यापुढे वडील मंडळीकडे राहणार. नवऱ्याचे नाव घेताना मागील पिढीच्या बायकोची लाजून मुरकुंडी वळत असे. पण पुढील पिढीला ती एकेरी नावाने त्याला हाक मारूं लागेल !

## नवलाई प्रणयास कारण.

गेल्या तपांत मराठी कथावाङ्मयात प्रणयाला जे प्रमुख स्थान मिळालें, त्याचीं कारणे बव्हंशीं सामाजिकच आहेत या कारणात वाङ्मयिक थोडीं या

काळात स्त्रीशिक्षणाचा वाढता प्रसार, प्रौढविवाहाची प्रथा, स्त्रीपुरुषाचे संमेलन इत्यादि गोष्टी नव्यानेच समाजाला अनुभवायला मिळाल्या नव्याची नवलाई कुणाला वाटत नाही ? लहान मूल नव्या खेळण्याचे जेवढे प्रदर्शन करील तेवढेच म्हातारे आजोबा नव्या पागोट्याचे करतील. गेल्यादशकातील मराठीतील बहुतेक प्रणयकथात्मक वाङ्मय या नवलाईच्या पोटी जन्माला आल्यामुळे त्यात वास्तवापेक्षा कृत्रिम रम्यतेचाच भाग जास्ती आहे हे सहज दिसून येईल

या प्रणयकथाच्या चित्रणात नेहमी निर्दोष कलादृष्टीच आढळते असे मात्र नाही कथेतील भूमिकाच्या अंतरंगात शिरण्यापेक्षा त्याच्या बहिरंगावरच काही लेखक व पुष्कळ वाचक खूष असतात कथातील स्त्रीपुरुषाची सूक्ष्म वर्णने मनोविकास चित्रित करण्याच्या दृष्टीने केलेली क्वचितच आढळतील उलट वाचकाच्या सुप्त लोलुपतेला जागृत करणारी शब्दचित्रेच काढण्याची हौस थोड्याका होईना लेखकाच्या अगी दिसून येते उन्मादक वर्णनाचा उपयोग मादक पेयाप्रमाणे होतो, हे जाणून राजाला फसविणाऱ्या जुन्या काळच्या प्रधानाप्रमाणे त्याची पेरणी करण्याची हौसही लोकप्रियतेपलीकडे ध्येय नसलेल्या लेखकानी दाखवावी यात नवल कसले ?

## हीं प्रणयस्वप्नें टिकणार नाहींत.

परतु प्रौढविवाहाच्या रूढीमुळे उत्पन्न होणार ही प्रणयाची मधुर स्वप्ने फार दिवस टिकतील असें चिन्ह दिसत नाही. लग्नात हृदयाचा विचार करावा असे आपण ह्मणतो पण त्या हृदयालाही क्रूरपणाने खेळविणारी आर्थिक परिस्थिति समाजापुढे नवे नवे प्रश्न उपस्थित करीत आहे दरिद्री बहुजनसमाजाला संतति-नियमन हे खूळ आहे, असे म्हणणें दिवसेदिवस कठिण होत आहे घटस्फोटाचा प्रश्न तर समाजाच्या कानीं कपाळी आक्रदन करीत आहे. जुन्या वैवाहिक नीतीचे नियम यावच्चद्रदिवाकरौ चालावयाचे आहत, असें मानणाराना हे आक्रदन अशुभ रडण्यासारखे वाटत असेल. पहिल्यादा आगगाडी आली तेव्हा बैलगाडी हाकणाराना ती लोखंडी रुळावरून अचुक कशी चालणार, याचेच कोडे पडलें विमान आकाशात उडाले, तेव्हा आगगाडीवाले असेच आश्चर्यचकित झाले असतील. आकाशात रूळ नाहीत, काही नाहीत. वर गेलेल्या विमानाची घरघर त्यांना अतकाळची वाटली तर ह्यात हंसण्यासारखे काय आहे ? पण आता विमाने पाखराप्रमाणे भुर्रकन आकाशात जातात आणि खाली येतात विमानाचे अपघात

फार होत असले, तर ते कमी करण्याचा प्रयत्न करा पण अपघात होतात म्हणून विमानें सोडून आगगाड्याकडे व त्या टाकून बैलगाड्याकडे पुढें गेलेला काळ परत येणे शक्य नाहीं

## पुराणनीतिवाद्यांना इषारा

मराठी कथावाङ्मयाची बोट ज्या पुराणनीतिवादी लोकांना फार लागली आहे, त्यानीं जरा शातपणें विचार केल्यास हा बोटीचा दोष नव्हे, हे त्याच्या लक्षात येईल खालच्या सामाजिक जीवनाच्या सागरावर वादळ सुरू झाले आहे, याला ती बिचारी काय करणार? प्रक्षुब्ध भावनाच्या लाटावर ती चढली अगर नवविचारांच्या वाऱ्याने ती हलली, तर यात दोष कोणाचा? ज्या नियमावर समाज पूर्वी अवलंबून राहिला होता, ते तरी स्थिर राहिले आहेत का? परलोकाची कल्पनाच परलोकाला जाण्याच्या मार्गात आहे. जातिभेदाची दगडी भित शिक्षणाच्या धरणीकंपानें खिळखिळी होऊन कोसळून पडणार अशी स्पष्ट चिन्हें दिसत आहेत. स्त्रिया पुरुषाच्या चरणाच्या दासी राहणार नाहींत त्या मैत्रिणी होत आहेत नव्या सृष्टीला जन्म देणाऱ्या या प्रलयाचे पाणी, टिटवीची गोष्ट डोळ्यापुढे ठेवून, जे आपल्या द्रोणानीं उपसून टाकणार असतील, त्याच्या प्रयत्नाची धन्य आहे. त्यानी एवढाच विचार करावा—लहान मूलसुद्धा दिव्याच्या चिमणीला हात लावून तो भाजल्याशिवाय सावध होत नाहीं. मग सुखाच्या मागे लागलेल्या समाजाची गोष्ट कशाला हवी?

## मराठी कथावाङ्मयाचें दारिद्र्य.

नीतीचा खून करून स्वैर प्रणयाला राज्यपदावर बसविण्याचा सध्याच्या मराठी कथालेखकानीं कट केलेला नाहीं, एवढें यावरून दिसून येईल पण त्यावरून सध्याच्या मराठी कथालेखकाची वाङ्मयनिर्मिति स्पृहणीय आहे असे मात्र नाहीं कथालेखनाच्या स्फूर्तीचें मूळ प्रकाशकाकडून येणाऱ्या मनिऑर्डरीपासून मासिकांत छापून येणाऱ्या नावापर्यंत कुठेही असो, तो प्रश्न महत्वाचा नाहीं विपुलता, वैचित्र्य व उच्च दर्जाचे कलागुण या दृष्टींनीं मराठी कथा हिंदी, बंगाली वगैरे आपल्या कथाभगिनीपेक्षा मागे रेंगाळत राहिली आहे, हें काहीं खोटें नाही मर्यादित ग्राहकवर्ग आणि पोटासाठीं कराव्या लागणाऱ्या व्यवसायामुळे होणारी कुचंबणा या गोष्टी मराठी लेखकाचे पाय मागें ओढीत असतील. पण पोटात पाय

अडकवून घेऊनही धावण्याची शर्यत असतेच कीं नाही ? अशा वेळीं न पडतां, न धडपडता धावण्यातच कौशल्य व्यक्त होत असते रवींद्र, शरच्चंद्र, मुनशी प्रेमचंद इत्यादि साहित्यसेवकाप्रमाणे विपुल नसलें, तरी व्यक्तिवैशिष्ट्याच्या व उदात्त आनंदनिर्मितीच्या दृष्टीने त्याची बरोबरी करणारें वाङ्मय निर्मिणारे कितीसे लेखक आपल्याकडे सापडतील ?

## मागणीप्रमाणें पुरवठा.

तुलनात्मक दृष्टीने मराठी कथावाङ्मय मागासलेलें दिसते याचे खापर एकट्या लेखकाच्या माथी, टीकाकारानी ती शाबूत ठेविली असली तर, फोडणें मात्र चुकीचे होईल या प्राप्तीचे आणखी तिघे वाटेकरी आहेत, प्रकाशक, वाचक व टीकाकार कथाप्रधान मासिक म्हणजे मुलगाच अशी अनेक संपादकाची समजूत झालेली दिसते पहिल्यादा थोडासा खर्च केला कीं, पुढे ते आपोआप मिळविते होत जाते अशी त्याची समजूत असावी जन्माला आलेल्या प्राण्याला पोटात काही ना काहीं जसे भरावे लागते, त्याप्रमाणे अशा मासिकानाही आपलीं पाने कशीं तरी भरावीं लागतात मुळातच लढवय्या शिपायाची तूट ! मग या बाजारबुणग्याच्या खाद्यावर बंदुका आणि करा त्याना मारून मुटकून शिपाई ! प्रेमाने प्रेम वाढते, त्याप्रमाणे शृंखलेने शृंखला वाढते. पण सद्य स्थितींत नोकरी व तिच्यामुळे येणारी बायको-या दोन्ही शृंखला पायात नसल्यामुळे इकडे तिकडे भटकणारे अनेक तरुण अशा लेखकवर्गांत सामील होतात त्यानी तसे होऊं नये तर काय करावें ? कारण ते फक्त लिहायवाचायलाच शिकलेले असतात मासिकाना गरज असते गरजवंताची स्थिति आपल्या मराठी म्हणीत सांगितल्यापेक्षा निराळी कुठून असणार ? असला पुरवठ्याचा माल कथामासिकाना मिळेल तसा पदरात पाडून घ्यावा लागतो

## गाजरपारखी प्रकाशक.

ही झाली हौशी लेखकांची स्थिति ! त्याच्यांत उत्साह भरपूर असतो, पण त्याचा उपयोग मात्र व्हावा तितका होत नाही खाजगी रीतीने बड्या भाईकडून त्याना प्रोत्साहन अगर सूचना मिळण्याचे प्रसग क्वचितच यायचे जगलातल्या प्रकाशाने दूरचा डोंगर पाहून मिळेल त्या वाटेनें तो गाठण्याचा प्रयत्न करावा, तसे ह्याचे प्रयत्न चाललेले असतात. उलट कीर्तिशैल थोडा फार चढून गेलेले लोक खरोखरीच चढून जातात. कित्येकाना कीर्तिपर्वतावरील वरची थंड हवा बाधण्याची भीति असते म्हणून ते मध्येच झोपतात त्या झोपेत ते काहीं बडबडले,

तर तीच त्याची वाङ्मयसेवा मानण्यात येते कित्येक मोठ्या घाईने वरवर धावत असतात जणु काही कोंडाण्यावर चढणारा तानाजीच. पण त्या घाईत मधेच त्यांनी पायथ्याकडे तोंड केलेले असते त्यामुळे होते काय, कीं शिखराला पोचण्याच्या वेळीच ते अचुक पायथा गाठतात वाङ्मयाच्या बाजारात पारख करायला बसलेल्या प्रकाशकांना माणिके व गाजरे यातील भेद कळेल तर हा अनर्थ अशत तरी टळेल पण दोन्ही तांबडी दिसतात, तव्हा त्यांनी तरी काय करावे ?

## प्रकाशकांचें कर्तव्य.

मराठी कथेला इतर भाषात मानाचे स्थान मिळावयाचे असेल, तर प्रकाशकांनी वाचकांच्या पदरात टाकावयाचे साहित्य खानावळीतील नसून घरातले असेल अशी दक्षता घेतली पाहिजे आपल्या प्रत्येक अंकात एक तरी उच्च दर्जाची गोष्ट असावी, म्हणून किती संपादक धडपड ( या धडपडीला पाठराखीण म्हणून मनिऑर्डर पाठविणे जरूर आहे ) करतात ? घरातील वडील माणसानाच शिस्त नसली म्हणजे मुलें जशी फाजील अवखळ होतात त्याप्रमाणे श्रेष्ठ लेखकाच्या प्रसिद्ध होणाऱ्या कथाच दुय्यम दर्जाच्या असल्या, कीं वाचकाची व होतकरू लेखकाची अभिरुचि संकुचित बनते. कादंबरी व लघुकथा या दोन्ही क्षेत्रात विषय, कथनकौशल्य, रचनापद्धति, भाषाशैली इत्यादि विविध उपांगात आदर्श असलेल्या अनेक कादंबऱ्या व शेंकडो लघुकथा जगाच्या वाङ्मयात मिळतील निव्वळ मराठी वाचकाना त्यांचे ज्ञान नसल्यामुळे वाल्मीकीच्या आश्रमातील बटूंना घोड्याविषयीं जितकी माहिती होती, तितकीच या क्षेत्रातील सर्वांगसुंदर कलाकृतीविषयी त्याना असते वाचकाची अभिरुचि सुसंस्कृत झाली कीं लेखकवर्गाला तिला संतुष्ट ठेवण्याइतके परिश्रम करावे लागतीलच, ह्या दृष्टीनें मी कथाप्रकाशकांना नम्रतापूर्वक खालील सूचना करतो —

## प्रकाशकांना सूचना.

(१) नियतकालिकातील ४–५ लघुकथापैकीं एक उत्कृष्ट रूपांतरित गोष्ट असावी. स्वदेशातील अगर जगातील वाङ्मयात तिचे स्थान उच्च का हे दाखविणारें विवेचनही तिच्याच खाली द्यावे.

(२) आपला वार्षिक आराखडा आधीं आखून चांगल्या कथालेखकाकडून वरच्या दर्जाच्या लघुकथा क्रमश लिहवून घ्याव्यात प्रत्येक अंकात अशी एक गोष्ट

अमली व तिचे पुनर्मुद्रण त्याच वेळी केले, तर वर्षाकाठी अशा बारा चांगल्या गोष्टींचे एक पुस्तक स्वल्प किमतींत त्यांना वाचकांना देता येईल उघड्यावर टाकल्यामुळें केशराचा वास उडून जावा, त्याप्रमाणे मासिकाच्या जुन्या अंकात पडल्यामुळे अनेक चांगल्या गोष्टी असून नसल्यासारख्या होतात प्रत्येक मासिकाला वर्षाकाठी असा एक कथासंग्रह प्रसिद्ध करता आला, तरी देखील ही उधळपट्टी थांबेल

(३) लघुकथाइतकेच त्यांचे रसग्रहणही वाचकापुढे येणे अगत्य आहे एखादे गाव पहायला गेल्यानंतर माहीतगार मनुष्य बरोबर असला, तर श्रम वाचून आनंद द्विगुणित होतो आपल्याकडे गोष्टी वाचल्या जातात, त्या केवळ करमणुकी करिता ! नायकाचे लग्न झाले कीं प्रेमाच्या तांबड्या रंगानेंच आपली वस्त्रे रंगवत तो संन्यासी झाला, नायिकेने विष खाऊन जीव दिला कीं विहिरीत उडी टाकून तो दिला, ही उत्कंठा तृप्त व्हावी ह्मणूनच हातीं घेतलेली लघुकथा पुरी करणारे वाचक पुष्कळ असतात. केवळ इष्ट गावी जाण्याकरिता आगगाडीत बसून मिटलेल्या डोळ्यांनी प्रवास करणारे हरीचे लाल हरहमेश दिसतातच की नाही ? त्यांची गाडी नंदनवनातून गेली, तरी त्यांना त्याचा काय उपयोग ? वरील प्रकारच्या वाचकांची स्थितिही अशीच होते. लघुकथांच्या रसग्रहणाची प्रथा पडल्यास केवळ कथानकप्रधान व म्हणून कृत्रिम गोष्टी वाचण्याला लालचावलेल्या या वाचकवर्गाला नवीन दृष्टि येईल व पर्यायाने कथालेखकांना नवीन सृष्टि निर्माण करावी लागेल

(४) नियतकालिकांतून क्रमश येणारी कादंबरी हल्ली क्वचितच दिसते हार्डी, टर्जानिव्ह, गॉर्की, अपटन सिंक्लेअर, स्टीफेन झ्वीग यांच्यासारख्या पाश्चात्य कलावंत लेखकांच्या कृतींची रूपांतरे या पद्धतीने वाचकांना देणे शक्य आहे जो जो उंच जावे तो तो दृष्टीच्या टापूंत येणाऱ्या क्षितिजाचा विस्तार वाढतो पण उंच जायला काही तरी साधन नको का ? जगन्मान्य कलाकृतींशी परिचय हे असे सर्वोत्कृष्ट साधन आहे द्राक्षांची चव कळल्यानंतर करवंदेंच गोळा करीत कोण बसेल ?

## टीकाकारांचे चार वर्ग

प्रकाशकाच्या बरोबरीनें टीकाकारानाही या प्रगतीला हातभार लावता येईल. मराठींत कथावाङ्मयाचे मार्मिक व विस्तृत परीक्षण कधीच होत नाहीं असें नाहीं

पण बहुतेक टीका व अभिप्राय ' बक-शुक-पिक-काक ' या चारीपैकी कुठल्यातरी एका वर्गात पडतात. बकपद्धतीचा अभिप्राय ' ठीक आहे, पण सुधारणेला बरीच जागा आहे' या ठशाचा असतो शुकपद्धतत बडबड फार! पण सारे नुसते पाठातर–लाबलचक अवतरणे, बडघा ग्रथकाराचे हवाले, पुस्तकातील उतारे इत्यादिकातच असल्या अभिप्रायाची जागा खलास होते पिकपद्धति लेखकाना फार फार आवडते. पंचमात स्तुतीचे गोड गोड शब्द ऐकू येऊ लागले, तर कानात बोटे कोण घालून घेईल? काकपद्धतीत टोच मारणे हेच मुख्य ध्येय असते लेखकाचें गणगोत्र आपल्याशी जुळते नसले की व्रण नसला तरी तो आहे असे मानण्याकडे या पद्धतीचे लोक झुकतात.

## वृत्तपत्रांतील पांचट परीक्षणें

वर्तमानपत्रे व मासिके यातून पूर्वीपेक्षा ग्रंथपरिचय व परीक्षण याला अधिक जागा मिळत आहे, या बद्दल त्याचे अभिनंदन कुणीही करील. मात्र या जागेचा सदुपयोग होतो की नाही, इकडे जरूर तेवढे लक्ष दुर्दैवाने असत नाहीं. अफाट पण ओसाड माळरानापेक्षा छोटी बागच अधिक बरी नाहीं का? पाच पाच रकाने परीक्षणाच्या नावाखालीं द्यायचे. पण त्यात पुस्तकाचा वेडावाकडा उथळ सारांश अगर उथळ चर्चा याच्यापलीकडे काही असावयाचे नाही यात अर्थ काय? परीक्षणे कसली? वाळवंटेच म्हणायचीं ती! कित्येक ठिकाण अभिप्रायाचे साचेही तयार असतात ' जिव्हाळा ' ' कृत्रिम ', ' भावना ', ' तंत्र ' ' टेक्निक ' ' उत्कृष्ट ', ' सरस ', ' अस्वाभाविक ', इत्यादि शब्दाची उलटसुलट वाक्ये बनविली की झाले ते अभिप्राय तयार! अशा अभिप्रायाचे देशी यंत्र लवकरच निघेल तर अनेकाचे श्रम वाचतील. टीका ही सुद्धा एक कला आहे, या जाणिवेने कथावाङ्मयावर लिहिणारे एकंदरीत थोडेच!

## टीका-व्यासंग लेखकांना उपकारक.

नियतकालिकात प्रवेश मिळण्याच्या दृष्टीने लघुकथा व कविता याच्यापेक्षा टीकेचा मार्ग अधिक खडकाळ असतो. टीकाकाराला विस्तृत वाचन हवे लिहिण्यापुढे वाचायला कितीशा लेखकाना वेळ मिळतो? लेकुरवाळया स्त्रीला सार्वजनिक कार्यात भाग घेणे कसे शक्य आहे? इतके करून टीकाकाराला कलाकृति निर्माण करणाऱ्या लेखकाइतका मान मिळतो असेंहि नाहीं. यामुळें होतकरू लेखकापैकी हा कष्टाचा मार्ग चोखाळणारीं माणसें फार थोडीं दिसतात. टीकेच्या

निमित्तानें करावा लागणारा व्यासंग स्वतंत्र वाङ्मयनिर्मितीलाही उपकारक होतो, ही जाणीव उदयोन्मुख लेखकांना झाली, तर सध्या आढळणारें चांगल्या टीकांचें दुर्भिक्ष नाहीसें होईल. एवढेंच नव्हे तर लेखक-वाचकांच्या अभिरुचीवरही त्याचा इष्ट परिणाम होईल.

## टीकाकारांचें कर्तव्य.

कथावाङ्मयाच्या टीकाकारांत अद्यापिही वैयक्तिक आवड फार दिसून येते. आंब्यासारखें रसाळ फळ न खाणारेहि लोक जगांत असायचेच! पण वाङ्मय परीक्षणांत असली वैयक्तिक आवडनिवड दुय्यम दर्जाची आहे. प्रणयविन्मुख समाजरचनेमुळे असेल कदाचित्-पण अजून अनेकांना चुंबनान्त गोष्टी आवडतात. कलादृष्ट्या अशा उथळ गोष्टींना काय किंमत आहे? हळव्या मनोवृत्तीमुळे कित्येकांच्यावर गोष्टींतल्या मरणाचा परिणाम फार होतो. लोकप्रियतेची ही नस कळली कीं, रक्ताला चटावलेल्या वाघाप्रमाणें कथालेखक प्रत्येक गोष्टींत कुठल्या तरी पात्रावर झडप घालतोच घालतो. मानसकन्येचा अगर मानसपुत्राचा खून करतांना त्याच्या डोळ्यांत आनंदाश्रु येऊं लागतात. अशा कलाहीन गोष्टींना आळा घालण्याचें कार्य टीकाकारांचें नाहीं का? पण त्यासाठीं त्यानें वैयक्तिक आवडीची भूमिका सोडून खूप वर गेलें पाहिजे. कथालेखकांत काय नाहीं यापेक्षां काय आहे व तें कसें आहे, किंबहुना तें कसें असतें तर अधिक सुंदर दिसलें असतें, हे सांगण्याची जबाबदारी टीकाकारावरच पडते. गार्ड झोंपी गेला कीं आगगाडीला अपघात होतात, हे काय नव्यानें सांगायला पाहिजे?

दिवसेंदिवस मराठी कथावाङ्मयाला वाढता वाचकवर्ग मिळत आहे, ही आनंदाची गोष्ट आहे. किती वाचक म्हणजे एक ग्राहक हे कोष्टक महत्वाचें असलें तरी त्यापेक्षांही महत्वाची एक गोष्ट आहे. ती म्हणजे वाचकांचा लेखकावर होणारा परिणाम. पुष्कळांची समजूत अशी असते कीं, "लेखक आपल्या स्फूर्तीनें लिहीत असतो. त्याच्यावर वाचकांचा काय परिणाम होणार! नदीच्या तीरावरील वृक्षवेली तिचा वेग वाढवूं शकत नाहींत अगर तिचें गढूळ झालेलें पाणी स्वच्छही करीत नाहींत. बिचारे वाचकही तसेच असतात. लेखकानीं लिहिलेलें वाचायचें एवढेंच त्यांचें काम." पण वस्तुस्थिति अशी नाहीं. नाटक बघणारा प्रेक्षकवर्ग मूक असतो हे खरें, पण त्याच्या चेहऱ्यावरील पालट, प्रोत्साहन, नाखुषी या सर्वांचा परिणाम नटाच्या अभिनयावर होतोच कीं नाहीं? किंबहुना जे भाग प्रेक्षकांना विशेष आवडतात तशाच प्रकारचें लिखाण अधिक करण्याकडे नाटककाराचाही कल होतो.

## वाचकवर्गाची अभिरुचि.

कथावाङ्मयाचा वाचकवर्ग प्रेक्षकाप्रमाणे एकत्रित होऊन आपले मत व्यक्त करू शकत नाही. भूमिभाग नदीच्या प्रवाहाला जसे वळण देतो, त्याप्रमाणे त्याची आवड नावड लेखकावर परिणाम केल्याशिवाय राहत नाही. कथा लिहिताना लेखकाची लागणारी समाधि सविकल्प असो वा निर्विकल्प असो, आपली कृति प्रसिद्ध झाल्यावर तिला जलसमाधि मिळू नये अशाच त्याची इच्छा असते. एखादी गोष्ट आवडते असे वाटले की, तिचाच पुरवठा करण्याकडे लेखकाचा कल होतो. गेल्या तपात कापडात खादी व वाङमयात प्रणय या परस्परविरोधी गोष्टींची जी निपज झाली, ती 'मागणी-पुरवठा न्यायाला' वरूनच नाही का? समाजाच्या हृदयाशी खेळणाऱ्या कलावंतानी केवळ धंदेवाईक दृष्टीने लिहू नये हे खरे! पण कुठेही झाले तरी लोकगंगेच्या प्रवाहात वाहून जाणारे लोकच अधिक असायचे! तिला आपल्यामागून पाताळातसुद्धा नेणारा भगीरथ क्वचितच आढळतो.

## विषवृक्षांना पाणी, कल्पवृक्ष सुकले.

लेखकवर्ग अशा रीतीने कळत न कळत वाचकाच्या मुठीत असतो. पण, आपल्या हातातील जादूच्या दिव्याचा अल्लादिनाने जसा उपयोग करून घेतला तसा आमच्या वाचकांना आपल्या सत्तेचा सदुपयोग अजून काही करून घेता येत नाही. अश्लील, हीन दर्जाचे, ध्येयशून्य अगर कलाहीन कथावाङ्मय जगते कसे? वाचकवर्ग त्याला जीवन पुरवीत असतो. ज्या डबक्यात हे विषारी मासे जगू शकतात, तीं आटविणे वाचकवर्गाला काही कठीण नाही. वेळ घालविण्याचें साधन अगर मनाला हुषारी आणणारा चहा म्हणून जे कथावाङ्मय वाचीत असतील, त्याची गोष्ट निराळी. पण कला, तंत्र, समाजसुधारणा, व्यक्तिविकास इत्यादि प्रश्नविषयी आस्थेने विचार करणाऱ्या वाचकवर्गाने केवळ दोन गोष्टी मनावर घेतल्या तरी कथावाङ्मयाच्या प्रगतीला हातभार लावल्याचे श्रेय त्याला निःसंशय मिळेल. पहिली गोष्ट आपली आवड नावड निःसंदिग्धपणे व्यक्त करणे, वाचकवर्ग घरी काय म्हणतो, हे लेखकाला कळणे शक्य नाही. अर्थात् भाषण व लेखन या द्वारानेच त्याचे मत व्यक्त व्हावयाला हवे. दुसरी गोष्ट खऱ्या उच्च दर्जाच्या वाङ्मयाचा सक्रिय आदर करणे. आज बाजारात जाऊन पाहिले, तर सात्विक अगर कलासंपन्न साहित्यापेक्षा राजस व भडक वाङ्मयच अधिक खपते. पूर्ण दारूबंदी प्रमाणे अशा वाङमयाचे निर्मूलन अशक्य कोटीतलें असेल पण त्याची वाढ

खुंटविणें सुसंस्कृत अभिरुचीच्या वाचकांच्या हातात नाहीं काय ? असले वाचक वाचनालयातून पुस्तके आणतात, वाचतात आणि चर्चा करतात त्यामुळे प्रत्यक्ष व्यवहारात विषवृक्षाना भरपूर पाणी मिळते आणि कल्पवृक्ष सुकून जातात मध्याचा काळ लोकशाहीचा आहे पण लोकाना आपल्या हक्काची जाणीव व त्याचा उपयोग र ावी शक्ति असल्यावाचून त्याचा काय उपयोग ?

## लेखकाला आत्मतत्त्वांची जाणीव हवी

प्रकाशक, टीकाकार व वाचक याना कथावाङ्मयाचा रथ वैभवशिखराच्या ागाकडे नेण्याकरिता सद्य स्थितीत कसा हातभार लावता येईल हे त्रोटकपणे पाहिले. त्याचा अर्थ लेखकावरली जबाबदारी मी कमी करीत आहे असा मात्र नाहीं अपत्य सगोपनाची जबाबदारी जशी सर्वात मातेवरच अधिक त्याप्रमाणे उदात्त वाङ्मयाची निर्मिति होणे न होणें बव्हंशी लेखकवर्गाच्या मनोवृत्तीवरच अवलंबून आहे लेखकाचे हृदय मोठे असले म्हणून त्याला पोट नसते असे नाही. व त्याचे मन आकाशात भराऱ्या मारीत असले तरी त्याच्या पायाना पृथ्वी सोडता येत नाही देशकाल, परिस्थिति, ज्याची सेवा करावयाची तो वाचक वर्ग ही सर्व बंधने कलावंतालाही असतातच पण या बंधनातूनही वर जाणें खऱ्या कलावंताला शक्य असतें. सौंदर्य, दिव्यता आणि सत्य याच्याकडे ओढ घेणाऱ्या त्याच्या आत्म्याला तुरुंगाच्या भिती आडवीत नाहींत आणि राजपाश बद्ध करीत नाहीत दुर्दैवाने लेखकाला या आत्मतत्वाची स्पष्ट जाणीव नसली, म्हणजे कारंजात कोंडून घेऊन आणि सुर्यकिरणात क्षणभर नाचून चिखल करणाऱ्या प्राण्याप्रमाणे त्याच्या लिखाणाची स्थिति होते. हेच पाणी सूर्यकिरणाचा दाह सहन करून वर जाऊ दे योग्य काली उज्वल विद्युत्प्रकाशात आणि गंभीर मेघगर्जनेत तें प्राणिमात्राचे पोषण करण्यासाठीं अवतार घेतेच घेतें

## कथावाङ्मयाची परिणामक्षमता.

लेखनकला ही इतरकलाची बहीण खरी पण त्या मुक्या तर ही बोलकी. इतर कलांची सौंदर्यशक्ति हिच्यात असतेच; पण या सौंदर्याला बोलता येत असल्यामुळें तें विलक्षण परिणाम करू शकतें. कलेच्या नांवाखालीं ज्याना आपल्या उथळ अगर विलासी मनांचीं प्रतिबिंबेच रेखाटायची असतात, त्यानीं वाङ्मयाचा समाजावर काडीमात्रहि परिणाम होत नाही असे म्हणावे पण राजाच्या काय अगर रूढीच्या काय दोन्ही सिंहासनाना मोठ्या तोफापेक्षाही लेखकाच्या लेखण्याची

भीति अधिक वाटते त्यातही कथालेखकासारख्या प्रतिसृष्टि निर्माण करणाऱ्या कलावंताचें भय तर अधिक ! संजीवनी मंत्र अगर हालाहल विष याच्याप्रमाणें कथावाङ्मयाचा क्षणार्धात दिसणारा परिणाम समाजावर होत नसेल. पण समाजाच्या भावनाशी त्याचा नित्य संबध येत असल्यामुळें कालावधीने का होईना तो परिणाम जाणवतोच

## कथालेखनाचा विजय

आपल्यातील या शक्तीचा विचारपूर्वक उपयोग करण्याकडे सध्याच्या प्रमुख लेखकाचें लक्ष आहे असें म्हणवत नाहीं गेल्या दशकातील कथावाङमयात प्रणयाला प्रामुख्य मिळण्याची कारणें सामाजिक व आर्थिक असलो, तरी प्रणयाविषयी उत्पन्न झालेल्या या आवडीचा आमच्या कथालेखकानी चतुरपणानें उपयोग करून घेतला नाही. कलेचें मुख्य कार्य सौंदर्यदर्शन खरें पण तें सौंदर्य उदात्त असायला नको का ? वाचकात सर्व प्रकारच्या भावना सुप्तस्थितीत असतात त्यातील उदात्त भावनाचा परिपोष करण्याच्या कौशल्यालाच कलाविलास ह्मणता येईल रंजकता ह्मणजे मादकता नव्हे भोगलोलुप मनाला विलासी शब्दचित्रे वाचून येणारा कैफ आणि ललित कलेपासून होणारा आनंद यात काहींच भेद नाहीं, असें कोण म्हणेल ? प्रणयकथा झाली तरी ती मानवी आयुष्यातील एका भागाचा इतिहासच नव्हे का ? या इतिहासाला सत्याचे अधिष्ठान अवश्य हवें या सत्याचें सोने सर्व सामान्य मनुष्याच्या अनुभवावर घासल्यानतर बावनकशी ठरावें, हाच कथालेखकाचा सर्वांत मोठा विजय होय.

## आतां कल्पनारम्यता पुरे झाली.

पण मोठ्या अगर लहान प्रणयकथा घेतल्या काय अथवा सर्रास आढळणाऱ्या करुण कथा घेतल्या काय, हें आवश्यक सत्य आमच्या वाङ्मयात अजून आढळावे तसें आढळत नाहीं आमच्या प्रणयकथातला रग परदेशी असल्यामुळेच की काय अगदी पक्का असतो ! प्रथमदर्शनी प्रेम, विरहाचे निःश्वास, स्पर्शसुखाची धडपड, प्रणयपूर्तीला येणारे अडथळे, सारेंच जवळ जवळ ठरलेलें व थोडें फार कृत्रिम ! मराठी नाट्यवाङ्मयांतली कल्पनारम्यता हरिभाऊनंतरच्या कथावाङ्मयात शिरली असें ह्मणायला हरकत नाहीं. विद्वत्ता व कला या दोन अंगाचा विकास या काळात बरा झाला. पण वास्तवता व जिव्हाळा याच्या बाबतींत मात्र हरिभाऊपेक्षां अजूनही पुढें पाऊल पडलें नाहीं ह्मटलें तरी चालेल. नाट्यवाङ्मयाला एकाच वेळीं भिन्न संस्कृतीच्या जनसमूहाना रंजवायचें असल्यामुळें त्याला कृत्रिम कल्पनारम्यतेचा

अनिर्वाहपक्षीं आश्रय करावा लागत असेल. पण कथावाङ्मयाला आता त्याची तादृश जरूरी आहे असें वाटत नाही वेल्स, गॅल्सवर्दी, गॉर्की, सिंक्लेअर, लुईस याच्याइतके अनुभवसिद्ध लिहिणे आजच्या मराठी लेखकांना शक्य नसेल. पण त्यानी आतां हवेत किल्ले बाधून त्यात कुठल्या तरी सुदर नायक-नायिकाना कोंडण्याचे कारण नाही जमिनीवरील बंगल्यापासून झोपड्यापर्यंत त्याना रगविण्याला योग्य अशी हवी तितकी जोडपी मिळतील आजचे महाराष्ट्राचे अगर हिंदुस्थानाचे जीवन ह्मणजे काही समुद्रतीरावरील सहल नव्हे. ते वादळातले जलपर्यटण आहे. आणि शात समुद्रापेक्षाही वादळी समुद्र चित्रकाराच्या दृष्टीला अधिक आकर्षक वाटायला नको का ? सामाजिक, धार्मिक, नैतिक, राजकीय सर्वच क्षेत्रात जोराची आदोलने होत आहेत. स्वतःचा तोल जाऊ न देता त्याची शब्दचित्रे काढण्याहून कलावंताला अधिक आनंददायक असें कोणतें कार्य असू शकेल ?

## विविधता चित्रित करा.

प्रणयचित्रणाचाच प्रश्न घेतला, तरी विविध मानवी स्वभावाच्या जोडीला स्त्रीपुरुषाची समता, जातिभेद, धर्मभेद, घटस्फोट, स्त्रियाचें आर्थिक स्वातंत्र्य इत्यादि नवे प्रश्न येऊन बसले आहेत. प्रणयिनीच्या गालावर फुललेल्या गुलाबा इतकाच पारतंत्र्याच्या कल्पनेने सतप्त झालेल्या तरुणाच्या तोंडावर फुटलेला तांबडा गुलाबही वर्णनीय असतो प्रणयकथेतील खलपुरुषापेक्षा सहस्रपटीने भयकर असे पारतंत्र्य,अज्ञान, धर्मभोळेपणा, दारिद्र्य इत्यादि राक्षस समाजदेवतेच्या मागे लागले आहेत या सर्वांची समरसतेने व उत्कटतेने चित्रें रेखाटलीं, तर तीं काय कमी आकर्षक होतील ? कलावंत कथालेखकाना कुणीही एवढेच म्हणेल- आपण कुशल गायक आहात, गायकाला लावण्या, पावाडे, भजने, सारेंच नको का ह्मणता यायला ? आपण प्रतिभासपन्न चित्रकार आहा ओलेतीचे चित्र रंगविण्याची आपणाला लहर आली म्हणून कित्येकाच्या अंगाची आग होते. ते स्वाभाविकच आहे. पृथ्वीजवळची हवा वरच्या हवेपेक्षा सूर्याच्या उष्णतेनें अधिक तापायचीच पण ओलेतीप्रमाणें भाजी विकून भर दुपारच्या उन्हात घामानें निथळत घराकडे परत जाणारी माळीणसुद्धा चित्रविषय व्हायला योग्य नाही का ?

## लेखकाला व्यक्तिमत्ता पाहिजे.

ढग हळुहळू खाली उतरावेत त्याप्रमाणे मराठी कथावाङ्मय प्रणयरम्य अद्भुत-तेकडून वास्तवाकडे झुकत आहे, यात शंका नाही. जोराचे वारे सुटले तर हें काम लवकर होईल, इतकेच या वास्तवाच्या चित्रणात सुद्धा कथालेखकाची दृष्टि

सर्वस्पर्शी व व्यापक अशा त्री जिव्हाळ्याचे हृदय व कलेचे शरीर याच्या बलावर कोणतीहि कथा सजीव भासेल पण लेखकाची परिणामकारक व्यक्तिमत्ता प्रगट झाल्याखेरीज ती अमर होणार नाही. समुद्राच्या शिपल्यात मोती तयार व्हावे, त्याप्रमाणे वाचन, मनन, वर्तन इत्यादिकांच्या संस्कारांचे संमिश्रण होऊन लेखकाची व्यक्तिमत्ता बनत असते ही व्यक्तिमत्ता जितकी व्यापक व उदात्त असेल, तितके कथावाङ्मय सखोल, सहानुभूतिपूर्ण व सुंदर होते कलादृष्ट्या व्यक्तित्व अस्फुट ठेवणे निराळें व मुळीच व्यक्तिमत्ता नसणे निराळे.

## तंत्राकडे दुर्लक्ष करूं नका

शरीर म्हणजे माती, उद्या तें पडले की मातींत जायचें, या कल्पनेने त्याची हेळसांड करणाराला शहाणा कोण म्हणेल ? कादंबरी व लघुकथा याकडे पाहण्याची कलादृष्टि दिवसेंदिवस सूक्ष्म होत चालली आहे, ही ह्या दृष्टीने इष्टच गोष्ट आहे तंत्राची नुसती टर उडवून कथनकला कांहीं सुंदर होणार नाहीं 'ग्यानबा तुकाराम' म्हणत जाणाऱ्या वारकऱ्याचा जिव्हाळा असला म्हणजे झाले, मग टेक्निक-फिक्निक हवे कशाला ?–असे य गो जोश्यासारखे कथालेखक म्हणतात. पण ग्यानबा तुकारामातही ग्यानबाची मेख असूं शकतेच ! जिव्हाळा हा तंत्रापेक्षा महत्वाचा गुण असला, तरी त्यामुळे तंत्राकडे दुर्लक्ष करण्यात काय अर्थ आहे ? उलट प्रसंग नालापायीं राज्य गेल्याचा अनुभव यायचा ! जिव्हाळा हा शब्द देशभक्तिइतकाच स्वस्त होऊं पाहत आहे, पण स्वस्ताई ही नकली मालाची खूण होऊं शकते गायनकलेत निव्वळ गोड गळा असून चालत नाही. त्याला शास्त्राचीही जोड पाहिजे. चित्रकलेतही नुसता हात चालत नाहीं. कथावाङ्मयातील तंत्र म्हणजे दक्षिणेकडे पाय करून निजूं नये, निजताना 'आस्तिक, आस्तिक' म्हणून सर्पमंत्र जपला म्हणजे सापाची भीति राहत नाही, अशा मासल्याचे नियम नव्हेत. कथेवर प्रभुत्व गाजवून गेलेल्या जगातील थोर लेखकाच्या अनुभवाचे सार असते ते. प्रौढ कथावाङ्मयाला सुद्धा तें मार्गदर्शक होऊं शकते, मग अजून किशोरावस्थेत असलेल्या मराठी वाङ्मयाला त्याची जरूरी आहे हें सांगायलाच नको यापुढील मराठी कथालेखकाना आपल्या कृतींचें अंतरंग सजविण्याकरिता मानसशास्त्र, समाजशास्त्र इत्यादि शास्त्राचा जसा अभ्यास करावा लागेल, त्याप्रमाणे रमणीय रचनाकौशल्याकरिता विविध व नवनव्या तंत्रपद्धतांशीहि परिचय करून घ्यावा लागेल. कपड्याचा अनुक्रम चुकल्यामुळे प्रियकरणाचें वेडेवाकडे वर्णन करणाऱ्या कंकणासारखा हास्यास्पदपणा मात्र तंत्राच्या बाबतींत होता कामा नये हें खरें !

## कथालेखकांना सूचना.

अधिकाराने नव्हे पण वाङ्मयप्रेमानें मराठी लथालेखकाना खालील सूचनाकडे लक्ष देण्याविषयीं मी विनंति करतो

(१) हरिभाऊ आपटे, कृ. के. गोखले, गुर्जर वगैरे कथालेखकानीं रूपातरें करून मराठींत रमणीय भर घातली. पण अलीकडे स्वतंत्र प्रतिभेचें पीक सोळा आणे पिकूं लागलें असल्यामुळेंच कीं काय या अतिशय महत्त्वाच्या गोष्टीकडे लेखकाचे दुर्लक्ष होत आहे हौशी लेखकानी अशीं रूपातरें केल्यास त्याचा दुहेरी उपयोग होईल. वाङ्मयचौर्य करून मराठी कथेचें भाडार संपन्न करावें असे मी सागत नाहीं. पण राजरोस केलेलें रूपातर हा विद्याधनाची देणगी आहे. ती मिळविल्यानें मूळ मालकाचा तोटा न होता आपला फायदा होतो.

(२) कथालेखकाने वाचनापेक्षा आपल्या भल्याबुऱ्या अनुभवातूनच कथा निर्माण केली पाहिजे ध्वनीचे प्रतिध्वनि आणि त्या प्रतिध्वनींचे प्रतिध्वनि मराठी कथावाङ्मयात फार ऐकूं येतात. एका वर्षी सालस राहू इच्छिणाऱ्या वेश्याच्या अभागी मुलीच जिकडे तिकडे दिसूं लागतात, तर दुसऱ्या वर्षी जी नायिका उठते ती घटस्फोटाच्या गोष्टीच बोलूं लागते. लेखकाने पाहिलेल्या समाजाच्या अतरंगाचें हे प्रतिबिब असतें असे मला नाटत नाहीं. पण तें असलेंच तरी लेखकाच्या व्यक्तिमत्तेचीं छाप त्याच्यावर पडलेली दिसत नाहीं, हा दोषच नव्हे काय ?

(३) अतर्मुख दृष्टि, सामान्य विषयातून नाट्यपूर्ण कथाबीज काढण्याची शक्ति, परिचित विषय नवीन दृष्टिकोनाने पाहण्याची आवड, सूचकता, उत्कट आणि व्यापक सहानुभूति, तंत्राचे प्रायोगिक ज्ञान इत्यादि कथेच्या कलागाचा अभ्यास व विवेचन सध्याहून मोठ्या प्रमाणात होणें अवश्य आहे.

(४) लोकप्रिय लेखकानीं मार्गदर्शनाची जबाबदारी ओळखून काहीं कृतींवर विशेष श्रम केले पाहिजेत. आज फुलून उद्या सुकणारें कथावाङ्मय कुठेही झालें तरी पुष्कळसें निर्माण होणारच. पण अत्तराप्रमाणें आपला सुगंध न गमावता दीर्घकाल टिकणारें वाङ्मय निर्माण करण्याकडे बिनीच्या लेखकानींच लक्ष देणें अवश्य नाहीं काय ?

(५) विनोदी, शास्त्रीय, चमत्कृतिजनक, अद्‌भुतरम्य इत्यादि विविध कथाविभाग मराठींत बाल्यावस्थेत आहेत. ऐतिहासिक कथा मागे पडल्या आहेत ही गोष्ट खरी. पण या नवीन विभागातील वाङ्मयाने वैचित्र्याची उणीव सहज भरून निघेल.

## ही कामगिरी उपेक्षणीय नाहीं.

वर्तमान मराठी कथावाङ्मयातील काही उणीवा वरील त्रोटक विवेचनात मी दिग्दर्शित केल्या याचे कारण भविष्याकडे लागलेली माझी दृष्टि हेच होय. कथा-वाङ्मयानें गेल्या अर्ध शतकात केलेली कामगिरी काही उपेक्षणीय नाही. मंदाकिनीने पृथ्वीवर अवतरून धान्यसंमृद्धी करावी, त्याप्रमाणे हरिभाऊची प्रतिभा मोहक अद्भुत रम्यतेतून रसपूर्ण वास्तवाकडे वळली, व कधीहि न कामेजणारी अनेक कथापुष्पें तिनें मराठी शारदेच्या चरणावर वाहिली कादंबरीकार या नात्याने प्रो वामनराव जोशानी विचारप्राधान्य व प्रो फडके यानी कलासौंदर्य आणून या मूर्तीची पूजा केलीं. नाथमाधव व. डॉ केतकर, ना. ह. आपटे व हडप याचे वाङ्मय एकमेकाहून कितीहि भिन्न असले, तरी त्याची कादंबरीची सेवा सस्मरणीयच ठरेल याशिवाय एक दोन वाचनीय कृति निर्माण केलेले कादबरीकार तर कितीतरी येतील आरभींच उल्लेखिलेल्या यंदाच्या कादबरीलेखकाच्या यादीत पु य देशपाडे, माडखोलकर, सौ शाताबाई नाशिककर प्रभृतीची नावे घातली, म्हणजे मराठी कादबरीचे क्षेत्र किती विविध होत चालले आहे, याची कल्पना येईल.

## जुन्या कथालेखकांचे संग्रह करा.

मराठी गोष्टी व लघुकथा याची वाढ तर कादंबरीपेक्षाही आश्चर्यकारक वाटते मनुष्याच्या वेषाप्रमाणे वाङ्मयाच्या बहिरंगातही अनेक बदल होतात. एके काळी गंधर्वटोपी डोक्यावर प्रमुखत्वानें दिसत असे. पुढे गाधी टोपीने तिची जागा घेतली. आतां बिनटोपीचा काळ आलेला दिसतो. पण टोपीचा आकार व रग बदलो अगर प्रसंगी टोपी असो वा नसो, डाके जाग्यावर असलें म्हणजे झाले. मराठी गोष्टीच्या बाबतींतही तेंच म्हणता येईल. गोष्ट हे जुनें पुराणे नाव मागे पडून लघुकथा हे नाव रूढ झाले, अगर तिच्या बहिरंगात बदल होऊ लागला, म्हणून आतापर्यंतच्या कथालेखकाची कामगिरी काही कमी दर्जाची ठरत नाही. १९३३ अखेर प्रसिद्ध झालेल्या संग्रहाचे सहज सिहावलोकन केले, तर हरिभाऊ आपटे, कोल्हटकर, केळकर, वा. म. जोशी, वरेरकर, ना. ह. आपटे, कॅ लिमये, वा. ना. देशपाडे, चि वि. जोशी, सरस्वतीकुमार, सौ. कमलाबाई टिळक, एक विद्यार्थी, आबेकर, सुखठणकर, कुमार रघुवीर, आधुनिक एकलव्य, विभावरी शिरू-रकर, वाळके प्रभृति आकर्षक नावें डोळ्यापुढे उभीं राहतात. या लेखकाप्रमाणेच ज्याचे श्रम मराठी लघुकथेवर सौंदर्याचा साज चढायला कारणीभूत झाले आहेत अगर अगर होतील अशी खात्री वाटत आहे, असे लेखकही अनेक आहेत. शि. म. पराजपे गुर्जर, कृ के गोखले, सौ क्षमाबाई राव, प्र के. अत्रे, शं. बा शास्त्री

कु प्रभावळकर, दौडकर, माजरेकर इत्यादि नावें कोणता रसिक वाचक विसरेल ? सौ शाताबाई नाशिककर, वि ल. बर्वे, ना. धो ताम्हणकर, वकील, ग रा. बाळ, भ दि गागल वगैरे नावेही कथावाचकाना प्रिय वाटणारी अशीच आहेत या कथा लेखकापैकी कै पराजपे, गुर्जर, कै गोखले, सौ क्षमाबाई राव इत्यादिकाचे कथा संग्रह यापूर्वीच प्रसिद्ध व्हावयाला पाहिजे होते लहान मुलाना आधी जेऊ घालतात त्याप्रमाणें ऐन पंचविशींतील तरुणाच्या कथाही आता संकलित होऊं लागल्या आहेत अशावेळी मराठी लघुकथेच्या बाल्यावस्थेत आपल्या प्रतिभेने ज्यानी तिचे पोषण केलें, त्या गुर्जर-गोखल्यामारख्या साहित्यसेवकाचे सग्रह प्रसिद्ध होणे आवश्यक नाही काय ?

## भविष्याचें मनोहर स्वप्न.

तथापि ही सर्व नावे व त्याचे कर्तृत्व लक्षात घेऊनही मराठी कथावाङ्मयाला प्रगतिपथावरील बरीच मोठी मजल अजून मारायची आहे, असें मला वाटते. इंग्लिश, अमेरिकन अगर रशियन कथालेखकाना जे कार्य करता येत आहे ते आम्हा मराठी कथालेखकाना थोड्या अशानें तरी का करता येऊं नये ? ते आमच्यापेक्षा गोरे असतील पण बौद्धिक कर्तृत्वाचा बाह्य रगाशी काहींच सबंध नसतो. मध्याच्या काळी ईश्वरावर श्रद्धा असण्याची मारामार, मग बिचाऱ्या सैतानाला कोण पुसतो ? सैतान एरवी कितीही वाईट असो, मिल्टनचा सैतान-त्यातल्या त्यात त्याच्या तोडचे स्वर्गातल्या गुलामगिरीपेक्षा नरकातील राज्यपद श्रेष्ठ आहे, हें वाक्य मला नेहमीच स्फूर्तिदायक वाटते ‘ असंतोषः श्रियो मूलम् ’ हें तत्व व्यवहाराप्रमाणे वाङ्मयातही खरें आहे, आणि म्हणून सैतानाच्या वरील वाक्यातील जळजळीत स्वाभिमान, त्याला बायबलाचा आधार नसला तरी मराठी कथालेखकानीही अगी बाणविला पाहिजे. दुबळी आत्मतृप्ति आता पुरे झाली, सबळ महत्वाकाक्षेवर आपण आरूढ होऊं या. या महत्वाकाक्षेच्या विमानात बसून वर जाऊं लागलें की प्रथम मराठी कथा-वाङ्मयानें जागृत केलेला महाराष्ट्र जनसमुद्र दि ; लागतो आणि मराठी कथावाङ्मयाची हिंदी, बंगाली व इंग्रजी रूपातरें मानाचे मुजरे घेत असल्याचा देखावा प्रगट होतो. त्याच्याही वर थोडे गेलें कीं, नोबेल प्राईझचा कीर्तिमुकुट मराठींतील भावी हरिभाऊच्या मस्तकावर विराजमान झाल्याचे रम्य दृश्य प्रादुर्भूत होते माझ्यासारख्या आशाळभूत भक्ताचीं ही स्वप्ने खरीं करण्याचें सामर्थ्य अंगीं आणण्याची सद्बुद्धि देवी सरस्वतीनें सर्व प्रतिभावंत कथालेखकाना द्यावी अशी विनंति करून .आणि आपणा सर्वांचे मन पूर्वक आभार मानून मी आपली रजा घेतों.

---

श्री

# मराठी साहित्य संमेलन, बडोदें.

## अधिवेशन १९ वें,

---

सन १९३४.

---

विभाग :

## संगीत.

अध्यक्ष :

## प्रो. विनायकराव पटवर्धन

# यांचें भाषण.

---

**सन्मान्य अध्यक्ष व थोर सभाजन हो,**

आज आपण मला महाराष्ट्र साहित्य समेलनाच्या संगीत-विभागाचा अध्यक्ष निवडून माझा जो सन्मान केलात त्याबद्दल मी आपणा सर्वांचा फार आभारी आहे. वस्तुत आपल्या या महाराष्ट्रात अध्यक्षपदास योग्य असे विद्वान व संगीतशास्त्रातील तज्ञ असे बरेच लोक आहेत असें असता आपण माझीच निवड केलीत यावरून मी असे समजतो कीं, संगीताचा व्यासंग करणाऱ्या तरुण पिढीच्या अंतःकरणातून कोणत्या विचाराचा प्रवाह वहात आहे, हें आपणास मोकळेपणानें ऐकावयास मिळावे, या दृष्टीने मीही पण माझें विचार मोकळेपणाने आपणासमोर माडणार आहे, त्यामध्ये कोणावरही व्यक्तिविषयक टीका करण्याचा माझा हेतू नाहीं मला जे सरळ वाटतें ते मी सागणार आहे माझेप्रमाणे आपणही हीच दृष्टी ठेवून खुल्या दिलाने आपल्या सूचना पुढे माडल्यास त्याचा योग्य तो विचार करून पुढील कार्यास मला त्याचा उपयोग करून घेता येईल असे आपणास विनंतिपूर्वक आश्वासन देऊन मी प्रस्तुत विषयाकडे वळतो.

## ऐतिहासिक अवलोकन.

आपल्या या भरतभूमीत सगीत विद्या ही वेदकालापासून चालत आलेली आहे सामवेद हा गाइला जातो हे सर्वश्रुतच आहे त्यातही लेखन, नोटेशन पद्धतीची कल्पना होती असे सूक्ष्म दृष्टीनें पहाणारास दिसून येईल. यानंतरचा काल म्हणजे संगीत विद्येवर सस्कृतात झालेले ग्रथ होत. परतु तत्पूर्वीच्या काळात या विद्येसबधी काय प्रयत्न झाले किंवा तिचें स्वरूप काय होते हे नेमकेपणानें कोणालाही सागता यावयाचे नाही. कोणी काही जे सागतात त्यात अनुमान व तर्कच दिसतात या संगीत विद्येवर झालेल्या संस्कृत ग्रंथावरून पाहता भारतीय संगीतात दोन पद्धतीची नावे आढळतात एक हिदुस्थानी व दुसरें दाक्षिणात्य सगीत.

स्थूलमानाने पहाता असे दिसते की, ज्या ठिकाणी सगीत विद्येला पुष्कळ काळपर्यंत राजाश्रय मिळेल त्या ठिकाणीं कोणती तरी विशिष्ट पद्धत बनू शकते. या दृष्टीनें पाहिलें असता उत्तर हिंदुस्थानात एकतंत्री राज्यपद्धती बराच कालपर्यंत चालू होती. विशेषत दिल्ली व आजूबाजूचा प्रात याना एका दृष्टीनें पूर्णपणें स्वास्थ्य लाभलें. जरी युद्धाचे प्रसंग आले तरी ते अल्पकाळ टिकले व तेथें पूर्ण

शांतता नांदत राहिली. त्याचप्रमाणें दक्षिणेंतही, विशेषत: म्हैसूर व त्याच्या लगतच्या प्रदेशांत राजशाही पुष्कळ काळपर्यंत लाभली; अर्थात संगीत विद्येला राजाश्रय सातत्यानें मिळत गेलेला आहे. सहजच त्यावेळीं जी राजभाषा अस्तित्वांत होती त्याच भाषेंतून संगीत प्रबंध निर्माण होणें स्वाभाविक होते. यावरून

**सर्व चिजा या हिंदी भाषेंतच कां बनल्या**

हें सहजच ध्यानांत येईल. यावरून भारतीय संगीताला हिंदी भाषा सर्व भाषापेक्षां सोईची आहे. त्यांत गोडवा व माधुर्य हें अधिक आहे, अशा बुद्धीने त्या चिजा बनलेल्या नसून पुष्कळ काळपर्यंत हिंदी भाषेला राजाश्रय मिळाल्या-मुळेंच त्या चिजा हिंदी भाषेंत बनल्या

**हिंदी भाषेपूर्वी ही भारतीय संगीतविद्या संस्कृत भाषेंत रुढ**

होती पुढें ही संगीत विद्या जशी हिंदी भाषेंत आली त्याचप्रमाणें ती प्रत्येक प्रांतीय भाषांतून कमीअधिक प्रमाणांत व निरनिराळ्या ढंगानें सुरूं झाली. आजही प्रत्येक प्रांतांतून जें स्वतंत्र संगीत त्या त्या प्रांतीय भाषेंत दिसून येते तें या भारतीय संगीताचें स्वरूप होय. आतां उपरिनिर्दिष्ट ज्या दोन पद्धती सांगितल्या व ज्या विशिष्ट गांयकीस प्राधान्य आले त्यांत अधिक प्रबंध झाले व त्यांत चिजांचें भाण्डार सर्वापेक्षां अधिक उपलब्ध आहे याचें कारण मुख्यत: राजाश्रय होय हें आम्ही वर सांगितलेंच आहे.

**भारतीय हिंदुस्थानी संगीत पद्धतीबद्दल मला पूर्ण आदर**

आहे. माझ्या गुरुजींनींही याच पद्धतीचा अभ्यास केला व माझ्यासारख्या सर्व शिष्यांना हीच पद्धत शिकविली; आम्ही तीच पद्धत शिकवितों व तिचा प्रसार करतों. आमचे परमपूज्य गुरु कै. श्रीमान पंडित विष्णू दिगंबर पलुस्कर यांनीं आपल्या या भारतांत अटकेपासून रामेश्वरापर्यंत व पुरा ते द्वारकेपर्यंत वेळोवेळीं दौरे काढून भारतीय हिंदुस्थानी पद्धतीचा प्रसार केला. आजही हिंदुस्था-नांतील प्रत्येक जिल्ह्यांतून पंडितजींचे शिष्य या विद्येवर आपली उपजीविका चाल वत असल्याचें आपणांस आढळून येतील अस्तु. पंडितजींचा हा प्रसार हिंदुस्थानी भाषेमुळें सुकर झाला. आमच्या इच्छेप्रमाणें संगीताचें मराठीकरण झालें तरी त्याचा प्रसार महाराष्ट्राशिवाय इतर प्रांतांत व इतर लोकांत होणार नाहीं हें उघड आहे. व ही गोष्ट मान्य करून सुद्धां मराठीकरण-महाराष्ट्रांतील बहुजनसमाज हिंदी भाषा जाणणारा नसल्यामुळें संगीताचें मराठीकरण आवश्यक आहे. वस्तुत:

## संगीताचें मराठीकरण

हे नवीन कोणी काढले नसून पूर्वप्रमाणे एका दृष्टीने चालत आले आहे कै अण्णासाहेब किर्लोस्कर यानी जी प्रथम सौभद्र, शाकुतल, रामराज्यवियोग ही नाटके रचिली त्यातील बऱ्याचशा चाली महाराष्ट्रातील लावणी पद्धतीवर असून काहीं कर्नाटकी पद्धतीवर व काही हिंदुस्थानी पद्धतीवर आहेत. त्याचप्रमाणे त्यावेळचे श्रीं. डोंगरे, सोकर बाबूजी त्रिलोकेकर वगैरे मंडळीनी नाटकी पदे तयार केलं. त्यानंतर कै साहित्याचार्य श्रीपाद कृष्ण कोल्हटकर यानींसुद्धा उर्दू वगैरे चालीवर मराठी काव्य केले त्यानंतर नाट्याचार्य दे भ कृष्णाजी प्रभाकर खाडिलकर यांनी मात्र खास उत्तर हिंदुस्थानी ढंगाच्या चालीवर काव्य करून, खऱ्या वस्तादी गायकीच्या ख्यालावर पदे करून मराठी काव्यात नवीन चालीची भर घालून मोठेच कार्य केलें तीच पद्धति त्याच्यानतरच्या सर्व नाटककारानीं मान्य करून वस्तादी चालीवर पदे करण्याचा भर होता अशा मराठीकरणाने मात्र हिंदुस्थानी पद्धतीचे काहीं नुकसान झाले नाही असे असता 'संगीताचें मराठी-करण' या शब्दानेच हिंदुस्थानी पद्धत नामशेष होईल कीं काय ? अशी काहीं विरोधकांच्या मनात अकारण भीति उत्पन्न झाली आहे आमच्या मताने संगीताचे

### मराठीकरण हें मराठी भाषा जाणणाऱ्याच्या सोईकरितांच

होय. हिंदुस्थानी पद्धतीतील धृपद, धमार ख्याल टप्पा, ठुंबरी वगैरे सर्व मराठी भाषेंतून मराठी जाणणाऱ्या लोकास ऐकावयास मिळावेत हा त्यात मुख्य उद्देश आहे. व हे करताना हिंदुस्थानी पद्धतीतील चिजेतील जितका डौल व माधुर्य आणता येणें शक्य असेल तितके आणण्याचा आम्ही अवश्य प्रयत्न करू परंतु असें केल्याने मूळ हिंदुस्थानी पद्धत नामशेष होईल ही भीति निराधार होय विरोधकाचे मताने आता धृपद धमाराचे गाणें बुडालें आहे. याला ते काय कारण देऊ शकतील बरें ? उलट आता याच मराठीकरणाने जर ते मराठी भाषेत आलें तर ती हिंदुस्थानी पद्धत नामशेष न होता तिचे पुनरुज्जीवनच होईल. बरे, असे धरून चालूं की, मराठीकरणाने जर हिंदुस्थानी पद्धत नामशेष होइल तर त्याच चिजा नाटकी संगीतात आणल्याने हिंदुस्थानी पद्धत नामशेष का होऊं नये ?

आतां यापुढे सगीताचे मराठीकरण या मूळ विषयाचा तात्त्विक दृष्टया विचार करूं. खरोखर पाहिलें असता सगीताचें मराठीकरण हा तात्त्विक चर्चेचा विषय आहे. या विषयाशी संगीतशास्त्राचा अर्थाअर्थी काही संबंध नाही.

## आर्यावर्तात संगीताच्या दोन पद्धति.

पूर्वापार चालू आहेत (१) उत्तर हिंदुस्थानी संगीत पद्धति व (२) दक्षिण हिंदुस्थानी अथवा कर्नाटकी संगीत पद्धति. वरील दोन्ही पद्धतीपैकीं महाराष्ट्रात उत्तर हिंदुस्थानी सगीत पद्धतीचाच प्रचार आज पाऊणशे वर्षांपासून तरी चालू आहे. त्यामुळें वरील पद्धतीचें शिष्यत्व पत्करून हिंदी चिजांचेच मराठीकरण करावें असे मराठीकरणाच्या अभिमान्याचे मत आहे. याचा अर्थ असा नव्हे कीं.

## हिंदुस्थानी चिजांच्या शब्दांचें मराठी पद्यात्मक भाषांतर

करावे तसे असते तर मराठीत अशा शब्दाची गीतें पुष्कळच आहेत परत मराठीकरणाचा उद्देश हा आहे की, हिंदी चिजाच्या ढगावर अगर चालीवर त्या त्या रागाला, रसाला व तालाला अनुकूल अशा भावनात्मक गीताची रचना व्हावी जो भाव, जो रस, जो ढंग हिंदी चिजातून दृष्टीस पडतो त्याची बरोबर ऐट, पडछाया नवीन होणाऱ्या मराठीकरणात पडावयास पाहिजे तरच ते मराठीकरण बरोबर झाले असे म्हणता येईल पण काही गायक व लेखकवर्ग याची या बाबतीत गैरसमजूत झालेली दिसते पण काही लोक मात्र समजून उमजून दुराग्रहाला बळी पडले आहेत ते असे भासवितात की, मराठीकरणाचे अभिमानी वरील दोन पद्धतीशिवाय तिसरीच एक महाराष्ट्र संगीत पद्धतीच निर्माण करू पहातात परतु आतापर्यंत ज्यानी ज्यानी म्हणून संगीताच्या मराठी-करणावर विचार प्रगट केले आहेत. त्याच्या पैकीं कोणीही एकादी तिसरी नवीन पद्धति निर्माण करण्याची आवश्यकता आहे असे म्हटलें नाही. अलीकडे कानडी, तामीळ, तेलगू इत्यादि भाषातूनसुद्धा हिंदी चिजावर रचना करण्यास सुरुवात झाली आहे त्याचप्रमाणे बंगालमध्येसुद्धा उत्तर हिंदुस्थान संगीत पद्धतीचें संगीत गाईले जात असताना अलीकडे काही

## बंगाली लोक आपली ' बंगाली ' म्हणून एक पद्धति

आहे असे म्हणू लागले आहेत.

संगीताच्या मराठीकरणाची कल्पना जी निघाली तिला सक्रिय चालना देण्याचें श्रेय श्री दे भ साहित्याचार्य नरसिंह चिंतामण केळकर यानाच दिले पाहिजें.

संगीताच्या मराठीकरणाची कल्पना कै गुरुवर्य पं. विष्णु दिगंबर पलुस्कर याना आलेली होती महाराष्ट्रात संगीत प्रसाराचा दौरा जेव्हा त्यानी काढला तेव्हा

महाराष्ट्रीय लोकांस हिंदी भाषा समजत नसल्याची त्यांस जाणीव झाली व लागलीच त्यानीं तदनुसार फरक करण्याचें मनात आणून जलशातून मराटी पदेंच नव्हे, तर थोडेबहुत ख्यालसुद्धा मराठींतून म्हणण्यास सुरुवात केली, परंतु या फरकाबद्दल त्यावेळी आताप्रमाणें चर्चाच झाली नाहीं त्यामुळे ही गोष्ट कोणाच्या लक्षात आली नाहीं.

परंतु त्यानंतर पुण्यास १९२८ साली जी संगीत परिषद भरली तीत साहित्याचार्य दे. भ. नरसिह चिंतामण केळकर यानी हा विषय परिषदेपुढे आपल्या अध्यक्षीय भाषणात मांडून या विषयाच्या चर्चेस चालना दिली.

## संगीताचें मराठीकरण या नांवासंबधीं वाद.

हिंदुस्थानीं संगीत पद्धति मान्य करून त्याची एक शाखा म्हणजेच ‘ संगीताचें मराठीकरण ’ होय. या नावासंबंधी बराच वाद आहे. ज्याना हे नाव पसत नाही त्यानीं दुसरेही नाव सुचविले नाहीं. त्यामुळे

## संगीताचें मराठीकरण हेंच योग्य नांव

आहे असें वाटतें. यापेक्षा योग्य व सुटसुटित नाव कोणी सुचविल्यास त्याचा आम्ही जरूर स्वीकार करूं.

‘ संगीताचें मराठीकरण,’ याची व्याख्या आम्ही अशी करतो की, हिंदुस्थानी चिजेच्या बरहुकम नवीन मराठी पदें तयार करणे. हिंदुस्थानी चिजेच्या स्वररचने प्रमाणे जर कोणी नवीन स्वररचना केली व त्यावर जर मराठी पद्य केले तर काय हरकत असावी हें आम्हास समजत नाहीं हिंदुस्थानीं चिजा जशा पुष्कळ वर्षे मेहनत करून चागल्या घटविल्या जातात तशीं मराठी पदें अथवा ख्याल घटविले गेले, तर गायक मराठी ख्याल म्हणत आहे हे कळणार नाहीं अशी आमची खात्री आहे.

## अर्थाची गडबड गाण्यांत नको.

गाण्यात अर्थाकडे कोणी पहात नाहीं. नुसत्या स्वराच्या फेकी कशा सुंदर गवई करतो एवढेंच आम्हांस पाहिजे असे म्हणणारा एक पक्ष आहे. गवई जे गातो त्याला काहीं तरी काव्य असावें लागतेंच, व त्या काव्यात अर्थ नसला तरी चालेल असें म्हणणें हास्यास्पद होय असें खेदानें म्हणावे लागते.

पियाबिन नहिं आवत चैन, गोपाला मेरी करुणा क्यौं नहि आवे, राधे कृष्ण बोल वगेरे पदे म्हणणारे गायक जर अर्थाला सोडून गाऊं लागले तर त्यांची पदें

कोणीही ऐकणार नाही. ख्याल काव्यापैकी थोडी उदाहरणे खाली देतो. वहृकृत नई फूली, नेवरिया झाझरि, करीम नाम तेरो, सा सुदर वदन के, फुलन को हरवा वगैरे ख्याल जेव्हा गायक गातात तेव्हा स्वराबरोबर चिजेतील अक्षरें म्हणतातच व त्याला काहीं अर्थ असतोच, पण चिजेंतील काही थोडी अक्षरें घेऊन त्याच्या-वरच गात बसावयाचें ही पद्धति यापुढे पालटणे अगदी जरूर आहे

सद्यःस्थितीचा विचार केला तर

## हल्लीं काव्यगायन लोकांना बरेंच आवडूं लागलें

आहे. यावरून थोडा विचार केला तर असे दिसेल कीं, अर्थप्रचूर काव्य श्रोत्याना पाहिजे आहे पण आम्हा गायकानी अर्थावरच बहिष्कार घातल्याने काव्यगायन करणारे गायक नसून सुद्धा त्याचे काव्यगायन श्रोते ऐकतात. मग आम्ही गवईलोकानी ख्याल पद्धतीचे नवीन मराठी काव्य निर्माण करून ते जर श्रोत्याना ऐकविले तर आमची खात्री आहे की, आम्हा गायकाचें गाणें श्रोतेच जास्त ऐकतील या पुढे काव्य कारणाऱ्या कवीना गाणे शिकणें आवश्यक झाले आहे. कवि जर गायक होतील तर दुधात साखर पडल्यासारखे होणार आहे. आजचा गायकवर्ग कवि नसल्यामुळे कवीच्याकडून कविता करून घ्याव्या लागतात, मग जशा कविता होतील तशा त्या गाव्या लागतात. गेल्या वीसपंचवीस वर्षांतील नाटकातील काव्य जर पाहिले तर असेच आपणास दिसून येईल की, कवीना स्वराची मौज कळत नसल्याने अक्षराला अक्षर जोडून काव्य कसें होतें व तो एक हास्यास्पद विषय कसा होतो हे त्यातील तज्ज्ञ लोकाना माहीत आहेच. काव्यातील शब्दाला स्वराची मुरड कोठे द्यावयास पाहिजे हे कवीना समजल्याशिवाय त्याचे काव्य चागले होणार नाही पूर्वीच्या वस्तादी चिचा करणारे सदारब,आदारंग, मन-रग वगैरे कवि स्वत गायक व शास्त्रज्ञ असल्यामुळे स्वरानुकूल कोठे कसे शब्द पाहिजेत याचे त्याना पूर्ण ज्ञान होते. गायकवर्ग जर

## अर्थप्रचूर ख्याल मराठींत

गाऊं लागले तर गाण्यात अर्थाची लुडबुड नको असे म्हणणारा पक्ष उद्या असेंहि म्हणू लागले की, आता पूर्वीसारखे वस्तादी गाणे राहिलें नसून निव्वळ काव्यगायन राहिले आहे. आजपर्यंत चिजेच्या अथवा पदाच्या अर्थाची पर्वा न करिता वाटेल तसा धिगाणा आम्ही गवई लोक घालीत होतो. तसा प्रकार यापुढे चालणार नाहीं. अर्थहीन चिजा म्हणणे काहीं गायकाना आवडत नाही. स्वराच्या

संगतीने शब्दाचा अर्थ लोकाना समजावा व त्यापासून भावना व रस उत्पन्न व्हावा अशी काहींची सदिच्छा आहे पण ' मराठीकरणाचे ' लोढणे त्याना नको असे वाटते. हिंदुस्थानी काव्यानेच रस किंवा भावना उत्पन्न होईल, मराठी शब्दाने होणार नाही अशा समजुतीनें मराठीकरण म्हणजे एक खूळ आहे असे त्याना वाटते. मराठी भाषा गाण्याच्या रसपरिपोषाला योग्य नाहं असे काहींचें ह्मणणे आहे उत्तर हिंदुस्थानातील ब्रिज भाषा गाण्याल' फार अनुकूल आहे हे खरे आहे ब्रिज भाषेमधील शब्दप्रयोग फार मृदुपणाने केलेले असतात कठोर व्यंजनाचा उपयोग सहसा केला जात नाही. परतु या ठिकाणी हेही सागणे पण योग्य होईल कीं अशा मृदु भाषेमध्ये वीर रसाला उत्थापन देणारं गाणी फारच कमी आहेत किंबहुना नाहींतच म्हणून हिंदुस्थानामध्ये खडीबोलींचे कवि निर्माण होऊ लागले आहेत जसा भाषेत जोम असेल तसे काव्य निर्माण होते व लोकात जसा जोम असेल तसा भाषेतही जोम येतो असा सिद्धात आहे. असा जोम मराठी भाषेंत नाही का?

## मराठी भाषेवर गायनांतील रसांचा नालायकीचा शिक्का

बसणे हे आम्हास दूषणास्पद आहे. हे दूषण आमच्या साहित्याचार्योनी मृदु व कठोर, नवीन शब्द निर्माण करून नाहींसे करणे जरूर आहे मराठीकरण मान्य न करण्याची कारणे देताना हिंदी भाषेचा प्रत्यक्ष खून पडलेला दिसत असून सुध्दा तो मान्य करण्यास तयार; पण तशा तऱ्हेचा मराठी भाषेचा खून पडू नये म्हणून मराठी प्रबध रचूं नये असें काही लेखकाचे म्हणणे आहे. हिंदुस्थानी लोकाना सुद्धा आपल्या भाषेचा अशा तऱ्हेने खून झालेला पहावत नाही. मग आम्ही गायकानी आमच्या चिजातून सुधारणा करावयास नकोत काय? ऱ्हस्व, दीर्घ, अनुस्वार, विसर्ग इत्यादि अनेक कोपरे मराठीप्रमाणे हिंदुस्थानी भाषेलाही आहेतच. या सर्व गोष्टी साभाळून पूर्वीच्या ख्यालाचे काव्य झाले. चार पाच ओळीच्या मराठी ख्यालामध्ये भावनोद्दीपक कल्पना काव्यामध्यें गावयास पाहिजे ती कल्पना मराठीत येणार नाही असे काहींचे म्हणणें आहे ही शका काव्य-सम्राटाच्या समोरच मी माडतो. माझी खात्री आहे कीं,

## चारपांच ओळींत भावनोद्दीपक काव्य

निर्माण करून ही शंका घेणाराना गप्प बसविल्याशिवाय ते रहाणार नाहींत रसप्राप्ति व भावनानिर्मिति जरी स्वरूपाने साध्य होत असली किंवा संगीतात स्वराना प्राधान्य देऊन काव्याला दुय्यमपणा दिला तरी स्वराची खुलावट काव्याशिवाय होणार नाहीं व काव्याची खुलावट स्वराशिवाय होणार नाहीं असे आमचे ठाम

मत आहे संगीतात स्वर व काव्य दोन्ही पाहिजे. त्याशिवाय रस व भावना निर्मिति होणार नाहीं हिंदुस्थानी भाषेतल्या मृदु शब्दाप्रमाणे मराठी भाषेतही या पुढे मृदु शब्द निर्माण झाले पाहिजेत इच्छा असेल तर मराठी भाषेंतही ब्रिजभाषेइतकें माधुर्य खास उत्पन्न होईल असा आम्हास विश्वास आहे. चिजेंतील अक्षराना स्वरसमुदायाचे घोस नटविण्यात तालाचे आघात हिंदुस्थानी भाषेला चालतात तसे मराठी भाषेला का चालूं नयेत ? मराठी ख्यालाचें काव्य श्रोत्याना नीट समजेल असे ऐकविल्यानंतर हिंदुस्थानी काव्याप्रमाणे

## मराठी ख्यालाच्या काव्याला तालाचे होणारे आघात

ऐकण्यास श्रोता तयार झाल्यावर मराठी ख्याल म्हणण्यास काहीच हरकत नाही आपल्या भारतीय संगीतात भाषेच्या द्वारें रसपोषण साधावयाचें नसतें किंवा उत्तरात भाषेला मुळीच महत्त्व नसतें व जी संगीतपद्धति आपल्या भाषेला महत्त्व न देता आत्मसात केली अशा पद्धतीच्या स्वैरपणाला मराठीची जोड देण्यानें दोहोंची दुर्दशा होणार अशी भीति प्रदर्शित करणाराच्या हे लक्षात आले नाही की, संगीतातील काव्य नाहींसे झाल्यामुळेच संगीताची दुर्दशा झाली आहे मातृभाषेच्या जपणुकीचा भाव आणणाऱ्यानी हिंदुस्थानी भाषेची दुर्दशा केलेली हिंदुस्थानी साहित्यकाना मुळीच आवडणार नाह काव्यातील शब्द ऐकूं येत नाहींत, ते ऐकण्याची गरजही नसते व ऐकूं आले तर ते ऐकवत नाहीत, अशीं हिंदुस्थानी चिजाची दुर्दशा झाली आहे तरी पण शब्द ऐकू न येणें यातच शब्द उच्चारण्याची खरी कुशलता आहे, असे म्हणणाऱ्याना काय म्हणावें हेंच समजत नाहीं. महाराष्ट्रीय गायकाच्या संगीतामध्यें जी थोडी गोडी व ऐट आढळून येतें ती मातृभाषेच्या आश्रयानें जास्त खुलणार आहे हे टीकाकारानी लक्षात ठेवावें. मराठी भाषेमुळे संगीत कलाविलासाला अडथळा होण्याचें काहीच कारण नसताना मराठी भाषी भाषा कठोर आहे अशी दूषणें देणाऱ्याना साहित्यसम्राटानी त्याना पाहिजेत तसे शब्द उत्पन्न करून दिले तर आपोआप टीकाकाचें तोंड बंद होणार आहे हिंदुस्थानी भाषेसारखे माधुर्य व रसिक उच्चार मराठी भाषेचे करता येणार नाहीत हे म्हणणे एकवेळ मान्य केले तरी मराठीत काव्य करूच नये असें म्हणणें अगदी अप्रयोजक ठरेल.

## मराठी काव्यानें हिंदुस्थानी संगीत नामशेष

होईल अशी काही विद्वानाची खुळी समजूत झालेलि आहे. काही विद्वानानीं स्वत मराठी पदें केलीं असून तीं फारच लोकप्रिय झाली आहेत; त्या पद्याची काव्यरचना

व स्वररचना चांगली रसेली व चटकदार अशी वाटते, पण स्वत काव्य करणारे मात्र मराठी काव्य केल्याने हरिदासी सांप्रदाय वाढून हिंदुस्थानी संगीत नामशेष होईल म्हणून सांगत आहेत. हिंदुस्थानी संगीतात पंजाबी, ब्रिज, पारशी, उर्दू, मारवाडी भाषेतील काव्य आहे त्यांचे जोडीला जर मराठी भाषा बसली तर उच्च संगीत नामशेष कसें होणार हेंच समजत नाही.

## लावणी व पोवाडे हेंच महाराष्ट्राचें संगीत.

मराठीकरणाच्या विरोधकाचें म्हणणें असें आहे की, महाराष्ट्राचे खरें गाणें म्हणजे पोवाडे व लावण्या, त्याचाच उद्धार करावा. यापेक्षा जास्त भानगडी मराठीकरणाच्या अभिमान्यानी करूं नयेत. इतर प्रांतीय लोक महाराष्ट्रीय लोकांना रुक्ष विचाराचे व अरसिक असें म्हणतात. त्यांना आमची चटकदार लावणी ऐकविली तर ते आपल्या रसिकपणाची तारीफ केल्याशिवाय राहणार नाहीत वीरश्री उत्पन्न करण्याला पोवाड्यासारखें दुसरें काव्य नाही हें कोणीही महाराष्ट्रीय कबूल करील. असें जरी असलें तरी दुसरे कसलेंही काव्य मराठी भाषेत उत्पन्न करू नये असा विरोधकांनी तरी हट्ट का धरावा? पोवाड्याचा व लावण्याचा काळ आता राहिलेला नाहीं आता काव्यामध्ये सुद्धा गझल वगैरे हिंदुस्थानी प्रकार शिरले आहेत व महाराष्ट्रीय काव्यसम्राटांनी ते आत्मसातही करून टाकले आहेत. तसेंच पुढील काळात आमच्या हिंदुस्थानी संगीतातील ख्याल, धृपद वगैरे काव्यातील नमुने महाराष्ट्रीय कवि आत्मसात् करतील अशी आमची खात्री आहे व काही काळाने ख्यालाच्या नमुन्याचें काव्य ऐकावयास मिळाल्याशिवाय रहाणार नाही पोवाडे व लावण्याचा उद्धार करा असें म्हणणाऱ्यानीं मात्र आपल्या नाटकातील अथवा इतर काव्याला पोवाड्याचा किंवा लावण्याचा विटाळही होऊं दिला नाही, हें त्या अभिमान्याचे धोरण लक्षात ठेवण्या-सारखे आहे. आम्हा गायकाची व चांगल्या कवीची भेट होऊन पुढील थोड्या वर्षांत चांगले ख्यालपद्धतीचें काव्य निर्माण करून दाखविल्यावर हे विरोधक आपोआपच गप्प बसणार आहेत लावणी व पोवाडे नकोतच असा कोणीही गैरसमज करून घेऊं नये. त्याचा संग्रह पुष्कळच झाला आहे. ज्या काव्याचा संग्रह खरोखरच आता व्हावयास पाहिजे तो करण्याची जबाबदारी गायक व साहित्यसेवक या परस्पराचेकडे आहे. पुढे असा काळ यावा की, सर्वत्र मराठी ख्यालाचा महाराष्ट्रात प्रचार होऊन उत्तम काव्य व उत्तम गायकी याची जोड झाली म्हणजे सोन्याहून पिवळें होणार आहे.

आतांपर्यंत माझे विचार मीं आपणासमोर मांडले आहेत. त्याबद्दल विचार करावा व विचाराचे फळ लोकाना मराठी ख्याल ऐकावयास मिळावेत व इतके दिवस जी तात्विक चर्चा चालली आहे तिचें प्रत्यक्ष फळ म्हणजे परमेश्वराच्या कृपेने साहित्यसम्राटाच्या मेहेरबानीने व गायकाच्या परिश्रमाने मराठीकरणाचा महाराष्ट्रभर प्रचार होवो अशी त्या जगन्नियत्याजवळ व जनतारूपी जनार्दनाजवळ आशा प्रकट करून मी आपले भाषण संपवितों.

---

मराठी साहित्य समेलन, अधिवेशन १९ वे, बडोदें



संमेलनाची कार्यकर्ती मंडळी

श्री

# मराठी साहित्य संमेलन, बडोदें.

## अधिवेशन १९ वे.

---

## विभाग अध्यक्ष व चिटणीस.

### (१) भाषा विभाग.

अध्यक्ष--प्रो. पांडुरंग वामन काणे.

चिटणीस--प्रो. श्रीकृष्ण सखाराम भावे.

### (२) शास्त्रीय विभाग.

अध्यक्ष--प्रो. गोपाळ रामचद्र परांजपे.

चिटणीस—प्रो. दामोदर विनायक गोगटे.

### (३) तत्त्वज्ञान व समाजशास्त्र विभाग.

अध्यक्ष—श्री. विठ्ठल रामजी शिंदे.

चिटणीस—श्री. दिगंबर गणेश आपटे.

### (४) इतिहास विभाग.

अध्यक्ष--प्रो. दत्तो वामन पोतदार.

चिटणीस—श्री. विनायक सदाशिव वाकसकर.

### (५) प्रकाशन विभाग.

अध्यक्ष--श्री. दामोदर सांवळाराम यंदे.

चिटणीस--कु. सुभद्राबाई जाधव.

(६) काव्य विभाग.

अध्यक्ष—प्रो. माधव त्र्यंबक पटवर्धन.

चिटणीस—सौ. अपर्णाबाई देशपांडे.

(७) कथा विभाग.

अध्यक्ष—श्री. विष्णु सखाराम खांडेकर.

चिटणीस—श्री. रामचंद्र रावजी नातू

(८) संगीत विभाग.

अध्यक्ष—श्री. विनायकबुवा पटवर्धन.

चिटणीस—श्री. सीताराम गणेश आठवले.

(९) नाट्य विभाग.

अध्यक्ष—श्री. यशवंत नारायण टिपणीस.

चिटणीस—श्री. आनंदीबाई जयवंत.

## निबंध

(१) भाषा विभाग.

१ स्वर-लिपि-शुद्धि : ले. श्री. मु. पं. कलढोणे.

२ मराठी भाषेचे शुद्धीकरण : ले. श्री. नारायण विनायक चौकर.

३ एकेका शब्दापासून काव्य व इतिहास यांचा लाभ : ले. श्री. गोविंद कृष्ण मोडक.

(२) शास्त्रीय विभाग.

१ आरोग्याची खाण ह्मणजे व्यायाम : ले. श्री. रखमाजी गणपत बोदर्डे.

(४) इतिहास विभाग.



(५) प्रकाशन विभाग.



(६) काव्य विभाग.

## (७) कथा विभाग.

१ कथापुस्तकांत चित्रांचे स्थान :

ले. श्री. श्रीपाद शंकर जुन्नरकर.

२ आजीबाईच्या गोष्टी व त्यांचे वाङ्मयांत स्थान

ले. सौ. ताराबाई मोडक.

## (८) संगीत विभाग.

१ संगीताचे मराठीकरण ले. श्री. नारायण विनायक चौकर.

२ महाराष्ट्र संगीत : ले. श्री. पांडुरंग हरि देशपांडे.

## (९) नाट्य विभाग.

१ मराठी रंगभूमि : ले. श्री. नारायण विनायक चौकर

२ मराठी रंगभूमिचे आजचे स्वरूप व सुधारणा :

ले. श्री. वामन हरी घारपुरे.

## साधारण विभाग.

१ महाराष्ट्र विद्यापीठ आणि राष्ट्रीय शिक्षण :

ले. श्री. गोविंद बळवत माकोडे

२ प्रचलित वाङ्मय अश्लील आहे काय ?

ले. श्री. गो गं पोतदार.

३ महाराष्ट्र साहित्य संमेलनाची ग्रंथबद्धता

ले. श्री. वि. वा. जोशी.

४ मराठी टीकावाङ्मयाचे ओझरते दर्शन

ले. श्री. वि. म. घुले.

# मराठी साहित्य संमेलन, बडोदें.

## अधिवेशन १९ वें.



### —स्वागत-समिति—

स्वागताध्यक्ष—राजरत्न जनरल नानासाहेब शिंदे

स्वागतोपाध्यक्ष—राजरत्न गोपाळ कृष्ण दांडेकर.

चिटणीस—प्रो सदाशिव विनायक देशपांडे.

श्री. पांडुरंग वैजनाथ गुप्ते

श्री. चिंतामण गोविंद जोशी

सभासद—राजरत्न विष्णु कृष्ण धुरंधर

राजरत्न सखाराम अमृत सुधाळकर.

श्री. रा वासुदेव रामचंद्र तळवलकर

राजरत्न रामचंद्र शामराव पाटील (माने)

श्री मंगेश कमळाकर नाडकर्णी.

श्री. रा. गंगाधर माधव तांबे.

डॉ. भालचंद्र चिंतामण लेले.

प्रो. चिंतामण विनायक जोशी

श्री रा. वासुदेव विनायक जोशी.

राजरत्न प्रो. माणिकराव

श्री. रा. दाजी नागेश आपटे

खजिनदार—श्री. रा शंकर त्र्यंबक गोडगस्ते.



# महाराष्ट्र साहित्य संमेलन बडोदें.

## अधिवेशन १९ वें.

---

### पोट समित्या

**१ सत्कार समिति.**

१ न्या मू गो कृ दाडेकर
२ सौ. दाडेकर
३ न्या मू पाटकर
४ श्री रा रा कामतेकर

**२ सहकार समिति.**

१ न्या मू गो कृ दाडेकर
२ श्री रा रा दा. ना आपटे
३ ,, मं क नाटकर्णी
४ जनरल नानासाहेब शिंदे

**३ वर्गणी समिति**

१ प्रो. चि. वि. जोशी
२ श्री रा रा. वा. वि. जोशी
३ ,, ग अ सुधाळकर
४ ,, रा रा नातू
५ ,, रेटरेकर
६ ,, दामले

**४ पाहुणचार समिति**

१ श्री रा रा ग मा तांबे
२ ,, डॉ भा. बा पुसाळकर
३ ,, कड्ड
४ ,, कृ. वा. मराठे

**५ स्वयंसेवक समिति.**

१ श्री रा. रा. प्रो ना का. आपटे
२ ,, प्रो. माणिकराव
३ ,, प्रो. साळगावकर
४ सौ गंगूबाई पटवर्धन

**६ सभा समिति.**

१ श्री रा रा प्रो चि. वि जोशी
२ ,, त्र्यं दि. वाकनीस
३ ,, प्रो माणिकराव

**७ निबंध समिति.**

१ श्री. रा रा डॉ भा चि लेले
२ ,, वि. वा. गणपूले
३ ,, वा वि जोशी

**८ संगीत समिति.**

१ श्री. रा रा. आपटे
२ ,, आठवले

**९ प्रसिद्धि समिति**

१ श्री रा. रा. दा ना. आपटे
२ ,, व ब कप्तान
३ ,, भ. ब. पाळेकर

---

# मराठी साहित्य संमेलन, बडोदें.

## अधिवेशन १९ वें.

### स्वागत मंडळ-सभासद.

**श्रीमंत राजस्नुषा शकुंतलाराजे गायकवाड**
**श्रीमंत राजस्नुषा कमलादेवी गायकवाड.**

१ मे राजरत्न बी. डी अमीन
२ ,, गोपाळ लक्ष्मण आगाशे
३ ,, दाजी नागेश आपटे
४ ,, प्रो नारायण काशिनाथ आपटे
५ कै रा.ब. गणेश बळवंत आबेगावकर
६ मे कृष्णराव व्ही. उपलप
७ ,, कृष्णराव भवानराव कदम
८ ,, डॉ माधवराव कवठेकर
९ ,, कामतेकर
१० ,, व्ही के. कुंटे
११ ,, गजानन रामकृष्ण कोरान्ने
१२ ,, महादेव काशिनाथ कोल्हाटकर
१३ ,, परशुराम बळवंत गणपुले
१४ ,, यशवंत गणपतराव गायकवाड
१५ ,, शंकर त्र्यंबक गोडगस्ते
१६ ,, लक्ष्मण गोविंद घाणेकर
१७ ,, दादासाहेब घोरपडे
१८ ,, आर. एस् चव्हाण
१९ ,, डॉ. चंद्रचूड
२० ,, मिसेस् चंद्रचूड
२१ मे. शामराव जाधव
२२ ,, चिंतामण विनायक जोशी
२३ ,, वासुदेव विनायक जोशी
२४ ,, वासुदेव रामचंद्र तळवळकर
२५ ,, गंगाधर माधव तांबे
२६ सौ. सुंदराबाई तांबे
२७ मे. अनंत वासुदेव तेरेदेसाई
२८ ,, गोपाळ कृष्ण दांडेकर
२९ मिसेस् दांडेकर
३० मे बॅ केशवराव देशपांडे
३१ ,, भगवंत रामचंद्र देव
३२ ,, विठ्ठल कृष्ण धुरंधर
३३ ,, मंगेश कमळाकर नाडकर्णी
३४ ,, नायपल्ली
३५ ,, शंकरराव माधवराव पगार
३६ सौ गंगूबाई पटवर्धन
३७ मे. ना. ब पडते
३८ ,, मेजर सडेकर पवार
३९ ,, प्रो जी. जी पेंडसे
४० ,, भास्कर नारायण पाटकर

४१ मे वामन नारायण पाटकर
४२ ,, रामचंद्र दाजी पावसकर
४३ ,, रामचंद्रराव माधवराव फडणीस
४४ ,, भा. के. भाटे
४५ सौ. यशोदाबाई भाटे
४६ मे श्रीकृष्ण सखाराम भावे
४७ ,, अनंत नरहर महाजन
४८ ,, ग य माणिक
४९ ,, रामचंद्र शामराव मानेपाटील
५० ,, दत्तात्रय चिंतामण मुजुमदार
५१ सौ लक्ष्मीबाई मुजुमदार
५२ मे वासुदेव गणेश म्हसकर
५३ मे रा. के रणदिवे
५४ ,, विनायक शंकर राहाळकर
५५ ,, विश्वनाथ नारायण लिखित
५६ ,, डॉ. भालचंद्र चिंतामण लेले
५७ ,, त्र्यंबक दिनकर वाकनीस
५८ ,, अवधूतराव राजे शिर्के
५९ ,, केशवराव बाळासाहेब शिर्के
६० ,, दादासाहेब राजे शिर्के
६१ ,, जनरल नानासाहेब शिंदे
६२ ,, साठे ( इंजिनिअर )
६३ ,, चिंतामण विष्णु साने
६४ ,, सखाराम अमृत सुधाळकर

---

# मराठी साहित्य संमेलन, बडोदें.

## अधिवेशन १९ वें.

### प्रतिनिधि.

१ श्री. मो र अलाटे बडोदें
२ ,, ना पा अष्टेकर बडोदें
३ ,, गो. द अभ्यंकर मुंबई
४ ,, सि म अभ्यंकर ठाणें
५ ,, आगाशे इंदूर
६ ,, य र आगाशे सातारा
७ ,, ना आचार्य बडोदे
८ ,, प्रो आजरेकर अहमदाबाद
९ मिसेस आजरेकर ,,
१० कुमारी क आठवले ,,
११ श्री ना वि आठवले पुणे
१२ , रा. ब. आठवले अहमदाबाद
१३ ,, रा. म आठवले ठाणे
१४ ,, सि. ग आठवले बडोदे
१५ ,, डॉ आपटे ,,
१६ ,, डॉ. एम बी आपटे,,
१७ ,, डी जी आपटे ,
१८ ,, कृ. रा आबेगावकर,,
१९ ,, ग ना. आबेगावकर नादोद
२० ,, नि. आबेगावकर बडोदें
२१ सौ व आबेगांवकर बडोदें
२२ श्री. रा. र. इंगळे औंध
२३ ,, दी. ग. उदगीरकर नादेड
२४ श्रीमती क. ऊर्ध्वरेषे इंदूर
२५ श्री प्रो. ऊर्ध्वरेषे ,,
२६ ,, वा मो. एकबोटे बडोदे
२७ ,, गु प्र ओगले ओगलेवाडी
२८ ,, दा. के ओक नागपूर
२९ सौ पा ओक नागपूर
३० श्री. प्र ब औरंगाबादकर नाशीक
३१ ,, पु. मा. अभार मुबई
३२ ,, आ म कद्दू बडोदे
३३ ,, ना ब. कप्तान बडोदे
३४ ,, करमरकर इदूर
३५ ,, ग वि करमरकर सांगली
३६ ,, कर्वे पुणें
३७ ,, चि ग कर्वे पुणे
३८ ,, द ल. केळकर कोल्हापूर
३९ ,, डॉ कृष्णमूर्ति उमरावती
४० ,, पां. वा काणे मुबई
४१ ,, वि म. काथवटे बडोदे
४२ ,, प्र वि कानिटकर ,,
४३ सौ. शा कामतेकर ,,
४४ श्री. कृ ग. कार्लेकर मुबई
४५ सौ अ काळे नागपूर
४६ श्री. द. ग. काळे पारनेर
४७ ,, या. मा. काळे बुलडाणा
४८ ,, ल गं काळे पुणे

४९ मे रा. अ. काळेले खारघोण
५० ,, डॉ श्री र कीर्तने बडोदे
५१ मिसेस क. किबे इंदूर
५२ सरदार किबे इंदूर
५३ सौ. अ किर्लोस्कर हैद्राबाद
५४ श्री श वा किर्लोस्कर किर्लोस्करवाडी
५५ , कुळकर्णी इंदूर
५६ ,, कृ. पा. कुळकर्णी सातारा
५७ ,, के. रा कुळकर्णी कोल्हापूर
५८ ,, जी डी कुळकर्णी बेळगाव
५९ ,, द ग कुळकर्णी औंध
६० ,, न. प कुळकर्णी सोलापुर
६१ ,, य. ख कुळकर्णी महू (इंदूर)
६२ ,, रा. ह कुळकर्णी मुंबई
६३ ,, वि ह. कुळकर्णी ,,
६४ ,, स. ह कुळकर्णी ,,
६५ सौ रा. कुंटे बडोदे
६६ श्री. त्रि धो. कुंटे ठाणे
६७ ,, पु वि केसकर उज्जैन
६८ ,, ए ए केहिमकर बडोदे
६९ ,, डॉ द चि. केळकर ,,
७० ,, श कृ. कोठीवान नागपूर
७१ सौ. कोराने बडोदें
७२ श्री द्वा. रा. कोराने बडोदे
७३ ,, रा. रा कोराने ,,
७४ ,, पी. एस कोल्हाटकर
७५ ,, शा मु. कोवारकर मुबई
७६ ,, नि शं. खरे सोलापूर
७७ श्रीमती बाळुताई खरे,,
७८ सौ. इं खाजगीवाले बडोदे
७९ श्री खाडेकर इंदूर
८० मिसेस् उषा खाडेकर शिरोडा
८१ श्री डॉ. ग ल खिरवडकर उज्जैन
८२ ,, वा दा. खेर बडोदे
८३ ,, रा ज खोत ,,
८४ ,, व अ खोत ,,
८५ ,, रा रा. खाडेकर इंदूर
८६ ,, म ग गचकेश्वर अहमदनगर
८७ ,, वि. वा गणपुले बडोदे
८८ ,, श ना गद्रे ठाणे
८९ श्री. व्ही टी. गद्रे बडोदें
९० ,, वा दा. गाडगीळ हैद्राबाद
९१ श्रीमंत दमाजीराव गायकवाड बडोदें
९२ ,, भाऊसाहेब गायकवाड ,,
९३ श्री. भ. दी. गागल ठाणें
९४ ,, का. मा गुप्ते बडोदे
९५ ,, च. भा गुप्ते ,,
९६ ,, डी. टी. गुप्ते ,,
९७ ,, पा वै. गुप्ते ,,
९८ सौ. स्नेहलताबाई गुप्ते ,,
९९ श्री. दा. वि. गोगटे ,,
१०० ,, वि ब. गोगटे ,,
१०१ ,, बा. वि गोखले ,,
१०२ ,, ना वि गोलिवडेकर औंध
१०३ , राजकवि चं. गोऱ्हे बडोदें
१०४ , के. जी. घाटे सोलापूर
१०५ ,, द. ज. घाटे परशीयनगल्फ
१०६ मिसेस व. घाटे मुंबई
१०७ श्री. वि. ज घारपुरे ,,
१०८ ,, वि. स घाटे बडोदें
१०९ ,, वि. द. ,, मुंबई
११० ,, बा. घाडगे बडोदें

१११ श्री ज र. घारपुरे मुंबई
११२ ,, उ. व घुमटकर ,,
११३ ,, दे व घुमटकर ,,
११४ ,, वि. म. घुले अक्कलकोट
११५ ,, शं गो. घैसास ठाणे
११६ ,, चव्हाण बडोदे
११७ मेजर टि ए चव्हाण बडोदे
११८ श्री ना. गो चापेकर बदलापूर
११९ ,, आ वि चापेकर मुबई
१२० ,, य ना. चापेकर पुणे
१२१ सौ. र. चापेकर बदलापूर
१२२ मिस् चित्रे बडोदे
१२३ श्री पु आ चित्रे बडोदे
१२४ ,, र आ चित्रे ,
१२५ ,, गो रा चोळकर इचलकरजी
१२६ ,, वि ब चोळकर बडोदे
१२७ , राजाराम चौधरी ,,
१२८ ,, सो चौधरी नाशीक
१२९ ,, श्रीनिवास रा जडे बडोदे
१३० ,, घ कृ जडे ,,
१३१ श्रीमती जयवंत ,,
१३२ मिस ताराबाई जाधव ,,
१३३ श्री प्र खा जाधव ,,
१३४ श्रीमती मंजूळाबाई जाधव,,
१३५ मिस् सुभद्राबाई जाधव .,
१३६ श्री श्री. शं जुन्नरकर मुबई
१३७ ,, ग. स जोग बेळगाव
१३८ ,, जोगळेकर पुणे
१३९ ,, ज. ग जोगळेकर जळगाव
१४० ,, एस्. डी जोगळेकर बडोदे
१४१ ,, श्री भा जोशी ,,
१४२ श्री अ. के. जोशी पाद्रा
१४३ सौ इंदिराबाई जोशी बडोदे
१४४ श्री का ल. जोशी ,,
१४५ ,, चि. गो जोशी ,,
१४६ ,, चि. नी. जोशी हैद्राबाद
१४७ ,, पा वा. जोशी ,,
१४८ मिसेस पी. व्ही. जोशी ,,
१४९ श्री. बापु साहेब जोशी उज्जैन
१५० सौ मालतीबाई जोशी बडोदे
१५१ श्री य दि जोशी हैद्राबाद
१५२ ,, र लु जोशी (खार) मुबई
१५३ श्री. वा. म जोशी पुणे
१५४ सौ सरस्वतीबाई जोशी बडोदे
१५५ मिसेस सी एन् जोशी हैद्राबाद
१५६ श्री. य. ना टिपणीस मुंबई
१५७ ,, विष्णुपंत ठकार बडोदे
१५८ ,, ना तु ठाकोर पुणे
१५९ ,, ज अ. डागे बडोदे
१६० कु कमल ढवळे मुंबई
१६१ श्री. द. ल. ढवळे ,,
१६२ ,, पु. दि ढवळे नागपूर
१६३ श्रीमती शालिनीबाई ढवळे ,,
१६४ सौ. सरस्वतीबाई ढवळे मुबई
१६५ श्री ग रा. तळवलकर अहमदाबाद
१६६ ,, गो. ग. ताम्बे बडोदे
१६७ ,, का. कृ तावडे इंदूर
१६८ ,, त्रि ग ताम्हनकर ,
१६९ , ना मा दशपुत्र बडोदे
१७० ,, दाडेकर इंदूर
१७१ ,, न. मा दाडेकर बोरीवली
१७२ , आर् एम् दाडेकर मुंबई

१७३ श्री य रा. दाते पुणे
१७४ ,, वा ना दाभाडे औंध
१७५ मिसेस दाभोळकर मुबई
१७६ श्री वि. द. दाभोळकर मुंबई
१७७ ,, दामले वकील बडोदे
१७८ ,, अ वा दामले ,,
१७९ ,, वा. अ दामले ,,
१८० ,, डॉ पी ए. दामले उज्जैन
१८१ ,, स धो दास्ताने पुणे
१८२ ,, दिवाकर इंदूर
१८३ ,, प्रो ह रा दिवेकर ग्वाल्हेर
१८४ ,, देवल (इंजिनिअर) बडोदे
१८५ ,, देव मास्तर इंदूर
१८६ ,, श्री ग देवरूखकर कोल्हापूर
१८७ ,, , श्री गो देशपांडे मुबई
१८८ सौ अपर्णाबाई देशपांडे बडोदे
१८९ श्री आ रा. देशपांडे नागपूर
१९० ,, गु. ह देशपांडे वाटखेर
१९१ ,, भ रा. देशपांडे नागपूर
१९२ ,, म. वि. देशपांडे बडोदें
१९३ ,, न बा. देशमुख अहमदनगर
१९४ ,, के. एस्. दोणकर मुबई
१९५ ,, च मा. धायबर बडोदे
१९६ ,, दु स धोपेश्वरकर बेळगाव
१९७ ,, श्री ज. नवाथे बडोदे
१९८ ,, वि. ब. नवाथे ,,
१९९ मिसेस हिराबाई नगरकर मुबई
२०० श्री ना. मो. नाटेकर बडोदें
२०१ ,, द्वा सि. नाडकर्णी बडोदे
२०२ ,, मा मं. नाडकर्णी ,,
२०३ मिसेस इंदिराबाई नातू ,,
२०४ श्री. रा. रा नातू ,,
२०५ ,, विनायकराव नातू ,,
२०६ ,, ब बा. निकम कोल्हापूर
२०७ ,, पा. वा. नेने बडोदें
२०८ सौ मनोरमाबाई नेने ,,
२०९ श्री. म पा. नेने ,
२१० ,, वि. पा नेने ,,
२११ ,, के. ना पटवर्धन ,,
२१२ ,, नरहरपंत पटवर्धन म्हैसाणा
२१३ , एन् एम् पटवर्धन पुणे
२१४ , वा. रा पटवर्धन मुबई
२१५ ,, श्री. रा पट्टणकर बडोदे
२१६ सौ इंदिराबाई पडते ,,
२१७ श्री कर्नल रा स. परब ,,
२१८ ,, प्रो. ना. बा पराडकर उज्जैन
२१९ ,, वि. श्री पराडकर बडोदें.
२२० ,, डॉ आ. श्री पराजपे मुबई
२२१ ,, अ. मि. प्रधान बडोदे
२२२ सौ. कमलाबाई प्रधान ,,
२२३ श्री आर के प्रधान ,,
२२४ सौ. लक्ष्मीबाई प्रधान ,,
२२५ श्री. वि. सि. प्रधान ,,
२२६ मिसेस आ. प्रभुदेसाई ,,
२२७ सौ पाटकर ,,
२२८ श्री भा. ल पाटणकर नाशिक
२२९ ,, ग ह पाटील पुणे
२३० ,, ज. अ. पाढरे बडोदें
२३१ ,, गणेश ह. पाध्ये कोल्हापूर
२३२ ,, पी. के. पाध्यें पुणें
२३३ ,, अण्णा दाजी पावसकर बडोदे
२३४ ,, स दा. पावसकर ,,

२३५ श्री. प्रो. पाळंदे सुरत
२३६ ,, बाबुराव पांगारकर बडोदें
२३७ ,, पाथरपेकर
२३८ ,, पावशें सातारा
२३९ मिसेस पाळंदे सुरत
२४० श्री. पितांबरदास त्रि. बडोदें
२४१ ,, के. ग. पुरोहित ,,
२४२ ,, के. रा. पुरोहित मुंबई
२४४ ,, वा श्री. पुरोहित नाशिक
२४४ ,, पुरंदरे इंदूर
२४५ ,, डॉ भा वा. पुसाळकर बडोदे
२४६ मिसेस पेंडसे ,,
२४७ श्री. अप्पा पेंडसे मुंबई
२४८ ,, र ल. पेंडसे नागपूर
२४९ ,, प्रो शं. दा पेंडसे नागपूर
२५० ,, ह कृ पेंडसे ठाणे
२५१ ,, बा ना पेंढारकर इंदूर
२५२ , प्रो. द. वा. पोतदार पुणें
२५३ ,, डॉ. रा. शि. पोरेडी बडोदे
२५४ ,, परशुराम वि. पंडित ,,
२५५ सौ. पंडीत ,,
२५६ श्री. वा ग. पंतवैद्य इदूर
२५७ ,, रा वा. पंतोजी उज्जैय
२५८ ,, फडकें बडोदें
२५९ ,, शं वि फडके बडोदे
२६० ,, बापुराव फडणीस बडोदे
२६१ ,, ना. र. फळणीकर ,,
२६२ ,, प्रो. प. म बरवे मुंबई
२६३ ,, सि. चि. ब्रम्हे ठाणें
२६४ ,, ले. बाडे बडोदें
२६५ ,, आ. रा. बाडे बडोदें
२६६ ,, वि ह. बेलसरें अमरावती
२६७ ,, तु. बा. बेंगळें बेळगांव
२६८ ,, आर. आर. बेंद्रे बडोदे
२६९ ,, बा. भ बोरकर गोवें
२७० ,, शं. कें. बोरकर मुंबई
२७१ ,, प्रो जी. एच. भट बडोदें
२७२ ,, डॉ. भट्टाचार्य बडोदें
२७३ ,, श्री. ग. भावे ,,
२७४ ,, के. ब. भावे ,,
२७५ ,, चि. रा. भावें बडोदें
२७६ ,, रा. म. भातखंडे मिरज
२७७ ,, अ. ना. भालेराव मुंबई
२७८ ,, श्री ग भालेराव नडियाद
२७९ ,, रा मो. भाबूरकर बडोदें
२८० श्री ज. र. भिडे बडोदे
२८१ ,, वि चि. भिवंडीकर मुंबई
२८२ ,, सुशिलाबाई भुसारें इंदूर
२८२ ,, पां गो. भोंसले कोल्हापुर
२८३ ,, भ. गो भोंसले ,,
२८५ ,, डी एम्. मकाशीर बडोदें
२८६ , मराठे ,,
२८७ ,, का. के. मराठे नागपूर
२८८ ,, ग. स. मराठे पुणे
२८९ ,, कृ. मराठे बडोदे
२९० ,, कृ. गो. मराठे पुणे
२९१ ,, कृ. य. मराठे बडोदें
२९२ ,, कृ वा. मराठे ,,
२९३ ,, द अ. मराठे ,,
२९४ ,, पार्वतीबाई मराठे मुंबई
२९५ सौ. भा. मराठे नागपूर
२९६ कु. संजीवनी मराठे पुणें

२९७ श्री. वा. स महाजनी बडोदे
२९८ सौ. सुशिलाबाई महाजनी बडोदे
२९९ श्री. कृ. ब महाबळ नाशीक
३०० ,, भाटे इंदूर
३०१ ,, ल य. माणिक बडोदे
३०२ ,, माणेकलाल शेठ ,,
३०३ ,, मा. म. नाशीक
३०४ ,, सुं. भू मानकर मुंबई
३०५ ,, प्रो. वा गो. मायदेव पुणे
३०६ ,, दा. मावळंकर अहमदबाद
३०७ ,, डी. जे. माहुलकर बडोदे
३०८ ,, माडके अमरावती
३०९ ,, एम्. एस्. मुळे अहमदनगर
३१० ,, वि. कृ. मुळे इंदूर
३११ , वि. कृ. मेहेदळे बडोदे.
३१२ मिसेस् मोघे मुंबई
३१३ श्री. द. ग. येरवडेकर पुणे
३१४ ,, रंगाचार्य रड्डी बडोदे
३१५ ,, राणे ,,
३१६ सौ. राणे ,,
३१७ सौ सिताबाई रावेरकर अलिबाग
३१८ श्री. ह. वि. रिसवडकर म्हैसाणा
३१९ ,, वा. गो. रेटरेकर बडोदे
३२० ,, माधव रेटकर मुंबई
३२१ ,, लक्ष्मीलाल शेठ
३२२ सौ. विमलाबाई लिखिते बडोदे
३२३ श्री. चं. गो. लिमये ,,
३२४ ,, वि. गो. लिमये सागली
३२५ ,, श्री र. लेले ,,
३२६ ,, ग. रं. वडगावकर सोलापूर
३२७ ,, व्ही. व्ही. वडनेरकर बडोदे
३२८ श्री. वर्तक ,,
३२९ ,, प्र. व्ही वर्तक जाफराबाद
३३० सौ. इंदिराबाई वाकनीस बडोदे
३३१ श्री. वि. स वाकसकर ,,
३३२ ,, प्रो. दे. द. वाडेकर पुणे
३३३ ,, स सी. वालावलकर ठाणें
३३४ ,, ग पा. विजापुरे क्रिर्लोस्करवाडी
३३५ ,, प्र. ब. वैद्य नाशिक
३३६ ,, व रा. वैद्य ठाणे
३३७ ,, कृ. ह वैशंपायन बडोदे
३३८ ,, रा शा. व्यास झाशी
३३९ ,, कृ शा. व्यास अहमदाबाद
३४० सौ. क. शारगपाणी बडोदे
३४१ श्री. ग वि. शारंगपाणी ,,
३४२ ,, डॉ. जो जी. शारंगपाणी ,,
३४३ ,, जी. के शारंगपाणी ,,
३४४ ,, द. वि शालिग्राम पुणे
३४५ सौ. आनंदीबाई शिर्के जळगाव
३४६ श्री. शि. स. शिर्के ,,
३४७ कु. सरला शिर्के ,,
३४८ श्री. दा. न. शिखरे पुणे
३४९ ,, आर्. एम् शितोळे बडोदे
३५० ,, शं रा. शेडे सागली
३५१ ,, एम. बी. सबनीस बोर्डी
३५२ ,, ज. ज. सरदेसाई गोवे
३५३ सौ. उमाबाई सहस्रबुद्धे पुणे
३५४ श्री. डी. एन. सहस्रबुद्धे बडोदे
३५५ ,, शं को सहस्रबुद्धे नागपूर
३५६ ,, कृ. रा. संत बडोदे
३५७ , दा. कृ. साठे ठाणे
३५८ ,, व. कृ. साठे मुबई

३५९ मे. वि. दा. सातघरे बडोदे
३६० ,, श्री दा. सातवळेकर औंध
३६१ ,, बा द सातोस्कार गोर्वे
३६२ मिसेस साने बडोदे
३६३ श्री ग. पु. साने ,,
३६४ ,, र. ज सामंत मुंबई
३६५ ,, सि ग. सावंत बडोदे
३६६ ,, गो ब सामवडकर ,,
३६७ श्री. ह वि. सासवडकर ,,
३६८ ,, प्रो. द वि साळगावकर ,,
३६९ ,, द. म. सुतार ठाणे
३७० ,, ग. अ सुधाळकर बडोदे
३७१ श्री. एल एस सुभेदार अमरावती
३७२ मौ स सुभेदार अमरावती
३७३ , जानकीबाई हर्डीकर हैद्राबाद
३७४ श्री. रा ग. हर्षे तळेगाव
३७५ ,, वि. वा जोशी मूळ
३७६ मे बाळाराम व्ही. देसाई बडोदे
३७७ ,, वामनराव निक्ते ,,
३७८ ,, टी. एस्. तासकर ,,
३७९ मे. पानिमंगलोर ,,
३८० श्री. गो. र. हर्डीकर ,,
३८१ ,, वि. ल. हर्षे ,,

---

# मराठी साहित्य संमेलन, बडोदें.

## अधिवेशन १९ वें

## संमेलनाच्या जमाखर्चाची यादी.

**जमा.**

| रु आ पै | |
|---|---|
| ३,०००- ०-० | सरकार देणगी |
| ९२६- ०-० | स्वा म सभासद मूल्य |
| १,८५३- ०-० | प्रतिनिधि मूल्य |
| ७६९- ० ० | तिकीट विक्री |
| ६०- ८-० | किरकोळ |
| ६,६०८- ८-० | |

**खर्च.**

| रु. आ. पै | |
|---|---|
| ९०- ६-० | सादिलवार |
| १७१-१०-३ | टपाल |
| ४५- ०-० | प्रवास |
| १९१- ०-३ | मजूरी |
| २००- ०-० | देणगी [म सा परिषद] |
| १,१६३- ०-६ | भोजन खर्च |
| ५६७- ६-० | वाहन |
| ४३-१२-० | स्वयंसेवक |
| ३८४-१५ १ | सामान भाडे |
| ३९०- ३-९ | मंडप. |
| ८३- ०-० | दिवे |
| ५५- ०-० | ध्वनिवाहक |
| २४६-११-६ | किरकोळ |
| १६०-१४-० | चिन्हे |
| १४७- ०-० | फोटो |
| ६७- ८-० | कचेरी |
| ९३१- ६-० | छपाई |
| ३९- ० ० | पारितोषिकें |
| २२- ०-० | हार |
| ४,९९९ १४-० | एकदर खर्च |
| १,६०८-१०-० | रोख शिल्लक |
| ६,६०८- ८-० | |

सदर शिल्लक रुपये सोळाशे आठ दहा आणे (१,६०८ रुपये १० आणे) सहविचारिणी सभेस इमारतफंडाकरिता सुपूर्त केले.

| | | |
|---|---|---|
| स. वि. देशपांडे, | शं. त्र्यं. गोडगस्ते, | जनरल शिंदे, |
| चिटणीस | खजिनदार. | स्वागताध्यक्ष. |

हा अहवाल संमेलन चिटणीस प्रो सदाशिव विनायक देशपांडे यांनी पुढीलप्रमाणे
छापून सद्विचारिणी सभेतर्फे दांड्याबाजार, बडोदे येथे प्रसिद्ध केला ता २२-४-३५
शास्त्रीय विभाग भाषण आर्यभूषण छापखाना, पुणे, तत्त्वज्ञान विभाग भाषण
इंदुप्रकाश छापखाना, मुंबई, बाकीचे छापकाम श्रीरामविजय छापखाना व
वकील ब्रदर्स छापखाना, बडोदे